त्यांस या विषयाकडे दुर्लक्ष करावयास लावीत असावी. सामाजिक शौर्य त्यांस पटतेंसें दिसतें. खड्गबहादुराच्या शौर्यावर एक दीर्घ काव्य लिहिलें जातें; गरीब अबलेला दांडग्याच्या तावडींतून सोडविणाऱ्यावर 'खरा शूर' ही कविता लिहिली जाते; परंतु सत्याग्रहावर चांगलीशी कविता लिहिली जात नाहीं. वीररसाच्या बाबतींत आम्ही ऐतिहासिक कालावरच अधिक अवलंबून आहोंत व पोवाड्यांची किंवा तत्सम स्फुट आधुनिक कवितेची हौस अद्यापि जीव धरून आहे. खरोखर जळजळीत किंवा वीररसाची कविता लिहिण्यांत गोविंद कवीइतकें यश सावरकरांना तरी मिळालें कीं नाहीं याची शंका वाटते. तिवारींच्या कवितेंत अवडंबर किंवा आवाज अधिक वाटला, तर माधवांच्या कवितेंत वीररसाला जरा अधिकच वाटणारें शिल्प व साफसुफी आढळते. तथापि देशभक्तिपर काव्य होत नाहीं म्हणून जेवढी हाकाटी केली जाते त्या मानानें तें दुर्मिळ झालें आहे असें वाटत नाहीं; मात्र चालू राजकीय लढ्या-विषयीं मराठी कवींस जिव्हाळा वाटत नसावा. कारणें काय असतील तीं असोत !

वीररसाला जवळ असणारा रौद्ररस आणि त्यावर बराचसा अवलंबून असणारा भयानक या रसांस जुन्या काव्यांत जसें स्वतंत्र व महत्त्वाचें स्थान नव्हतें तसेंच आतांहि नाहीं. काव्यरचनेची प्रवृत्ति स्फुट काव्याकडे झाल्यानें व उपरिनिर्दिष्ट रसास बहुधा दुय्यम स्थानच देणें योग्य असल्यानें, या रसांची निवड करून त्यावर स्वतंत्र रचना करण्याइतकें सामर्थ्य त्यांस कधींच येऊं शकलें नाहीं. वीररसाच्या अनुषंगानें त्यांचा जो कांहीं आविष्कार झाला तेवढाच किंवा 'नव-रस-मंजरी'त विनोदानें कोणी वर्णन केलें तेवढेंच. रौद्ररसाचें उत्तम वर्णन तांब्यांच्या 'रुद्रास आवाहन' या कवितेंत आलें आहे. भयानकाचें वर्णन कांहीं काल प्लेगच्या वर्णनाबरोबर होई; पण एकंदरींत या रसाचा आविष्कार कमीच झाला. यांच्याप्रमाणेंच बीभत्सरसाची स्थिति आहे. जुन्या वाङ्मयांत या रसाला दोन प्रकारांनीं वाव मिळे. वीर रसाच्या अनुषंगानें किंवा शांतरसास साहाय्यक म्हणून युद्धानंतरच्या रणक्षेत्रावरील परिस्थितींत 'मेदोस्थिमांसमज्जासृक्' यांचें जुगुप्सादायक वर्णन ओघानेंच येई. त्याचप्रमाणें शांतरसास म्हणजे वैराग्यास अनुकूल म्हणून स्त्रीच्या सौंदर्याचें विपरीत वर्णन बीभत्सरसांत परिणत होई. आधुनिक महाराष्ट्राच्या

इतिहासांत युद्धास स्थान नसल्यानें, आणि स्त्रीविषयक अनादराची भावना नाहींशी झाल्यामुळें, जुन्या बीभत्सरसासहि जागा मिळेना; परंतु एक नवीन बीभत्सरस हास्याच्या अनुषंगानें मराठी काव्यांत अवतरला आहे. विनोद किंवा उपहासाच्या भरांत विवेक सुटणें अगदीं सुलभ असल्यानें, आणि वाटेल तो कवि विनोदी लेखन करून सवंग लोकप्रियतेची प्राप्ति करून घेण्याची इच्छा करूं लागल्यानें, काव्यांत बीभत्सरसानें बराच धुमाकूळ माजविला आहे. कोणी स्त्रीच्या कुरूपतेचें वर्णन करितो, कोणी चिखल-गोमयाचें चित्र काढितो किंवा ढेकूण-पिसवा, मुंगळा-मुंगळी यांच्यासंबंधीं सविस्तर लिहितो. क्षुद्र विषय व त्यांना शोभतील असे शब्दप्रयोग विनोदास लागत असल्यामुळें विवेक सुटल्यास काव्य किती बीभत्स होत असेल याची कल्पना करणें अवघड नाहीं. अर्थात् यामुळें उत्पन्न होणारी जुगुप्सा काव्यविषयक अधिक असते. कुचेष्टा करण्यानें प्रतिष्ठा फार झपाट्यानें वाढते असा अनुभव आल्यामुळें पुष्कळ अविवेकी कवींनीं काव्याच्या या प्रांतांत शिरून विनोदाच्या ऐवजीं बीभत्साचें भरताड काव्यांत आणून टाकलें आहे, व खऱ्या उच्च विनोदी काव्यास पळवून लावलें आहे असाहि अनुभव येतो. असें असूनहि गद्याप्रमाणें पद्यांतहि स्वतंत्र महत्त्वाचें असें स्थान मिळवून हास्यरसानें इतर कोणत्याहि रसापेक्षां सापेक्षतः अधिक प्रगति— विशेषतः अलीकडील काळांत केली आहे. हास्योत्पत्तीस कारणीभूत होणाऱ्या उपहास, विनोद व विशेषतः विडंबन या तीनहि काव्यप्रकारांचा भरपूर प्रसार गेल्या पंधरा वर्षांत झाला आहे. केशवसुतांनीं खाणावळींतील 'तुपाच्या धारेवर', टिळकांनीं 'तिंबूनानां'वर, मोगऱ्यांनीं 'पदवी'वर, विनायकांनीं 'चिलमी'वर व गोविन्दाग्रजांनीं 'विहीण आणि तोंडाळ बायको' यांवर स्फुट कविता लिहून हास्यरसाला मिळवून दिलेलें स्वतंत्र स्थान महत्त्वाचें करण्यांत अत्रे यांनीं अपूर्व यश संपादिलें; पण त्यांचाहि तोल नेहमींच राहिला असें न झाल्यानें, अनुकरण करणाऱ्यांनीं अनुकार्य आदर्शांतील सूक्ष्म दोष उठावदारपणें पुढें मांडून काव्यरचना केली. हास्यरसाला शिष्टमान्यता मिळाली एवढें मात्र खरें. स्वतंत्र स्फुट उपहासकाव्य फारसें लिहिलें जात नाहीं. मोगऱ्यांच्यामागें पटवर्धनांनीं लिहिलेलीं 'सुधारक' व 'नकुलालंकार' हीं दीर्घ काव्यें तेवढीं उल्लेखनीय वाटतात. बहुतेक उपहास विडंबन आणि विनोद यांच्या आडच दडलेला आहे.

मानवाच्या प्रेमांत आणि भक्तींत सृष्टीनेंहि बराच मोठा वाटा उचललेला आहे. क्रांतिपूर्व कालांत स्वतंत्र सृष्टिवर्णनात्मक काव्यें लिहिलीं गेलीं होतीं. 'गंगावर्णन' व 'षड्ऋतुवर्णन' यांतून स्थलकालानुसार पुष्कळसें सृष्टिवर्णन येऊन गेलें. तें सरस व सुंदरहि वटलें. परंतु पुढें सृष्टीकडे पाहण्याच्या दृष्टिकोणांतच फरक पडला. सृष्टि केवळ वर्णनाविषय राहिली नसून प्रेमाचा किंवा भक्तीचा विषय झाली आहे. ही दृष्टि आमची मूळची नसून वर्ड्स्वर्थ् आदि पाश्चात्य कवींपासून आपण उचलली. केशवसुतांचें सृष्टिप्रेम थोडेंसें उसनें आणि काव्यप्रीतीच्या पोटीं आलेलें दिसतें. टिळकांची मुलांच्या बरोबर फुलांचे कवि म्हणून जी प्रसिद्धि झाली ती त्यांच्या काव्यांत केशवसुतांपेक्षां सृष्टिविषयक जिव्हाळ्याचा भाग अधिक होता म्हणून. टिळकांच्याच सहवासानें कीं काय, बालकवींच्या ठिकाणीं हें प्रेम उत्कर्षाप्रत जाऊन त्याचा उद्रेक सुंदर काव्यरूपानें झाला. सृष्टीवरील त्यांचें प्रेम इतर आधुनिक कवींत एवढ्या प्रमाणांत न आढळलें तरी त्याचें महत्त्व त्यांस पटलें आहे, आणि अनेकांनीं त्याचा फॅशन् म्हणून स्वीकार केला. कांहींमध्यें हें प्रेम केवळ अनुकरणात्मक आहे हें स्पष्ट दिसतें, पण कांहींना खरोखर जिव्हाळा वाटतो. उषा, अरुण, रजनी, तारका, निर्झर, फुलराणी, वृक्षलता, कोकिळ आणि चंडोल, वसंत, शरद्, वर्षा अशी मंडळी या काव्यांत वावरत असतात. अनेक वेळां यांच्यावर मानवांच्या भावनांचा आरोप केला जातो व वास्तवतेसह चमत्कृतिहि चाखावयास सापडते. सृष्टीच्या मनोज्ञ रूपाइतकें तिचें भीषण स्वरूप कविप्रिय झालें नाहीं. तथापि गडकऱ्यांच्या 'घुबडास' किंवा 'स्मशानगीत' इत्यादि कवितांतून त्यांचेंहि दर्शन होतें. सृष्टिवर्णनांत वास्तवतेला प्रमुख स्थान असून कविसंकेतांचा उपयोग फारसा केलेला दिसत नाहीं. जुन्या कवितांतून सृष्टिवर्णनामध्यें कालस्थलविपर्यासाचे दोष दिसत असत ते आतां जाणून तरी होत नाहींत. समासोक्तीनें नायक-नायिकाव्यवहार सूचित करण्याकडे सृष्टिवर्णनाचा उपयोग संस्कृत काव्यांत होत असे, तो श्लेषाचा प्रघात फारच कमी झाल्यानें नवीन मराठी काव्यांत होत नाहीं. गुलाब, कलिका इत्यादींच्या रूपकानें कांहीं कवितांमध्यें सृष्टीचा उपयोग करून घेण्यांत येतो, परंतु अन्योक्तीमधून ज्या तऱ्हेनें व जेवढ्या प्रमाणांत सृष्टि आणि तिचे प्रमुख घटक यांचा उपयोग करीत तेवढा तो अलीकडील काव्यांत होत नाहीं; म्हणजे सृष्टीशीं कवींचें

वर्तन सरळपणें होत आहे. तींत व्यंजनेनें तिसऱ्या व्यक्तीचा शिरकाव कमी होतो. असें असूनहि सृष्टिवर्णन म्हणजे तिचा फोटो ही भावनाहि कमी आहे ही गोष्ट समाधानाची आहे. त्यांत कवींच्या तिजविषयींच्या भावना तरी प्रकट होतात, किंवा त्यांचा आरोप तरी तिजवर होतो. कवींच्या प्रेमामध्यें वाटेकरी झालेल्या अनेक गोष्टींत सृष्टीनें चांगलेंच महत्त्वाचें स्थान पटकाविलें आहे.

कविप्रेमामध्यें आणखी कांहीं नवीन मंडळींनीं वाटा उचललेला दिसतो. ती म्हणजे मुलें. जुन्या रसव्यवस्थेंत वत्सलरसास सर्वमान्यता मिळाली नव्हती, पण नवीन जमान्यांत त्यास खास जागा द्यावी लागेल. प्रथमतः अर्थात् लहान मुलांना उपयुक्त आणि त्यांच्याकरितांच लिहिलेल्या बालवाङ्मयाचेंच त्यास स्वरूप होतें. मो. ग. लोंढे व वि. कों. ओक यांनीं यास प्रारंभ केला; बालबोध, बालबोधमेवा, आनंद, खेळगडी व क्रमिक पुस्तकें यांत या कवितांना स्थान मिळालें. ओकांच्या कवितांपेक्षां लोंढ्यांच्या लेखनांत काव्यगुण अधिक असे. नैतिक प्रतिपादन हाच मुख्य हेतु असे, व 'बरें सत्य बोला' किंवा 'त्या सोंगऱ्या भांडण लाविताति' यापेक्षां फारसें अधिक उच्च दर्जाचें काव्य त्यांतून येत नसे. परंतु नीत्युपदेशाचें हें स्वरूप जाऊन त्यास क्रमानें ललित-वाङ्मयाचें स्वरूप आलें. लहान मुलांच्या भावना, त्यांना पडणारे प्रश्न, त्यांना रम्य वाटणाऱ्या गोष्टी यांचें त्यांच्या दृष्टीनें केलेलें वर्णन यासच महत्त्व आलें. टिळक, दत्त, नंतर मायदेव इत्यादि कवींनीं या संक्रमणास हातभार लावला. 'चला सुटी झाली' किंवा 'एंजिनवाला' इत्यादि कवितांनीं हें संक्रमण स्पष्ट झालें. पटर्धनांच्याहि शिशुविषयक कविता वाचनीय झाल्या आहेत. या प्रयत्नांत कित्येक वेळां कवि आपले विचार लहान मुलांवर आरोपित करून चमत्कृति आणण्याचा प्रयत्न करितात आणि मग तें काव्य कृत्रिम व अस्वाभाविक होण्याची भीति असते. 'गोड खाऊ' किंवा 'जरीची टोपी' यांकरितां हट्ट धरून बसणारा मुलगा आपल्या आईस पुनर्विवाहाबद्दल दोष देण्याइतका समजूत आलेला असेल असें म्हणवत नाहीं. त्यांच्या भाषेच्या बाबतींतहि अशीच गफलत होते. कांहीं शब्द बालांच्या तोंडीं न शोभणारे असे घातले जातात. भाषा बोबडी असावी लागते, आणि ती निश्चित नसल्यानें मुलामुलांच्या बोलण्यांत एकरूपता राहत नाहींच, पण एकाच मुलाच्या बोलण्यांतहि ती

राहत नाहीं. पण यापेक्षांहि आक्षेप घेण्याजोगी गोष्ट म्हणजे प्रौढ विचार व कल्पना. सर्वसाधारण मुलांत आढळून न येणारी हुशारी बहुधा या काव्यांतील मुलांत असते, व तीं प्रौढांप्रमाणें बोलून कवीस निरुत्तर किंवा स्तंभित करतात, हें पाहून वाचकांनाहि आश्चर्य वाटतें. तथापि शिशुगीतांस आधुनिक काव्य-वाङ्मयांत स्वतंत्र स्थान प्राप्त होऊन तो एक काव्यप्रकार होऊन बसला आहे हें निश्चित.

बालांप्रमाणेंच ग्रामीणजनांसहि काव्यांत स्थान मिळालें आहे. इंग्रजी-मधील Pastoral Poetry च्या वाचनाचा परिणाम म्हणून, किंवा समाजांतील सर्वच माणसांसंबंधीं वाटूं लागलेल्या समतेच्या आणि बंधुतेच्या भावनांचा परिणाम म्हणून, किंवा 'परत निसर्गाकडे' या चळवळीचा एक भाग म्हणून, अथवा ग्रामोद्धार म्हणून, जानपद हा आधुनिक काव्याचा एक महत्त्वाचा विषय होऊन त्यावर लिहिलेल्या कवितांचा एक स्वतंत्र संग्रहहि प्रसिद्ध झाला आहे. केशवसुतांनीं मजुरावर एक कविता लिहिली, माधवा-नुजांनीं दुष्काळांतील कामकऱ्यांवर अनेक कविता लिहिल्या अशी या परंपरेस सुरुवात झाली. कित्येक वेळां शहरी राहणीचा तिरस्कार म्हणून जानपदांच्या जीवनाचा हेवा करण्यांत येतो, तर बहुधा अज्ञानानें किंवा फॅशन् म्हणून या जानपद-प्रेमाचा आविष्कार होतो. पुष्कळ वेळां नागरिकांच्या त्यांच्यासंबंधीं-च्या भावना प्रकट होतात, तर अनेकदां त्या जानपदांच्या भावना आपल्या कल्पनेनें कवि रंगवीत असतात. त्यांचें शेत, कारभारीण, बैल, मोट, विहीर, न्ह्यारी, पेरणी, सुगी, हंगाम हे विषय स्वाभाविकपणें या काव्यांतून येतात. इंग्रजी काव्यांतील धनगर किंवा शेतकऱ्यांशिवाय इतर धंदेवाला वर्गहि दर्शन देत नाहीं. साधारण कविवर्गापुढें शेतकरी हाच प्रामुख्यानें आहे. त्याचीं सुखेंच नागरिक कवींच्या डोळयांत भरतात. त्याचें खडतर जीवन कमी लक्षांत येतें. त्यांच्या प्रेमाच्या कल्पना त्यांस आकर्षक वाटतात. शिशुंसंबंधींच्या भावनाविष्कारांत आणि काव्यलेखनांत जे दोष होण्याचा संभव असतो तोच संभव याहि काव्यांत असतो. विचार आणि भाषा यांत शहरी कृत्रिम जीवनाची छटा पडते. जेथें भाषेंत अतिस्वाभाविकता आणली जाते तेथें दुर्बोधता येते; पण अभ्यासानें आणि अधिक परिचयानें हें काव्य अधिक चांगलें वठेल असें वाटतें.

नित्यानित्यविवेकजन्मा निर्वेद हा ज्याचा स्थायीभाव समजला जातो

अशा शांतरसास नवीन काव्यांत अल्प स्थान आहे. नित्यानित्यविवेकाचा प्रयत्नच जेथें होत नाहीं तेथें त्यावर आधारलेला शांतरस कसा सापडणार ? भक्तीनें प्राप्त होणारें समाधानहि क्वचित् आढळावयाचें. टिळक सोडल्यास नव्या पंथांतील बहुतेकांच्या मनाची अवस्था म्हणजे संमोहलहरीची. असमाधान हेंच नवीन युगाचें महत्त्वाचें लक्षण. प्रेमविषयक असमाधान, समाजव्यवस्थाविषयक असमाधान, राजकीय असमाधान किंवा आध्यात्मिक असमाधान, कांहींतरी कविमनास जाचत असतें, किंबहुना तें आहे म्हणूनच त्यांचें काव्य बाहेर पडतें. काव्य म्हणजे आनंदस्फूर्तीचे उद्‌गार न होतां मानसिक अस्वास्थ्याचे उद्‌गार अशीच स्थिति पुष्कळांची असते. कोणाला 'ओढणी' लागते, कोणाची 'जळजळ' चालते, कोणाची प्रेमानिराशा होते. एकूण मजकूर असमाधानाचा. म्हणून शांतरसाचा आविष्कार अपवाद म्हणूनच होतो. ज्यांना समाधान लाभतें, ते बहुतेक काव्यरचनाच सोडून देत असावेत. शांतरसावर पूर्वींच घेण्यांत आलेला आक्षेप नवीन काव्यावरून खरा ठरण्याचाच संभव अधिक.

जुन्या रसव्यवस्थेंत ज्याला मान्यता देण्याची सूचना पुढें आली, पण बहुमत मिळालें नाहीं, तो उदात्तरस नवीन काव्यांतहि तितकाच दुर्लक्षित झाला आहे. सावरकरांच्या जगन्नाथाच्या रथावरील कवितेंत तो आल्यासारखा क्वचित् कोठें दिसतो. त्याचा आस्वाद घेणाऱ्या व्यक्तीहि थोड्या आणि त्याची प्रतीति होण्याजोगे प्रतीतीचे क्षणहि कवींच्या आयुष्यांत थोडे; तेव्हां हें काव्य थोडेंच निर्माण होतें. भावनेपेक्षां कल्पनेची अथवा विचाराची उडीच यांत अधिक, व असें झालें कीं, सामान्य वाचकाच्या व कवीच्या आटोक्याच्या बाहेरच तें जातें. विचारप्रधान काव्य अगदीं झालें नाहीं असें नाहीं, पण त्याची संख्या मात्र थोडीच आहे.

काव्याच्या अंतरंगामधील परिवर्तांचा हा इतिहास झाला. त्याच्या बाह्य स्वरूपांतहि अनेक परिवर्त झाले. ज्या कालाचें समालोचन आपण करीत आहों त्याच्या आरंभास आर्या व इतर संस्कृत वृत्त-प्रकार रूढ होते. मराठी पद्य-प्रकारांमध्यें साकी, दिंडी, पदें व क्वचित् अभंग यांचा आश्रय केला जाई. शाहिरी वाङ्मयास त्यांची स्वतंत्र जातिरचना उपयोगांत आणली जाई. ही प्रथा क्रांतिकालापर्यंत अव्याहत चालू राहिली. आजवर चालत आलेले पद्यप्रकार

बदलण्याचें कोणाच्याच मनांत आलें नाहीं किंवा आवश्यकताहि वाटली नाहीं; परंतु वृत्ताच्या बाबतींत स्वतंत्र प्रयोग करण्याचें केशवसुतांनीं प्रथम सुरू केलें असें दिसतें. ( टिळकांनीं या बाबतींत त्यांचें अनुकरण केलें असेल. ) वृत्त-वैचित्र्याचा अवलंब कर; अथवा बालानंदासारख्या जातिचरणाचा उपयोग कर अथवा शाहिरी काव्यांतील केशवकरणी, फटका इत्यादि जातींचा उद्धार कर किंवा साडेतीन श्लोकी यमकवैशिष्ट्ययुक्त रचना करून पाहा किंवा फुलांच्या परवरणींत केल्याप्रमाणें जवळ जवळ मुक्तबंध रचना कर इत्यादि गोष्टी त्यांनीं करून पाहिल्या व त्यांचाच प्रसार पुढें मराठी काव्यांत झाला. केशवसुतांनीं केलेले हे प्रयोग झपूर्झा, वातचक्र, म्हातारी, गोफण, तुतारी, परवरण, घुबड इत्यादि कवितांतून आपल्यास पाहावयास सापडतात. त्यांनीं वृत्तबद्ध कविता बरीच लिहिली हें खरें; पण वृत्ताकडून जातीकडे धडाडीनें पाऊल टाकलें व वृत्ताच्या चौकटींतून बऱ्याच अंशीं काव्याची मुक्तता केली. जुन्या स्त्रियांच्या अंजनी गीताचाहि उपयोग केला. म्हणजे काव्य हें केवळ वृत्तापेक्षां अधिक गेय करण्याचा व त्यांत संगीताचें प्राबल्य माजविण्याचा मात्र त्यांचा हेतु होता असें म्हणतां यावयाचें नाहीं. या बंधमुक्ततेचा परिणाम हळूहळू वृत्तरचना पाठीमागें पडून जातिरचनाच करण्यांत होईल व कवितांच्या डोक्यावर राग व ताल येऊन बसतील हें सारें त्यांना दिसलें असें नाहीं. काव्यरचनेंतील कृत्रिमता भाषादृष्ट्या जशी त्यांनीं काढली, तशीच वृत्त-दृष्ट्याहि काढण्याचा प्रयत्न केला इतकेंच. याच सुमारास संगीत नाटकेंहि लोकप्रिय झालीं असल्यानें त्यांतील पदांच्या चालींचा उपयोगहि कवि करूं लागले. पण हीं पदेंहि जेव्हां रचनादृष्ट्या किंवा म्हणण्याच्या दृष्टीनेंहि गुंतागुंतीचीं होऊं लागलीं तेव्हां सुदैवानें त्यांचा नाद कवींनीं सोडला. सोप्या चाली मात्र काव्यरचनेला उपयोगांत आल्या. त्या आतां रूढ होऊन बसल्या. वृत्तरचना फारशी न केलेले अलीकडील पुष्कळ कवि आहेत. पदांच्या चाली स्फुट रचनेला अनुकूल आहेत म्हणूनच त्यांचा प्रसार व स्वीकार झपाट्यानें होतो. परंतु काव्यार्थ थोडाहि लांबला तरी त्या कंटाळवाण्या होतात हा त्यांच्यामध्यें दोष आहे. वस्तुतः काव्यांत संगीताचें प्रमाण कमीच पाहिजे. नाहीं तर अर्थाकडे दुर्लक्ष होऊन गेयतेकडेच लक्ष लागतें. अर्थ हा काव्यांत शब्दाला दुय्यम होतां कामा नये. या पद्यपरिवर्तनांत एका परकीय अशा पद्य-

प्रकाराचा प्रवेश पुढें झाला. तो म्हणजे गझल. याचेंहि आगमन संगीत नाटकांच्या द्वारें झालें, व गेयता, रचना आणि विविधता या बाबतींत वृत्तांच्यापेक्षां अधिक अनुकूल असल्यानें तो झपाट्यानें लोकप्रिय झाला. या सामग्रीवर बरींच वर्षे नवीन काव्य होऊं लागलें. तिसऱ्या विस्ताराच्या कालांत रविकिरण-मंडळ व माधवराव पटवर्धन यांच्या परिश्रमानें या गझल-रचनेस शुद्ध शास्त्रीय स्वरूप आलें आणि जातिरचनेचेंहि अनेक जुने प्रकार नवीन शुद्ध स्वरूपांत योजण्यांत आले. मुद्रिका, बालमुकुंद, पञ्चकल्याणी, पुष्पिता इत्यादि जाति याचीं उदाहरणें होत. यांतच छंदांचें पुनरुज्जीवन व संस्करण यांची भर पडून गेय ओवीचा उपयोग अधिक प्रमाणावर होऊं लागला. यांतूनच न्यूनाधिक अक्षरसंख्याक असे प्राची छंदासारखे छंदहि मधून मधून दिसूं लागून गेयतेच्या दृष्टीनें कमी, परंतु विचार-प्रदर्शनास अनुकूल अशी रचना क्वचित् होऊं लागली. याचेंच अधिक उत्क्रांत असें स्वरूप मुक्तछंद हें होय. अद्यापि हे दोनहि प्रकार, विशेषतः मुक्तछंद, प्रयोगावस्थेंतच आहेत. पण कदाचित् भविष्यकालीन काव्याचीं हींच वाहनें होणार नाहींत कशावरून ?

काव्याच्या या बाह्य स्वरूपाचें यमक हें एक महत्त्वाचें अंग आहे व त्याच्याहि इतिहासांत एक आंदोलन होऊन गेलें. सुनीत-रचना करीत असतां यमकाचे कांहीं प्रयोग केशवसुतांना करावे लागले, व यमकाच्या स्वरूपांत कांहीं बदलहि झाला. क्वचित् निर्यमक रचनाहि त्यांनीं केली. पण त्याच्या बंधनांतून बाहेर पडण्याचा मनापासून व जोराचा प्रयत्न मात्र त्यांनीं केला नाहीं. तें कार्य काव्यरचनेंत त्यांचे शिष्य असलेले रेंदाळकर यांनीं धडाडीनें केलें व आपल्यापुरतें यमकबंधन तोडूनहि टाकलें. पण त्यांचा प्रयत्न चिरजीवी झाला नाहीं. नाथ निफाडकर यांनींहि निर्यमक रचना यशस्वी करून दाखविली. परंतु या दोघांनींहि सयमक रचनेवर बहिष्कार घातलेला नसल्यानें, त्यांच्याच पुरस्कारांत कमकुवतपणा आला असावा व यमकाचें उच्चाटन झालें नाहीं. नवीन मुक्तबंधाच्या पुरस्कारांत यमकनिवृत्ति हें एक महत्त्वाचें अंग असल्यानें पुनः यमकाचें आसन हादरूं लागलें आहे. पण मुक्तबंध यायलाच अद्यापि कांहीं काल जावा लागेल. तो येईलच असें नाहीं. तोंपर्यंत आणि जातिरचनेची लोकप्रियता कमी झाली नाहीं तोंपर्यंत यमकास फारशी भीति आहे असें नाहीं.

या ठिकाणीं काव्यरचनेस ज्यांच्याकडून उत्तेजन मिळत गेलें अशा व्यक्तींचा व संस्थांचा नामनिर्देश करणें कर्तव्य आहे असें मला वाटतें. दक्षिणा प्राइझ कमिटीचा उल्लेख प्रथम करणें कालदृष्ट्या व द्रव्यदृष्ट्या योग्य होईल. आरंभीच्या कांहीं दिवसांत बक्षिसें लावून तिनें काव्यरचना करविली. चिंतामणिपेठकर व कुरुंदवाडकर यांचीं गंगावर्णनें, पारखी व लेले यांचीं 'कृष्णाकुमारी' काव्यें, लेले यांचें 'रघुवंशाचें भाषांतर', व 'शिवाजीचरित्र'; पारखी यांचें 'षड्ऋतु-वर्णन' इत्यादि ग्रंथांस त्या वेळच्या मानानेंच नव्हे, तर सध्यांसुद्धां चांगलीं वाटतील अशीं पारितोषिकें देऊन काव्यरचनेची परंपराच जिवंत ठेवण्याचें श्रेय तिनें घेतलें म्हणावयास हरकत नाहीं. परंतु द्रव्यसाहाय्य न करतांहि प्रसिद्धि देऊन उत्तेजन देण्याचें कार्य आधीं विविधज्ञानविस्तारानें, नंतर करमणूक, नवयुग, उद्यान या मासिकांनीं केलें. मनोरंजनानें आधुनिक काव्याचा गौरव जेवढा केला तेवढा इतर मासिकांनी केला नसेल. पहिल्या पृष्ठाचा, बाजूच्या महिरपींचा मान मिळणें हाच मोठा गौरव कवीच्या काव्याचा त्या वेळीं वाटे. पुण्याच्या करमणूक साताहिकानेंहि नवकाव्याचें स्वागत केलें. परंतु या साऱ्यापेक्षांहि जवळ जवळ सतत चाळीस वर्षें स्वतः झीज सोसून केवळ काव्याकरितां चालविलेल्या 'काव्यरत्नावली' मासिकाचें व त्याच्या संपादकांचें ऋण या कालांतील मराठी काव्यावर केवढें आहे याचें शब्दानें वर्णन करणें शक्य नाहीं. केशवसुतांपासून रविकिरणमंडळांतील कवींपर्यंत साऱ्यांना त्यांत स्थान मिळालें होतें. केशवसुतांच्या कांहीं उत्कृष्ट कविता त्या मासिकांतून प्रसिद्ध झालेल्या होत्या. मराठी काव्याची एवढी सेवा करीत असूनहि त्या मासिकास ऊर्जितावस्था अशी कधीं प्राप्त झाली नाहीं, आणि अखेर तें बंद पडलें. यावरून निघणारीं अनुमानें आमच्या काव्याभिरुचीस फारशीं भूषणावह नाहींत. अलीकडच्या काळांत रत्नाकरादि मासिकांनीं काव्याची कांहीं बूज राखिली. पण एकंदरींत सध्यां काव्याच्या पानास जाहिरातीच्या पानापेक्षांहि सर्व दृष्टींनीं कमी किंमत असून, रिकामी जागा भरून काढण्याकडे त्यांचा उपयोग होतोसा दिसतो. ग्रंथ किंवा ग्रंथमालांत चंद्रशेखरांनीं संपादिलेला 'अर्वाचीन कविता' हा संग्रह; केळकर-अत्रे यांनीं संपादित 'महाराष्ट्र शारदे'चे दोन भाग; टिळक-केळकर-लेले इत्यादि मंडळींनीं संपादिलेल्या 'अभिनव-काव्य-माले'चे पांच भाग; इत्यादि ग्रंथांचा उल्लेख करावयास

हवा. गेल्या वीस वर्षांतील मराठी कवितेस मार्गदर्शन करण्याचें काम पुण्याचें शारदोपासक मंडळ आणि रविकिरणमंडळ व त्याचे सभासद यांनीं टीकाग्रंथ लिहून केलें याबद्दल त्यांना धन्यवाद द्यावयास हवेत.

गेल्या शतकांतील काव्याकडे पाहिल्यास निराशा किंवा दुःख होण्याचें कांहींच कारण नाहीं. झालें तर समाधानच व्हावयाला हरकत नाहीं. चंद्रशेखर, लेंभे, केशवसुत, माधवानुज, टिळक, तांबे, गडकरी, बी, बालकवि, विनायक, दत्त, गोविंद, माधवज्यूलियन, यशवंत, गिरीश, ते आजचे कुसुमाग्रज, बोरकर इत्यादि कवि पाहून व षड्ऋतुवर्णन, गंगावर्णन, गोदागौरव, वनवासी फूल, तुतारी, राजहंस, शोकावर्त, विरहतरंग वाचून मनास झालेलें सुख कोणता रसिक विसरेल? परंतु अशाहि स्थितींत असंतुष्ट असणारे टीकाकार आहेतच. कोणी महाकाव्यें किंवा प्रदीर्घ काव्यें फारशीं झालीं नाहींत म्हणून, तर कोणी तें काव्य निष्क्रिय स्त्रैण प्रेमावर उभारलेलें आहे म्हणून, तर कोणी त्यापासून संदेश मिळत नाहीं म्हणून नाखूष आहेत. परंतु हें सारें असमाधान काव्यापासून करावयाच्या अपेक्षा फार व्यापक अशा केल्यानें निर्माण झालेलें आहे व या अपेक्षा करण्याची सवय काव्याच्या पूर्वीच्या व्यापक अशा स्वरूपानें आपणांस लागली. यापूर्वींच आलेल्या विवेचनावरून आपणांस हें दिसून आलें असेल कीं, पूर्वीं कवीचें खरें क्षेत्र तितकेंसें लक्षांत न आल्यानें कादंबरीकाराचें किंवा कथालेखकाचें कामहि त्यालाच करावें लागे; तसेंच त्यास तत्त्वज्ञाचें, सुधारकाचें, उपदेशकाचें किंवा प्रेषिताचींहि कामें करावीं लागत. विषयविभागाबरोबर हीं कार्यें निरनिराळे लोक निरनिराळ्या मार्गांनीं करूं लागले आहेत. तेव्हां या कार्यांची अपेक्षा आपण केवळ कवींकडून करूं नये हें बरें. कर्मयोगाचा उपदेश भगवंतांनीं पद्यामध्यें केला, म्हणून त्याचें विशेष उद्घाटन टिळकांनींहि पद्यांत करण्याची आवश्यकता उरलेली नव्हती. 'स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे' अशा तऱ्हेचा संदेश सरळ गद्यांत देतां येण्याजोगी स्थिति नसती, तर तो पद्यांत अथवा काव्यांत टिळकांनीं दिला असता यांत शंका नाहीं. रामदासांनीं आपला तेजस्वी उपदेश दासबोध या ओवीबद्ध ग्रंथांत केला तो गद्यांत, किंवा व्याख्यानांतून करण्याची पद्धति नव्हती म्हणूनच. आगरकरांना आपला समाजसुधाणेचा प्रचार वर्तमानपत्रांतील अग्रलेखांतून करतां आला नसता

तर त्यांनींहि खडबडीत का होईना काव्यरचना केली असती; परंतु यामुळें या साऱ्या गोष्टी काव्याचे खरे विषय होतात, अथवा कवीच्या कर्तव्यक्षेत्रांत पडतात असें नाहीं. तीं तीं कामें त्या त्या निरनिराळ्या लोकांनींच करावयाचीं आहेत. प्रसंगानुरोधानें त्या त्या व्यक्ति कवीपेक्षां श्रेष्ठहि समजावयास हरकत नाहीं, किंबहुना त्या असतातहि. सामाजिक कार्यकर्ता, किंवा राजकीय पुढारी यांचें व्यावहारिकदृष्ट्या स्थान सध्यां तरी मोठें आहेच व तें असावयास पाहिजे. पण कवीनें ह्याहि भूमिका घेतल्या पाहिजेत व अशा दृष्टीनें मोठें झालें पाहिजे असा आग्रह कां? निष्क्रियतेच्या आक्षेपास उत्तर हें कीं, कोणत्याहि कलास्वादनाचें स्वरूप निर्हेतुक म्हणून निष्क्रिय अशा आनंदाचेंच असतें. नृत्य, संगीत, चित्रकला इत्यादि कलांपासून होणारा आनंद ( aesthetic joy ) याचें किंवा तत्त्वज्ञानानें होणाऱ्या आनंदाचें स्वरूप केवलानंदाचें असतें. सौंदर्यदर्शनापासून होणारा आनंद निर्हेतुक केवल स्वरूपाचा असेल तरच तो शुद्ध राहूं शकेल, नाहीं तर त्यांत स्वार्थापेक्षता शिरून त्याचें स्वरूप गढूळ होऊं लागेल. प्रत्येक गोष्टीचा उपयोग प्रचाराकरितां करूं इच्छिणाऱ्या या युगांत ही गोष्ट नीटशी लक्षांत न आल्यानें काव्याचा उपयोगहि राजकीय वा सामाजिक अभ्युदयाकरितां झाला पाहिजे असा आग्रह धरण्यांत येतो. इतर कलांच्याकडून ही अपेक्षा तितकीशी करण्यांत येत नाहीं. शिल्पकला किंवा संगीत यांच्यावर वरील आक्षेप घेतला गेल्याचें फारसें दिसून येत नाहीं. कारण त्यांचीं वाहनें अथवा साधनें निराळीं आहेत. दुर्दैवानें काव्याचें आणि उपरिनिर्दिष्ट कार्याचें साधन एकच म्हणजे शब्द हें आहे. साधनांच्या एकत्वामुळें साध्येंहि एकच आहेत असें समजलें जाऊन काव्यापासून करावयाच्या अपेक्षांमध्यें गफलत झाली व नवीन काव्यावर आक्षेप घेणें सुलभ झालें. जीवनदृष्ट्या कलांचें स्थान गौण किंवा दुय्यम आहे, तसें तें काव्याचेंहि खुशाल समजावें. पण त्यावर इतर कलांपासून ज्या अपेक्षा आपण करीत नाहीं त्या लादूं नयेत. सांप्रत जीवनविषयक स्थिति राजकीय, सामाजिक, वा आर्थिक दृष्टीनें बिकट झाली असतां, कलासेवा कांहीं काल बाजूला ठेवणें आवश्यक वाटत असल्यास ती जरूर ठेवावी, कारण जगणें हें अधिक महत्त्वाचें आहे. परंतु कलेला किंवा काव्याला वेसण घालून आपल्या क्षेत्राबाहेरचीं कामें करायला सांगण्यांत कोणाचाच लाभ नाहीं. कोणतेंच

नीट व शुद्ध स्वरूपांत होणार नाहीं. हा दृष्टिकोण स्वीकारल्यास आपल्या काव्यासंबंधानें असमाधान वाटण्याजोगें कांहीं नाहीं असेंच दिसेल. उलट त्याची मुक्तता इतर बंधनांतून झाली, त्याची आत्मलेखनक्षमता वाढली, त्यांत विविधप्रकारांचें वैचित्र्य आलें व विस्तार झाला या गोष्टी निखालसपणें अभिनंदनीयच झाल्या असें म्हणतां येईल.

ज्या विचाराची सूचना या समालोचनाच्या प्रारंभींच मीं केली होती, तो विचार अखेरीला करणें आलेंच. मराठी काव्याला ओहोटी लागली आहे, म्हणजे चांगलें अर्थात् नावीन्यपूर्ण, आपल्या वैशिष्ट्यानें आणि मौलिकतेनें मन वेधून घेणारें असें काव्य सध्यां कमी निपजूं लागलें आहे या गोष्टींत तथ्य नाहीं असें नाहीं. पण या घटनेची चर्चा करितांना इतर अनेक गोष्टींचा विचार करणें आवश्यक आहे. आधुनिक वाङ्मयसेवकांस आत्मप्रकटीकरणार्थ अलीकडे इतक्या विविध मार्गांचा आश्रय करितां येतो कीं, साहजिकच काव्याचा आश्रय करणारे लोक वाटले गेले. कोणी लघुकथा, तर कोणी लघुतम कथा लिहितो; कोणी नाटयछटा, तर कोणी गद्यकाव्य यांच्याकडे वळतो; शब्दचित्रें आणि लघुनिबंध यांतूनहि हें कार्य होऊं शकतें; तर मग गणमात्रा-लेखनाचा कृत्रिम खटाटोप वाटण्याजोग्या पद्यरचनेकडे कोण वळणार? तें काम श्रमाचें व दिवसगतीचें आहे. गद्यलेखनापासून व्यावहारिक अर्थप्राप्ति अधिक होते व यशाचा संभवहि अधिक, तेव्हां आपल्या भावना व विचार गद्यांत प्रकट करणें व्यवहारदृष्ट्याहि अधिक शहाणपणाचें नव्हे काय? शब्दांच्या संख्येवर मोबदला देणाऱ्या या युगांत शब्दवृद्धीला आळा घाल-णाऱ्या काव्याची वाढ व्हावी कशी? आणखीहि एक गोष्ट लक्षांत घ्यावयास पाहिजे. वाङ्मयांतहि विषयविभागाचें तत्त्व अमलांत येऊन ज्या ज्या काव्यांत कथनाचा किंवा नाट्याचा भाग पूर्वी येई, तो आतां शुद्ध काव्यांत येईनासा झाला आहे. प्रदीर्घ किंवा महाकाव्यलेखन केव्हांच थांबलें, व महाकवि केव्हां येणार अशी हाकाटी झाली याचें कारणहि अंशतः हेंच. प्रदीर्घ कथन कादंबऱ्यांतून अधिक सूक्ष्मपणें व सविस्तर असें करतां येऊं लागल्यानें त्याकरितां दीर्घ काव्यरचनेची आवश्यकता उरली नाहीं. अर्वाचीन काव्य स्फुट आणि त्रोटक होऊं लागण्याचें हें एक महत्त्वाचें कारण आहे.

पण याहीपेक्षां अधिक महत्त्वाचें कारण आधुनिकांच्या मनोवृत्तींतच बघावयास हवें. नवें काव्य आत्मानुभूतींतच निर्माण होणें शक्य आहे. याशिवाय इतर प्रकारच्या अनुभूतींना वाङ्मयाचे इतर प्रकार पुष्कळ मोकळे आहेत. आणि स्वतःच्या या अनुभूति जिव्हाळ्याच्या असतील तरच काव्यरूप पावतील. जिव्हाळा होता म्हणूनच गोविंद कवीसारख्या अल्पशिक्षिताचेंहि काव्य इतकें रसरशीत उतरलें. पण जिव्हाळा वाटण्याजोगें असें आधुनिकांना कांहींच दिसत नाहीं. जुन्या संस्कृतींत जिव्हाळा उरला नाहीं हे खरें, पण नवीन गोष्टींविषयींहि पूर्वीच्या सुधारकांप्रमाणें अभिनिवेश उरला आहे काय? देशांतील निरनिराळीं राजकीय ध्येयें आणि मतें परस्परांस छेद देऊन नवीनांच्या मनावर शून्याचाच परिणाम करीत आहेत. राष्ट्रीयत्व व आंतरराष्ट्रीयत्व एकमेकांस मारक होत आहेत. हिंसाहिंसांचें द्वंद्व त्यांचें त्यांसच घातक झालें आहे. आदराची खरी भावना कोणत्याच गोष्टीविषयीं वाटत नाहीं. गुरुजनांविषयीं नाहीं, तशीच स्त्रीजातीविषयीं नाहीं. देशाभिमान अमूर्त वाटतो, पण स्त्रैण का होईना मूर्त असें जिव्हाळ्याचें प्रेमहि कमीच. कोणत्याहि गोष्टीसंबंधानें जिव्हाळा वाटणें ही गोष्टच मुळीं हास्यास्पद होऊन बसली आहे. बुद्धिप्रामाण्यवाद म्हणजे कोणत्याहि गोष्टीच्या चांगुलपणावर विश्वास नसणें असा अर्थ झाला आहे. चिकित्सकवृत्तीचा अर्थ दोषदर्शन असा झाला असून, सर्वतुच्छत्वादाचेंच प्राबल्य माजलें आहे. दिसेल त्याचें विडंबन करावें, टर उडवावी, प्रेमासारख्या भावनाहि इतर क्षुधातृषादि शारीरिक गरजांपैकीं एक आहे असें मानावें अशा स्थितींत खऱ्या जिव्हाळ्यांतून निर्माण होणारें काव्य व्हावें कसें? केवळ एक उत्कट राजकीय ध्येय तरुणांपुढें नाहीं म्हणून हें असें होतें असें नाहीं. याहीपेक्षां तें खोल आहे. नव्या बुद्धिप्रामाण्यानें सर्वच बाबतींत साशंकतेची वृत्ति आपणांस शिकविली आहे, पण विचारानें आपण जेथवर जाऊं शकूं त्यावर तरी खरी श्रद्धा ठेवून असावें हें मात्र शिकवलें जात नाहीं. श्रद्धा उडवून लावणें, बुद्धिभेद करणें या गोष्टी सोप्या असतात, ती स्थिर करणें अवघड आहे. तें घरांतूनहि सध्यां होत नाहीं, व बाहेरून तर या प्रकारच्या वाङ्मयाचा एवढा भयंकर मारा होत आहे, कीं घरीं प्रयत्न करणाऱ्यांनाहि हताश व्हावें लागतें. ही स्थिति जोंवर चालू आहे, तोंवर इतर विषयांप्रमाणें

काव्याचीहि स्थिति सुधारणें कठीण आहे. कवि आणि काव्य यासारखा चेष्टेला दुसरा विषयच्च नसेल. त्याला मान अथवा बाजारभावहि कमी. असें असतां कोणता समंजस माणूस त्या काव्याच्या भानगडींत पडेल ! या बौद्धिक अराजकांतून जेव्हां कांहीं व्यवस्था निघेल अशा कालाची वाट पाहत बसण्याखेरीज काव्यभक्तांस सद्यःस्थितींत दुसरें कांहीं करतां येईल असें वाटत नाहीं.

---

होतो, तसाच प्रतिकूल परिस्थितींत त्या गुणांचा लोप होतो. मराठी भाषेंतील शास्त्रीय वाङ्मयाचा इतिहास हें एक या नियमाला पुष्टि देणारें उत्तम उदाहरण आहे.

मराठी भाषेंतील शास्त्रीय वाङ्मयाच्या वाढीला वरील सर्व नियम लागू पडतात. शास्त्राची वाढ बेताबाताची, तेव्हां शास्त्रीय वाङ्मयाची वाढ तशीच असणार हें उघड आहे. परिस्थितीच्या अडचणी नेहमींच असतात. सामाजिक, राजकीय, बौद्धिक या मुख्य; आणि आर्थिक, पारिभाषिक व लोकाभिरुचिविषयक या किरकोळ अडचणी सदोदित उभ्याच आहेत. परंतु बौद्धिक परिश्रमानें त्यांना पुष्कळशा प्रमाणांत बाजूला सारणें अशक्य नाहीं. वाङ्मय निर्माण करण्याचें विद्वानांनीं आणि लेखकांनीं मनांत आणलें तर भाषेचें दैन्य, शब्दांचा अपुरेपणा, योग्य प्रकारची वाक्यरचना या सर्व अडचणी एकदम नाहीं तरी हळूहळू दूर होतील. जी गोष्ट पूर्वी शक्य होती तीच आतां शैक्षणिक व बौद्धिक विकासास किती तरी नव्या सोई निर्माण झाल्यावर चमत्कारिकपणें अशक्य वाटूं लागली आहे.

प्रतिकूल परिस्थितींतसुद्धां ज्या मराठी भाषेंत "भारतीय ज्योतिःशास्त्र" व "ज्योतिर्विलास" यासारखे अप्रतिम शास्त्रीय ग्रंथ निर्माण झाले ती भाषा कसल्याहि बिकट परिस्थितींत कोणत्याहि शास्त्रीय विषयाचें सुलभ, बालबोध किंवा खास तज्ज्ञांसाठीं विशिष्ट प्रकारचें विवेचन करण्यास अपुरी पडेल अशी कल्पनासुद्धां करण्यास पुरेसा आधार दिसत नाहीं.

दुसऱ्या प्रश्नाचें उत्तर केवळ परिस्थितीवर अवलंबून आहे.

आपल्याकडे इंग्रजी भाषेचा इतका रुबाब वाढलेला आहे, कीं इंग्रजी भाषेच्या द्वारें व्यवहार करणें, विचारविनिमय करणें, यःकश्चित पत्रव्यवहार करणें हें शिष्टपणाचें लक्षण समजण्यांत येतें. ज्याला इंग्रजी येत नाहीं त्या माणसाची या पद्धतींत फारच कुचंबणा होते; आणि विलक्षण गोष्ट ही कीं, इंग्रजी उत्तम प्रकारें न येत असलेल्यांचीच आपल्याकडे जास्त लोकसंख्या आहे. आतां ती तशी राहील किंवा नाहीं व राहूं नये असें कोणाला वाटत असल्यास त्यासाठीं त्यानें कोणकोणते उपाय योजावे लागतील यासंबंधीं येथें चर्चा करणें अप्रस्तुत आहे. परंतु केवळ इंग्रजीसारखी जगतांत मोठेपणा

मिळविलेली भाषा अवगत नाहीं म्हणून आपल्याकडील कित्येक लोकांना आधुनिक शास्त्रीय ज्ञान पारखें झालें आहे यांत शंका नाहीं. हिंदुस्थान शेती-प्रधान आहे, येथें सर्व प्रकारचीं खनिजें उपलब्ध आहेत, जलौघशक्ति अमर्यादित आहे, एकंदरींत सृष्टिजन्य संपत्ति इतकी मोठी आहे कीं, शास्त्रीय सुधारणा करवून आणल्या तर हिंदुस्थानला दुसऱ्या कोणत्याही देशाकडे पाहण्याची जरूरी पडणार नाहीं. हीं किंवा अशाच तऱ्हेचीं कित्येक विधानें आपण स्वतः करतों किंवा ती परकीयांच्या तोंडून आपण ऐकीत आलों आहोंत परंतु त्याचा उपयोग काय? वरवर पाहतां कित्येक शास्त्रीय सुधारणा देशांत झालेल्या दिसतात खऱ्या, परंतु त्यांचा आपल्या सार्वजनिक शास्त्रीय प्रगतीला फारच थोडा फायदा झाला. अनेक तऱ्हेची यंत्रसामुग्री उपयोगांत येऊं लागली व त्यामुळें काल व मेहनत यांची बचत झाली परंतु खर्च वाढला. कारण यंत्रसामुग्रींत कांहीं भाग शास्त्रशुद्ध नाहींत म्हणून नव्हे, तर आपण त्या बाबतींत सर्वस्वीं परदेशावर अवलंबून राहत आहों म्हणून. आधुनिक वैद्यक प्रचारांत आलें, विजेच्या गाड्या सुरू झाल्या, मोटारी चालू आहेतच त्यामुळें कित्येक बैलगाड्यांना व घोडागाड्यांना धक्का बसला. मोटारीनें व्यापाराचा वेग वाढला व पुष्कळ दृष्टीनें सोय झाली; परंतु केवळ त्यामुळें आपल्या देशाला शास्त्रीय दृष्टया काय फायदा झाला? नौकानयन देशभर चालू झालें. बिनतारीचा उपयोग करण्याची सर्वसाधारणपणें जनतेला गोडी लागली. शेतीभातींत रासायनिक खतें वापरण्याची पद्धति रूढ होत चालली, कारण त्यांचा पिकाला चांगला उपयोग होतो. शीतकाचा उपयोग केल्यानें द्राक्षादि नाजुक फळें, मासे किंवा दूध, लोणी न बिघडतां दूरदूर अंतरावर पाठविणें शक्य होऊं लागलें. अशा रीतीनें शास्त्रीय उपकरणांशीं सर्वसाधारण माणसाचें जास्त जास्त संघट्टण होऊं लागलें आहे व त्या कारणास्तव या सर्व प्रकारच्या, निदान ज्याच्याशीं आपला जास्त संबंध होतो त्या, शास्त्रीय योजनांची कामचलाऊ माहिती अगदीं अवश्य होऊन बसली आहे. यांत शिक्षणाचा भाग नाहीं, यांत जातीचा प्रश्न येत नाहीं, वयाचा नाहीं, स्त्री-पुरुष असा भेद उरत नाहीं, खेड्यांत राहणारा, शहरांत राहणारा असाहि फेरफार कोणाला करतां येणार नाहीं. कदाचित् शास्त्रीय ज्ञानाची वाढ पुरेशी झालेली नाहीं व भाषेची अडचण दूर करण्याचाहि आपण नेटानें

प्रयत्न केला नाहीं म्हणूनच खेड्यांत राहणारे व शहरांत राहणारे असे मनुष्य-वस्तींतले दोन स्वतंत्र गट कल्पिण्याची आपल्यांत प्रथा पडली असावी असा जबर संशय येतो.

शास्त्रीय ज्ञान शाळेंत व कॉलेजांतच शिकलें पाहिजे असें नाहीं. शेतकऱ्याला, नावाड्याला, डोंगरांतल्या भिल्लाला, कारखान्यांतील मजुराला, मोटार चालविणाराला, पाटीवाल्याला, गांवांत दूध घालणाऱ्याला, उपाहारगृहांत काम करणाऱ्याला, सर्वांना इंग्रजी येत नसलें तरी त्यांना शास्त्रीय ज्ञानाची आवश्यकता नाहीं असें म्हणण्यास सध्यांच्या काळांत तरी कोणी धजणार नाहीं.

आजकाल चालू असलेल्या साक्षरताप्रसाराच्या जबरदस्त चळवळींत प्रत्येक महाराष्ट्रीयाला मराठी आलें पाहिजे येवढाच आपला आग्रह आहे. त्याला मराठी लिहितां-वाचतां येऊं लागलें म्हणजे त्याची वेगानें प्रगति होऊं लागेल अशी आपली कल्पना. त्याला मराठींतून पत्रव्यवहार करतां येईल, मराठींतून समाज, भूगोल, धर्म, गणित या विषयांचें शिक्षण मिळूं शकेल. इतिहास व शास्त्र यासंबंधीं कांहीं गोष्टी आपल्याला कधींच समजावयाच्या नाहींत अशा निराशावस्थेंत त्याला खितपत पडावें लागणार नाहीं; व या सर्व गोष्टींमुळें त्याची मानसिक व शारीरिक प्रगति होत जाईल व सध्यां जें त्याला अज्ञानांत खितपत पडावें लागतें तें लागणार नाहीं. हीच साक्षरताप्रसाराची मूळ कल्पना.

शास्त्रीय ज्ञानाचा प्रसार झाला पाहिजे ही गोष्ट सुशिक्षित वर्गाला यापूर्वींच माहिती झालेली होती; परंतु त्यांचा इंग्रजी भाषेवर जास्त भर असे. त्याचा परिणाम असा झाला कीं, शास्त्रीय ग्रंथ मराठींत झालेले नाहींत म्हणून ते आम्ही आपल्या मुलांना वाचण्यास देऊं शकत नाहीं असें म्हणणारे कांहीं शास्त्रप्रेमी आढळतात. किंवा आमच्या मुलांना हायस्कूलमध्यें गेल्यानंतर इंग्रजी भाषा येऊं लागेल व नंतर शास्त्रीय विषय आपोआपच इंग्रजीमधून वाचावयास मिळतील असें प्रतिपादन करणारेहि कांहीं समाधानवृत्तीचें लोक सापडतात.

वर दर्शविलें आहे कीं, मराठी भाषा कायमची व्यवहार व ज्ञान-भाषा राहील किंवा नाहीं हा जरी वादग्रस्त मुद्दा असला तरी नुसता वाद घालीत

बसण्यांत हशील नाहीं. आज सर्व समाजाची भाषा, मातृभाषा, बोधभाषा व शिक्षणभाषा मराठी आहे, व ती अशीच निःसंशय कित्येक पिढ्यांपर्यंत राहणार यांत शंका नाहीं. अशा परिस्थितींत शास्त्रीय ज्ञानाचा प्रसार मातृभाषेंतून म्हणजे आमच्या मराठींतूनच झाला पाहिजे. प्रसार व्याख्यानांच्या, बोलपटांच्या, प्रयोगांच्या किंवा वाङ्मयाच्या साहाय्यानें होऊं शकेल.

महाराष्ट्रीय विद्वान् वाङ्मयदृष्ट्या मराठींतून शास्त्रीय ज्ञानाचा प्रसार करण्यासाठीं काय प्रयत्न करीत आहेत याचा उलगडा पुढील विवेचनांत केलेला आहे—

"गेल्या शंभर वर्षांतील मराठी शास्त्रीय वाङ्मयाची वाढ" हा विषय कोणत्याहि प्रगतिपर संस्थेस शोभण्यासारखा आहे, परंतु त्यांत सूक्ष्म दृष्टीनें अवलोकन करणारालाच वाढ झाल्याचें दिसून येईल. सर्वसाधारण समाजाचें शास्त्रीय वाङ्मयाकडे, विशेषतः मराठी शास्त्रीय वाङ्मयाकडे पुरेसें, लक्षच नसतें. तेव्हां त्यांच्या नजरेंत भरण्यासारखी वाढ त्यांत झालेली नाहीं असा शेरा प्रारंभींच देऊन टाकला तरी गैरसमज होण्याचा संभव उरणार नाहीं. सुमारें पंचवीस वर्षांपूर्वी 'विविधज्ञानविस्तार' मासिकांत "भारतीय शास्त्रीय संशोधनाची शंभर वर्षांतील प्रगति" यासारख्या विषयाची चर्चा करतांना प्रस्तुत लेखकाला हीच अडचण भासली होती. वाढ सूक्ष्म असल्यामुळें तिची मोजदाद करणें फार अवघड असते व वाढ नाहींच असा भास होतो. वनस्पतीची वाढ होत असतांना चित्रपटद्वारा तिचें लेखन करावयाचें असल्यास दर सेकंदास २० चित्रें घेऊन परवडत नाहीं. म्हणून दोन तासांनीं किंवा चार तासांनीं एक चित्र, असें महिनेच्या महिने चित्रलेखन केल्यावर वाढ काय वेगानें होते याचा अंदाज करतां येतो.

आपल्या मराठी शास्त्रीय वाङ्मयाची हुबेहुब अशीच कांहींशी अवस्था आहे. वाढ फारच सूक्ष्म आहे व दिवसेंदिवस इतर विषयांतील वाङ्मयाची वाढ झपाट्यानें होत असतांना, शास्त्रीय वाङ्मयाला मात्र मिळावी तेवढी चालना मिळालेली दिसत नाहीं.

मराठी वाङ्मयाच्या इतिहासांतून निरनिराळ्या विषयांवरील वाङ्मयाची कसकशी वाढ होत गेली त्याचें पृथक्करण करतां येतें.

इ. स. १८०५ ते १८३६ पर्यंतच्या कालांत फारच थोडीं मराठी पुस्तकें प्रसिद्ध झालीं. ही गोष्ट सकृद्दर्शनीं चमत्कारिक वाटण्यासारखी आहे, परंतु त्या वेळची परिस्थिति लक्षांत घेतां थोडीं तरी पुस्तकें निर्माण झालीं ह्यांतच अभिमान वाटतो. १८१८ ते १८२७ या दहा वर्षांच्या अवधींत फक्त तीनच पुस्तकें प्रसिद्ध झालीं, आणि तीं इंग्रजी अमदानींतील मराठी वाङ्मयांतील पहिलीं तीन पुस्तकें सरकारी प्रयत्नांनींच तयार करवून छापविलीं होतीं. दहा वर्षांत प्रसिद्ध झालेलीं तीनहि पुस्तकें गणितविषयावर असून कर्नल जर्व्हिस यांनीं आपल्या विद्यालयांतील छात्रवर्गाच्या उपयोगासाठीं तीं भाषांतररूपानें लिहिलीं होतीं.

पुढील दशकांत म्हणजे १८२७ ते १८३६ या सालांत एकंदर दहा पुस्तकें मराठींत तयार झालीं. दादोबा पांडुरंगांचें व्याकरण व मोल्स्वर्थकृत इंग्रजी-मराठी कोश हे ग्रंथ वगळले तर, बाकीचे सर्व शास्त्रीय विषयावरच होते. डॉक्टर मॅक्लीमन यांचीं वैद्यकावरील दोन पुस्तकें, बाळशास्त्रीं जांभेकर यांचीं भूमिति, भूगोल, विज्ञान इत्यादि विषयांवरील सहा पुस्तकें, आणि हरी केशवजी पाठारे यांचें "सृष्टिशास्त्र" नांवाचें एक पुस्तक हीं त्याच कालांत प्रसिद्ध झालीं.

१८३७ पासून १८४७ च्या अवधींत एकंदर तीस पुस्तकें प्रसिद्ध झालीं. त्यांत हरी केशवजी यांचीं ज्योतिष व रसायनशास्त्र यावरील दोन आणि जर्व्हिस यांचें महत्त्वमापन हीं शास्त्रीय पुस्तकें आढळतात.

त्याच्या पुढच्या १८४७ ते १८५७ च्या कालांत जीं एकंदर १०२ पुस्तकें झालीं, त्यांत शास्त्रीय विषयावर फक्त तीनच ग्रंथ होते. परंतु स्वतंत्र शास्त्रीय लेखनास याच काळांत सुरुवात झाली ही गोष्ट विशेष लक्षांत घेण्यासारखी आहे. यापूर्वीं मुख्य भर भाषांतरावर असे. केरो लक्ष्मण छत्रे यांचें सृष्टिशास्त्रा-वरील पुस्तक भाषांतररूप असून, कृष्णशास्त्री भाटवडेकर यांचें "आगगाड्या" व गोविंद गंगाधर फडके यांचें "यंत्रशास्त्र" हीं दोन्ही पुस्तकें स्वतंत्र-पणें लिहिलेलीं होतीं.

यानंतरच्या कालांत ग्रंथप्रकाशनाचें मान पुष्कळ वाढलें. १८५७ ते १८६४ पर्यंतच्या आठ वर्षांत एकंदर ५५० पुस्तकें निर्माण झालीं, व त्यांत

भाषांतररूप असे फक्त चारच ग्रंथ होते. कृष्णशास्त्री भाटवडेकर यांचे आर्यवैद्यकासंबंधीं "माधवनिदान", "त्र्यंबकी" व "वैद्यजीवन" हे ग्रंथ संस्कृतांतून मराठींत भाषांतरद्वारा आणलेले असून, कृष्णशास्त्री गोडबोले यांनीं चेंबरच्या ॲस्ट्रोनोमीचें भाषांतर करून ज्योतिषशास्त्र मराठी वाचकांना उपलब्ध करून दिलें होतें. या काळांत एकंदर आठनऊ स्वतंत्र ग्रंथ तयार करण्यांत आले त्यांतील कांहींचा प्रामुख्यानें उल्लेख करणें अवश्य आहे :—

| | |
|---|---|
| डॉ. नारायण दाजी ... | ... रसायनशास्त्र, वैद्यक |
| प्रो. दाजी नीलकंठ नगरकर... | ... शंकुच्छेद |
| डॉ. भिकाजी अमृत ... | ... शारीरशास्त्र |
| प्रो. केरोपंत छत्रे ... | ... ग्रहसाधनाचीं कोष्टकें |
| कृष्णशास्त्री भाटवडेकर ... | ... विद्युत् |
| हरिचंद चिंतामण ... | ... प्रकाशलेखन |
| महादेवशास्त्री पुराणिक ... | ... भूवर्णन |
| गोविंद गंगाधर फडके ... | ... यंत्रशास्त्र |

तात्कालीन प्रचलित असलेल्या बहुतेक शास्त्रीय विषयांवर स्वतंत्र ग्रंथ तयार झाले यावरून त्या वेळीं—पाऊणशें वर्षांपूर्वी— मराठी भाषेची उपयुक्तता लोकांना पटली होती ही एक, व परिभाषेच्या काल्पनिक अडचणीमुळें ग्रंथनिर्मिति थांबली नाहीं ही दुसरी, या दोन्ही गोष्टी एकदमच सिद्ध होतात. **प्रबल इच्छा आणि लेखनशैली असल्यावर तज्ज्ञाला शास्त्रीय विषयाची मातृभाषेंतून फोड करण्यांत आनंद वाटावा का कष्ट पडावे?** परंतु जी गोष्ट शंभर वर्षांपूर्वी सहज होत होती तिच्या शक्याशक्यतेविषयीं आज शुष्क वादविवाद चालू आहे !

सन १८६४ ते १८९४ या सुमारें तीस वर्षांत मराठी ग्रंथांची वाढ फार झपाट्यानें झाली. एकंदर ५,००० ग्रंथ स्वतंत्र व सुमारें १,००० ग्रंथ भाषांतररूप होते. त्यांतच सुमारें २,००० ग्रंथ जीर्णोद्धाररूपानें पुन्हा प्रसिद्ध करण्यांत आले होते. या काळांत केवळ शास्त्रीय विषयांवर ३९१ ग्रंथ प्रसिद्ध झाले; परंतु त्यांत स्वतंत्र किंवा भाषांतररूपानें किती पुस्तकें होतीं याचा अंदाज

करतां येत नाहीं. बरींचशीं पुस्तकें वैद्यकावरील होतीं एवढें मात्र निश्चित आहे. वैद्यकांत इंग्रजी भाषांतरांची जास्त भर पडली असावी असें वाटण्याचा संभव आहे खरा, परंतु या बाबतींत इंग्रजी व संस्कृत या दोन्ही भाषांकडून मराठी वाङ्मयाच्या अभिवृद्धीस सारखीच मदत झालेली दिसते. वास्तविक पाहिलें तर ब्रिटिश अमदानींतील प्रारंभीच्या काळांत मराठी भाषेंतून वैद्यशास्त्र शिकविण्याचे वर्ग सुरू झाले म्हणून या विषयावरील इंग्रजी ग्रंथांचीं भाषांतरें जन्मास आलीं; नाहीं तर त्यांस जग दिसलें नसतें. मुळांत विद्यार्थ्यांकरितां म्हणून तयार केलेलीं पुस्तकें सर्वसामान्य लोकांकरितां उपयोगीं पडूं लागलीं. वैद्यक शिकविण्याच्या वर्गांत प्रारंभीं मराठींतून शिक्षण देण्यांत येत असे, परंतु हा क्रम कांहीं वर्षांनीं बंद पडला. त्याचा मराठी वाङ्मया-वर फार अनिष्ट परिणाम झाला. मराठींत शास्त्रीय विषयांवर मोठमोठे ग्रंथ निर्माण होण्याचा हा मार्ग बंद पडला आणि त्यानंतर त्यास कोठून उत्तेजनहि मिळेनासें झालें. त्या काळीं इंग्रजी वैद्यकग्रंथांची जेवढीं भाषांतरें झालीं त्याच्या दुप्पट भाषांतरें संस्कृतांतून झालेलीं होतीं. शास्त्रीय ग्रंथ— किंवा साधारणपणें कोणतेहि ग्रंथ— मातृभाषेंत निर्माण होण्यास, मग ते स्वतंत्र रूपानें असोत किंवा भाषांतररूपानें असोत, अनुकूल परिस्थितीची फार मदत होते ही गोष्ट पाऊणशें वर्षांपूर्वीच्या या अनुभवावरून अगदीं स्वच्छ दिसून येते.

१८६४ ते १८९६ या बत्तीस वर्षांत शास्त्रीय आणि इतर ग्रंथांचें प्रमाण सुमारें १ : १२ असें पडतें.

१९३५ सालापर्यंत मुंबई ग्रंथसंग्रहालयांत एकंदर ११,००० पुस्तकें नोंदलेलीं सांपडतात. त्यांत ३८१ वैद्यकीय, २०० शास्त्रीय, २७९ शेतकी, हुन्नर, संगीत इत्यादि विषयांवर, व १४९ गणित, ज्योतिष, यांवर आहेत. यांची बेरीज १००९ इतकी होते. या सर्व पुस्तकांचा शास्त्रीय वाङ्मयांत समावेश केला तर त्याचें इतर वाङ्मयाशीं १:११ असेंच प्रमाण पडतें. पुस्तक-निर्मितीवरून अंदाज केल्यास सध्यांची परिस्थिति पूर्वीप्रमाणेंच अनुकूल असावी असें वाटतें, परंतु वस्तुस्थिति मात्र अगदीं निराळी आहे. सध्यांचें यंत्रयुग असून भौतिक सुधारणा फार उच्च अवस्थेला पोंहचल्या आहेत. आणि

आपल्या व्यवहारांत त्यांचा अमर्याद समावेश झालेला आहे. अशा वेळीं शास्त्रीय वाङ्मयाची झपाट्यानें वाढ व्हावयास पाहिजे होती, परंतु त्याची उपेक्षा चालू आहे असेंच चारी बाजूला आढळतें.

पूर्वीच्यापेक्षां सध्यांची परिस्थिति शास्त्रीय वाङ्मयनिर्मितीस सोईची आहे. ब्रिटिश अमदानींतील पहिलीं दहा वर्षें शास्त्रीय व इतर वाङ्मयाचें प्रमाण ३ : ० होतें. **शास्त्रीय वाङ्मय मराठींत उत्पन्न करतां येणें शक्य आहे, ही गोष्ट आधुनिक कालांत वादग्रस्त असली तरी, पूर्वीच्या पिढींतील विद्वानांचा तीवर अपरंपार विश्वास होता. पुढें कालानुसार हा विश्वास डळमळला,** किंवा परिस्थिति अचानकपणें बदलली, किंवा शास्त्रीय विषयां-व्यतिरिक्त वाङ्मयनिर्मिति करण्याकडे विद्वानांची जास्त प्रवृत्ति होऊं लागली तेव्हांपासून आतांपर्यंतच्या प्रत्येक दशकांतले प्रमाण मिळवितां आलें नाहीं, तरी, १९१७ ते १९२७ या दहा वर्षांत शास्त्रीय पुस्तकें १४० प्रसिद्ध झालीं. त्यांत वैद्यक ३०, ज्योतिष २५, प्राणिशास्त्र १२, पदार्थविज्ञान १९, यंत्रशास्त्र ६, शेतकीबागाईत ३०, गृहशास्त्र, व्यापार व इतर किरकोळ कला यांवर १८ पुस्तकें निर्माण झालीं. इतर वाङ्मयाशीं यांचें प्रमाण फार सूक्ष्म पडतें. खरोखर पाहिलें असतां या कालांत शास्त्रीय वाङ्मय अवश्य वाढावयास पाहिजे होतें. हा कालच विशेष शास्त्रीय सुधारणांचा होता. प्रत्येक उद्योग, धंदा, कला यांत एकसारखी शास्त्रीय ज्ञानाची भर पडत होती. ह्यास लागणारीं साधनेंहि एक-सारखीं बदलत होतीं. निरनिराळया अपूर्व शास्त्रीय शोधांमुळें जगांतील सर्व प्रमुख भाषांत नवीन नवीन शब्दांचा भरणा होत होता व तद्विषयक वाङ्मय एकसारखें वाढीस लागलें होतें. आधुनिक समाज सर्वस्वीं या सुधारणांवर अवलंबून असल्यामुळें त्या त्या शाखेंतील परिभाषा व ग्रंथसंग्रह विलक्षण वेगानें वृद्धिंगत होत होता. पण आपलें मराठी शास्त्रीय वाङ्मय पूर्णपणें निष्क्रिय पडून राहिलें होतें! या दहा वर्षांत एकशेंपंधरा शास्त्रीय पुस्तकें म्हणजे महिन्यास जेमतेम एक पुस्तक बाहेर पडलें.

गेल्या पांच वर्षांत ( १९३५–१९४० ) मराठींत कांहीं शालोपयोगी पुस्तकें निर्माण झालीं. त्याशिवाय नजरेंत भरण्यासारखे जे शास्त्रीय ग्रंथ तयार झाले ते पुढें दर्शविले आहेतः—

| | | |
|---|---|---|
| विज्ञानबोध | ... | प्रकाशक : श्री. श्री. म. माटे. |
| महाराष्ट्र शब्दकोश | ... | प्रकाशक : महाराष्ट्र कोश मंडळ लि., पुणें. |
| व्यावहारिक ज्ञानकोश. | ... | प्रकाशक : व्यावहारिक ज्ञानकोश मंडळ लि. कोल्हापूर. |

पहिला ग्रंथ अतिशय उत्कृष्ट असून अशा तऱ्हेचे ग्रंथ वरचेवर प्रसिद्ध होणें फार हितावह होईल अशी खात्री वाटते.

वर दिलेले आंकडे अगदीं बिनचूक नसले तरी वस्तुस्थितीचें चित्र आपल्या-पुढें उभें करण्यास ते पुरे आहेत. बदललेल्या परिस्थितीच्या अनुरोधानें आपण चाललों आहों किंवा तिच्याशीं जाणूनबुजून विरोध करीत आहों ही गोष्ट प्रत्येक शिक्षणप्रेमी प्रागतिकानें विचार करण्यासारखी आहे. भाषेच्या अपूर्णत्वाला दोष देऊन स्वस्थ बसण्यांत हशील नाहीं. **कोणतीहि पूर्णत्वास आलेली भाषा आणि तिच्यांतील केवढाहि मोठा ग्रंथसंग्रह वेगानें बदललेल्या परिस्थितींत अपूर्णच ठरेल. तिला पूर्ववत् पूर्णत्वास नेण्याची जबाबदारी सर्वस्वीं आपली** आहे. परिस्थितीला दोष देऊन स्वस्थ न बसतां नेटानें ग्रंथलेखन करून तिचें पूर्णत्व शाबीत करणें हेंच आपल्यांतील सुशिक्षितांचें आद्य कर्तव्य आहे.

## शास्त्रीय नियतकालिकें

आतांपर्यंत फक्त शास्त्रीय ग्रंथनिर्मितीबद्दल चर्चा केली. नुसत्या ग्रंथ-निर्मितीनें वाङ्मयाची सर्वांगीण सिद्धता होत नाहीं, या नियमाला शास्त्रीय विषय अपवाद नाहींत. शास्त्रांतील मूलतत्त्वें पुष्कळांशीं अबाधित राहतात व शास्त्रीय प्रमाणग्रंथ छापणें खर्चाचें असल्यामुळें ते वरचेवर प्रसिद्ध होत नाहींत, या दोन्ही गोष्टी खऱ्या असल्या तरी इतर विषयांप्रमाणेंच शास्त्रीय विषयांचें विवेचन निरनिराळ्या प्रकारांनीं होणें अवश्य असतें. कांहीं पुस्तकें क्रमिक पद्धतीचीं असून फक्त शालोपयोगी असतात. कांहींत शुद्ध शास्त्रीय विषयांची बालबोध व सुलभ भाषेंत चर्चा केलेली असते. कांहीं ग्रंथ फक्त तज्ज्ञां-साठींच लिहिलेले असतात. लेखकाची भाषा, विषय समजावून सांगण्याची शैली, वाचकांची ज्ञानमर्यादा, व सामाजिक परिस्थिति विचारांत घेतां

एकाच विषयावरील ग्रंथलेखन किती तरी निरनिराळ्या प्रकारांनीं करतां येण्यासारखें आहे.

ग्रंथांना जें कार्य करतां येणें शक्य होत नाहीं तें नियतकालिकांमार्फत सहज घडवून आणतां येतें. नियतकालिकाच्या एकाच अंकांत विविध विषयांवर लेख प्रसिद्ध करतां येत असून, त्यांची फोडहि निरनिराळ्या वाचकांच्या ग्राहकबुद्धीस अनुसरून करतां येणें शक्य असतें. जागतिक शास्त्रीय प्रगतींतील कित्येक नवीन नवीन विचारसरणींचा व व्यावहारिक योजनांचा त्यांत उल्लेख करतां येऊन वेळेनुसार त्यांचें स्पष्टीकरणहि देतां येतें व त्यामुळें वाचकांची शास्त्रीय विषयाबद्दलची जिज्ञासा पुष्कळ प्रमाणांत तृप्त करतां येते. नियतकालिकांचें हें विशेष कार्य ग्रंथांचेमार्फत होण्यासारखें नाहीं.

मराठी भाषेंतील नियतकालिकांचा गेल्या शंभर वर्षांतील इतिहास मननीय आहे. त्यावरून आपली शास्त्रीय विषयक वाङ्मयाबद्दलची अनास्था दिसून येते.

अगदीं प्रारंभीं म्हणजे शंभर वर्षांपूर्वी मराठी विद्वान् व भाषासेवक शास्त्रीय विषयांतील ज्ञानप्रसाराचें कार्य उत्साहानें बजावीत होते. **काव्य, संगीत, कला, इत्यादि विषयांची आवड त्या वेळच्या वाङ्मयाभिमान्यांना नव्हती असें नाहीं; पण त्यांनीं शास्त्रीय विषयांची उपेक्षा केली नाहीं.**

इसवी सन १८०८ ते १८५७ सालापर्यंत जीं एकंदर तेरा मासिकें सुरू झालीं त्यांत तीन केवळ शास्त्रीय विषयांस वाहिलेलीं होतीं. त्यांपैकीं "ज्ञानप्रसारक" नांवाचें एक मासिक एल्फिन्स्टन कॉलेजांतील महाराष्ट्रीय विद्वानांनीं चालविलेलें होतें. हें मासिक १७ वर्षें चालवल्यावर १८६७ सालीं रामचंद्र भिकाजी गुंजीकर यांनीं त्याचें "विविधज्ञानविस्तारां"त रूपांतर केलें. त्यांत वासुदेव बापू वगैरे तज्ज्ञ रसायनशास्त्रविषयक माहिती सुंदर मराठींत देत असत. दुसरें "दिग्दर्शन" नांवाचें मासिक बाळशास्त्री जांभेकर यांनीं चालविलें होतें.

प्रारंभीच्या पन्नास वर्षांतील शास्त्रीय व इतर मासिकांचें १ : ३ असलेलें प्रमाण १८५७–१८८५ मध्यें १ : ४ वर घसरलें. या कालावधींत शास्त्रीय विषयांवर १० मासिकें निरनिराळ्या वेळीं चालू होतीं. हीं सर्व मासिकें जरी

सर्वस्वीं शास्त्रीय विषयांस वाहिलेलीं नसलीं तरी त्यांत त्या विषयांना पुष्कळ जागा मिळत असे.

१८८६ ते १९१७ या कालावधींत ८ शास्त्रीय व ३८ इतर मासिकें वेळोवेळीं चालू असल्याचें आढळतें. त्यांचें प्रमाण सुमारें १ : ५ पडतें.

१९१७ ते १९२४ या कालावधींत फक्त नऊ शास्त्रीय मासिकें सुरू झालीं. त्यांचें त्याच कालांतील इतर विषयांवरील मासिकांशीं प्रमाण १ : ६ पडतें. "ज्योतिर्भूषण" व "व्यापार-ज्योतिष" यांचा शास्त्रीय सदरांत समावेश केला आहे, परंतु तीं गाळलीं म्हणजे तें याहीपेक्षां कमी पडेल.

या कालांतील मासिकांचा इतिहास फार चमत्कारिक आहे. नऊ शास्त्रीय मासिकांपैकीं फक्त एकदोनच टिकाव धरून राहिलीं, पण इतर विषयांतील ५२ मासिकांपैकींहि दोन-तीनच तगलीं. यावरून टिकाऊपणांत शास्त्रीय मासिकांचा नंबर वर लागतो, आणि तीं इतरांप्रमाणें अकालीं मृत्युमुखीं पडत नाहींत असें अनुमान निघतें.

अगदीं अलीकडच्या दहा वर्षांत म्हणजे १९२४ ते १९३४ या कालांत मराठी वाङ्मयाचा विस्तार बराच झाला आहे असें आपण मानतों. या कालांत एकंदर सहा शास्त्रीय मासिकें जन्माला आलीं. त्यांतील फक्त दोनच अद्यापि अस्तित्वांत आहेत, बाकीचीं नामशेष झालीं. "सृष्टिज्ञान*" १९२८ मध्यें सुरू होऊन शास्त्रीय वाङ्मयवृद्धीला तें हातभार लावीत आहे. शास्त्रीय विषयांव्यतिरिक्त ४८ मासिकें निघालीं आणि त्यांतील २८ लवकरच बंद पडल्याचें नमूद आहे. त्यानंतरच्या कालांतील नांव घेण्यासारखी केवळ शास्त्रीय विषयांचीच चर्चा न करणारीं मासिकें म्हणजे 'लोकशिक्षण' व 'सह्याद्रि' हीं होत. इतर नियतकालिकें असंख्य निर्माण झालीं व असंख्य मृत्यु पावलीं तरी नवीन नवीन दर महिन्यास सुरू होतच आहेत. सामाजिक व औद्योगिक परिस्थितीस अनुसरून शिक्षणाची व तदनुषंगिक वाङ्मयाची वाढ व्यवस्थितपणें व हौसेनें झाली असती, तर शास्त्रीय वाङ्मयाचें इतर वाङ्मयांशीं असलेलें प्रमाण इतक्या वेगानें खालीं घसरलें नसतें.

*१८८० सालीं डॉ. सखाराम अर्जुन यांनीं सुरू केलेलें एक "सृष्टिज्ञान" नांवाचें मासिक चालू होतें.

लेखक व वाचक यांच्या परस्परसंबंधाचा योग्य विचार करणें अवश्य आहे; नाहीं तर कित्येक प्रसंगीं दोघांचीहि दिशाभूल होण्याचा संभव असतो. वाङ्मय हेतुपुरःसर निर्माण करावयाचें असतें. लेख वाचले जाऊन वाचकांना त्यांत आनंद वाटावा व त्यांचें बौद्धिक मनोरंजन व्हावें हा लेखकाचा मुख्य उद्देश असला पाहिजे. अशा प्रकारें अत्यंत निःस्वार्थीपणानें लिहिलेलें वाङ्मय फारच थोडें; परंतु तेंहि जेव्हां उत्सुकतेनें वाचलें जातें तेव्हांच त्याच्या उपयुक्ततेची साक्ष पटते. **लेखकानें वाचकाकरितां लिहावयाचें यांत जितकें सत्य आहे, तितकेंच सत्य वाचकानें लेखकाकडून आपणांस इष्ट असेंच वाङ्मय निर्माण करून घेतलें पाहिजे यांत आहे.** कित्येक ग्रंथ प्रसिद्ध होतात पण ते वाचले जातात किंवा नाहीं याची शंका असते. त्याचप्रमाणें कित्येक पुस्तकें व मासिकें पुष्कळ प्रमाणांत वाचलीं जातात तरी त्यांचा मनोविकासास इष्ट असाच उपयोग होतो किंवा नाहीं याबद्दल संशय वाटतो. मासिकांतील वाङ्मय तात्कालिक वाचनापुरतेंच असल्याचा भास झाला तरी त्याला चिरकाल टिकणाऱ्या वाङ्मयाइतकेंच महत्त्व आहे. **ग्रंथांच्या द्वारें लेखकाचा आणि वाचकांचा जितका परस्परसंबंध येतो त्यापेक्षां किती तरी जास्त निकट संबंध मासिकांतील लेखकांचा आणि वाचकांचा येतो.** ग्रंथांची रचना बांधीव असते; परंतु मासिकाच्या रचनेला व कार्यक्षेत्राला फारशीं बंधनें नसतात. विषयांची विविधता, त्यांची निरनिराळ्या प्रकारांनीं केलेली मांडणी, त्यांत तात्कालिन महत्त्वाच्या शास्त्रीय शोधांची होणारी चर्चा, या गुणसमुच्चयामुळें मासिकाच्या कार्यविस्ताराची बरोबरी ग्रंथ करूं शकत नाहींत. कला, काव्य, संगीत, लघुकथा या किंवा इतर अनेक विषयांना वाहिलेलीं एक-दोन नवीं मासिकें दर महिन्याला निर्माण होतात असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं. परंतु त्या प्रदेशांत जीवनकलह फार तीव्र असल्यामुळें त्या सर्वांना टिकाव धरणें मुष्कील होतें. कित्येक जन्मास येतात कित्येक नामशेष होतात. सकाळपासून रात्रीपर्यंत प्रत्येक क्षणीं आपण शास्त्रीय प्रगतीवर सर्वस्वीं अवलंबून असतांना शास्त्रीय वाङ्मयद्वारा शास्त्रीय विषयांतर्गत बोधामृतसेवनाची संधि आपण गमवीत आहों. **शास्त्रीय मासिकांची फार उणीव आहे, व जी आहे त्यांना लोकाश्रय मिळत नाहीं.** कोणत्याहि शहरांतील पुस्तकें, वर्तमानपत्रें व मासिकें विकण्याच्या दुकानांकडे

नजर टाकल्यास कोणत्या वाङ्मयाला मागणी आहे तें सहज दिसून येईल.

वाङ्मयांत शास्त्रीय नियतकालिकांचें स्थान फार वरचें असलें पाहिजे. जगांतील शास्त्रीय शोधांची व विचारांची माहिती नियतकालिकांच्या मार्फतच व्यवस्थितपणें होऊं शकते. शास्त्रज्ञांत व संशोधकांत परस्परांशीं विचार-विनिमय करण्याचें नियतकालिक हें एक सर्वमान्य साधन होऊन बसलेलें आहे. शास्त्रीय प्रगति सर्वसाधारण समाजांत रूढ करण्यास बालबोध शास्त्रीय नियतकालिकांइतकें उत्कृष्ट साधन दुसरें सापडणार नाहीं. थोड्या दिवसांपूर्वी अखिल जगांतील शास्त्रीय नियतकालिकांची माहिती देणारा एक प्रचंड कोश प्रसिद्ध करण्यांत आला. त्यांत ६०००० वर नियतकालिकांची गणति करण्यांत आली आहे. एकंदर अठरा भाषांतून प्रसिद्ध होणारीं नियतकालिकें विचारांत घेतलीं तर प्रमुख भाषांचा खालीं दिल्याप्रमाणें अनुक्रम लागतो :

| भाषा | शास्त्रीय नियतकालिकांची संख्या |
|---|---|
| इंग्लिश (आणि अमेरिकन) | १३४९३ |
| जर्मन | ६१८६ |
| फ्रेंच | ५०१३ |
| रशिअन | १८२३ |
| इटालिअन | १६६७ |

शास्त्रीय प्रगतीचा व्यवहारांत उपयोग अवश्य आहे. त्या बाबतींत आपण सदोदित परदेशावर अवलंबून राहणें योग्य नाहीं. यासाठीं मराठी शास्त्रीय वाङ्मयाची वाढ झालीच पाहिजे व शास्त्रीय ज्ञान आबालवृद्धांना आणि खेड्यापाड्यांतील देशबांधवांना पोंहोचविण्याला नियतकालिकाइतका उत्तम प्रचारक मिळणार नाहीं.

शास्त्रीय वाङ्मयाची व त्याच्या प्रकाशनाची परिस्थिति आतांपर्यंत निवेदन केली. ललितवाङ्मयाची आतां प्रगति झाली आहे; वाचक तें मुद्दाम हौसेनें विकत घेतात. शास्त्रीय वाङ्मयप्रचाराला कांहीं प्रेरणा मिळाली तर फायदेशीर होईल. असें वाङ्मय चार प्रकारचें असतें:—

१. **शालोपयोगी शास्त्रीय वाङ्मय** अगोदरच बरेंचसें अस्तित्वांत आहे आणि नवें तयार होत आहे. लेखकांना व प्रकाशकांना या वाङ्मयांत

द्रव्यलाभ होण्यासारखा असतो, त्याला निराळें प्रोत्साहन देण्याची विशेष जरूरी नाहीं.

२. **शास्त्रीय पारिभाषिक कोश** करण्यासाठीं निरनिराळ्या संस्थांनीं तयारी ठेवली आहे. वाङ्मय वाढीस लागलें म्हणजे शब्दकोशाची वाण पडणार नाहीं.

३. केवळ तज्ज्ञांसाठीं लिहिलेलें **उच्च वाङ्मय**, रासायनिक कारखानदारांसाठीं लिहिलेलीं विशेष पत्रकें, खास शेतकऱ्यांकरितां अनुभवी संशोधकांनीं लिहिलेले प्रमाणग्रंथ, हे वाङ्मयाचे प्रकार निवडक लोकांकरतांच असतात.

४. **सुबोध शास्त्रीय वाङ्मय** हा अत्यंत महत्त्वाचा भाग असून त्याकडे अजूनपर्यंत फारच थोड्या व्यक्तींचें लक्ष गेलें आहे. या शास्त्रीय वाङ्मयविभागाला फार मोठा वाचकवर्ग मिळूं शकेल.

व्यवस्थितपणें अशा प्रकारच्या वाङ्मयनिर्मितीचा प्रयोग करण्यासाठींच "सृष्टिज्ञाना"नें जन्म घेतला आहे. परंतु असें एकादें नियतकालिक कितीसा शास्त्रीय ज्ञान-प्रसार करूं शकणार ? 'शास्त्रीय वाङ्मय' असा खास विभाग असलेलीं अनेक मासिकें, साप्ताहिकें व दैनिकें चालूं ठेविलीं पाहिजेत. असलें वाङ्मय अजून मोठ्या प्रमाणांत उपलब्ध नसल्यामुळें त्याच्या योग्यतेबद्दल किंवा उपयुक्ततेबद्दल नीटसा अंदाज करतां येत नाहीं. केवळ शास्त्रीय वाङ्मयाचा प्रसार करण्यासाठीं निरनिराळीं, सचित्र, आकर्षक, कमी किमतीचीं सुबोध पुस्तकें, माला, नियतकालिकें, पत्रकें शहरांत आणि खेड्यापाड्यांतहि घरोघर दिसूं लागलीं पाहिजेत. त्यांतील भाषा साधी, बालबोध असून विषयाची मांडणी अगदीं मनोरंजक असावी. त्यांत परिभाषेचें स्तोम नसावें. सर्व सुधारलेल्या देशांत या गोष्टी चालू आहेत व त्यांचा जनतेच्या संस्कृतीवर व देशाच्या उद्योगधंद्याच्या प्रगतीवर काय उत्तम परिणाम होतो ही गोष्ट आपल्या नजरेसमोर आहे.

आपल्याकडे असला दीर्घ उद्योग यशस्वी करून दाखविण्यासाठीं लायक विद्वानांचा, संस्थांचा, प्रकाशकांचा, सरकारचा व वाचकांचा पाठिंबा पाहिजे. पैशाचें बळ मोठ्या प्रमाणांत लागेल. शाळांतील शास्त्रीय विषयांचा क्लिष्ट पद्धतीचा नीरस शास्त्रीय शिक्षणक्रम बदलावा लागेल. प्रचलित मराठी वर्तमानपत्रांत शास्त्रीय विषयांना योग्य स्थान मिळालें पाहिजे. आधुनिक जीवन शास्त्रीय प्रगतीशीं अगदीं निगडित झालेलें आहे व तें तसेंच राहणार

ही गोष्ट स्पष्टपणें दिसत असून सुद्धां पुष्कळ वृत्तपत्रें फलज्योतिषासारख्या अंधुक, अस्पष्ट व गैरविश्वास उत्पन्न करणाऱ्या बाबींना मुख्य स्थान देण्यास प्रवृत्त झालेलीं दिसतात. त्यांना शास्त्रीय प्रश्नांचें महत्त्व वाटत नाहीं.

या बाबतींत आपण निरुत्साही राहिलों तर परदेशांतील ज्ञान परदेशांतच राहील. त्यांच्या ज्ञानाची किंमत म्हणून आपण त्यांच्याकडे नुसतें आश्चर्यानें बघून पैसे उधळीत राहणार व स्वतःची बौद्धिक व नंतर शारीरिक उपासमार करून घेणार यांत शंका नाहीं.

आजची आपली परिस्थिति वेगानें बदलत चालली आहे. सामाजिक, शैक्षणिक, व्यावहारिक, राजकीय बाबतींत भयंकर घडामोडी होत ओहत. अशा वेळीं शास्त्राची महती जास्तच प्रमाणांत नजरेंत भरते. योग्य वाढीसाठीं काय काय गोष्टी अवश्य वाटतात त्या केवळ समारोप म्हणून खालीं सुचविल्या आहेतः—

( १ ) शास्त्रीय वाङ्मयाच्या वाढीस मातृभाषा हीच बोधभाषा असणें अत्यावश्यक आहे.

( २ ) शंभर वर्षांतील मराठी शास्त्रीय वाङ्मयाचा इतिहासच वरील मुद्द्याचें पुष्टीकरण करूं शकतो. सर्व प्रकारचे शास्त्रीय विषय सुंदर मराठींत लिहितां येतात; मात्र लेखक विद्वान्, अनुभवी आणि हौशी असला पाहिजे. दिवसेंदिवस शास्त्रें वाढत आहेत. प्रमाण-ग्रंथ व सुबोध ग्रंथ या दोहोंचीहि उणीव फार तीव्रतेनें भासतें. शालोपयोगी वाङ्मय थोडें-फार तयार होत आहे. शास्त्रीय विषयांचा प्रचार करणाऱ्या ज्ञानप्रसारक संस्था आजमितीला अस्तित्वांत नाहींत. एक दोन नियतकालिकें प्रयत्न करीत आहेत. परंतु सर्व-साधारण जनतेची शास्त्रीय ज्ञानाची भूक येवढ्याशा सामुग्रीनें कशी भागणार !

( ३ ) विश्वविद्यालयांत मराठीला बोधभाषेचा मान अवश्य तो मिळलाच पाहिजे. तोंपर्यंत शास्त्रीय प्रगतीच्या कल्पना नुसतीं मनोराज्यें ठरतील. जोंपर्यंत हें झालें नाहीं तोंपर्यंत अध्यापकवर्ग व प्रौढ शिष्यवर्ग दोघेहि शास्त्रीय ज्ञानप्रसाराच्या पवित्र कार्यांत उदासीन राहणार.

( ४ ) शास्त्रीय वाङ्मयांत परिभाषा अवश्य असली तरी त्याच्या कित्येक प्रकारांत ती अपरिहार्य नाहीं. उत्तम लेखक आपले विचार समजावून

देण्यासाठीं मनोरंजक पद्धतीचें अवलंबन करून परिभाषा टाळण्याचाच प्रयत्न करील. असें झालें तरच शास्त्रीय विषयांतील लोकशिक्षण नीटपणें तडीस जाण्याचा संभव आहे. परिभाषाकोशरचनेसाठीं निर्माण झालेल्या संघशक्तीचा उपयोग सुबोध वाङ्मयप्रचार जोरानें करण्याकडे करावा.

( ५ ) उच्च दर्जाच्या विद्वन्मान्य वाङ्मयासाठीं परिभाषा अवश्य आहे. तरी त्यांत भावनेपेक्षां उपयुक्ततेकडे विशेष लक्ष दिलें जावें.

( ६ ) शास्त्रीय लेखन, प्रकाशन व वाचन या त्रयीचे परस्परसंबंध कितीहि निकट अगर विरोधी असले तरी या त्रयींतील प्रत्येक व्यक्तीनें स्वतंत्रपणें सामुदायिक हिताकडे लक्ष पुरवावें.

( ७ ) समाजांतील सर्वसाधारण व्यक्तीचें शास्त्रीय ज्ञान वाढविण्याची बरीचशी जबाबदारी वृत्तपत्रकारांवर पडते. तात्कालिक फायद्याकडेच नजर देऊन शास्त्रीय ज्ञानप्रसाराचें आपलें कर्तव्य करण्यांत त्यांनीं दिरंगाई करूं नये. योग्य लेखकांची त्यांना अडचण भासेल परंतु परिश्रमानें तीहि नाहींशी होण्यासारखी आहे. आधुनिक शास्त्रीय विषयांचे शिक्षक व विद्यार्थ्यांची नवी पिढी यांनीं मनांत आणल्यास त्यांच्या हातून लेखनकार्य उत्तम होऊं शकेल.

( ८ ) तरुण पिढीची लेखन-वाचनाची दिशा बदलली पाहिजे. गंभीरपणा कमी होत चालला आहे. तात्पुरत्या मनरंजनाकरतां तरुण पिढी शास्त्रीय प्रगतीकडे दुर्लक्ष करीत आहे. यांत बदल झाला तरच शास्त्रीय वाङ्मय वाढीला लागेल व देशाची खरी औद्योगिक आणि सांपत्तिक सुधारणा होईल. केवळ ललितकलात्मक एकांगी वाङ्मय या कामीं उपयोगी पडणार नाहीं खास.

( ९ ) बालबोध शास्त्रीय वाङ्मयवृद्धीकडेच प्रथमतः जास्त लक्ष्य पुरविल्या-शिवाय त्याची वाढ होणार नाहीं. धनिकांनीं द्रव्यसाहाय्य, विद्वानांनीं सक्रिय सहानुभूति, देशबांधवांनीं आश्रय आणि सर्वांनीं मंगलाशीर्वाद दिल्याखेरीज शास्त्रीय वाङ्मयाची धडगत नाहीं.

( १० ) परिषदा, सभा, मंडळें यांत शास्त्रीय विषयांच्या चर्चेला स्वतंत्र जागा मिळावी. त्यामुळें शास्त्रीय वाङ्मयवृक्ष सशक्त व जोमदार होऊन देशाची हीन अवस्था दूर करण्यास लायक असा कल्पतरु तो बनेल यांत शंका नाहीं.

---

# मराठींतील सामाजिक शास्त्रीय वाङ्मय



लेखकः—तर्कतीर्थ **लक्ष्मणशास्त्री जोशी**, संपादक, 'धर्मकोश', वाई

मराठी वाङ्मयांत सगळ्याच शास्त्रांचें दारिद्र्य आहे. त्याप्रमाणें सामाजिक शास्त्रांचेंहि दारिद्र्य आहे यांत नवल नाहीं. **मनुष्याच्या सामुदायिक जीवनाचा, सामाजिक अंतर्बाह्य व्यापारांचा किंवा घटनांचा विचार करणारीं शास्त्रें म्हणजे सामाजिक शास्त्रें होत.** अर्थशास्त्र, राजनीति, समाजशास्त्र, इतिहास, नीतिशास्त्र, धर्मशास्त्र, कायदेशास्त्र भाषाशास्त्र आणि टीकाशास्त्र ( Criticism ) हीं सामाजिक शास्त्रें होत. भौतिक शास्त्रांपेक्षां सामाजिक शास्त्रें हीं अजूनपर्यंत अनिश्चित स्वरूपाचीं आहेत. भौतिक शास्त्रांमध्यें कार्यकारणभावांचे नियम जितक्या सूक्ष्मपणें, व्यापक रीतीनें, निश्चित स्वरूपानें दाखवितां येतात तसे ते सामाजिक शास्त्रांत अजून दाखवितां येत नाहींत. भौतिक शास्त्रांइतकें निश्चित स्वरूप सामाजिक शास्त्रांना येण्यास अजून कालावधि आहे. हल्लींची मानवसमाजाची रचना इतकी डबघाईस आली आहे कीं, त्यामुळें शास्त्रप्रगतीस फार मोठा अडथळा उत्पन्न झाला आहे, म्हणून सामाजिक शास्त्रांचा पाहिजे तितक्या गतीनें विकास पाश्चात्य समाजांत सुद्धां होत नाहीं. आपला हा पौर्वात्य समाज तर खूपच जीर्ण स्थितीला आला आहे. त्यामुळें सामाजिक शास्त्रांची खरी वाढ येथें मुळींच होऊं शकली नाहीं. हीं शास्त्रें फार पुढें गेलेल्या पाश्चात्य समाजांतच उत्पन्न झालीं. आपला समाज अगदीं मागासला व म्हणून आपलें जीवनाचें ज्ञानहि अगदीं मागासलें आहे. त्यामुळें आपल्या भाषेंत सामाजिक शास्त्रेंहि तुटपुंज्या स्वरूपांत सापडतात.

## सामाजिक शास्त्रें ( Social Sciences ) व भौतिक शास्त्रें ( Physical Sciences )

सामाजिक शास्त्रांचे चार गट पडतात : ( १ ) इतिहास, मानव-जातिशास्त्र, व समाजशास्त्र हा पहिला गट. ( २ ) अर्थशास्त्र, राज्यशास्त्र, कायदे-

शास्त्र व नागरिक धर्म हा दुसरा गट. ( ३ ) धर्मशास्त्र, व नीतिशास्त्र हा तिसरा गट. आणि ( ४ ) भाषाशास्त्र, आणि टीकाशास्त्र हा चवथा गट होय. या चार गटांमध्यें अनेक अवांतर, वर निर्दिष्ट न केलेल्या शास्त्र-शाखांचाहि अंतर्भाव होतो. सामान्य स्वरूप कळण्याकरतां वर कांहीं शास्त्रांचा उल्लेख केला आहे. कांहीं शास्त्रें अशीं आहेत कीं, त्यांचा भौतिक शास्त्रांत अंतर्भाव करावा कीं सामाजिक शास्त्रांत अंतर्भाव करावा असा प्रश्न उत्पन्न होतो. उदाहरणार्थ, मानसशास्त्र. सामाजिक मानसशास्त्र नांवाची शाखा मानसशास्त्रांत उत्पन्न झाली आहे. तिचा अंतर्भाव सामाजिक शास्त्रांत करतां येईल; परंतु सर्व मानसशास्त्र सामाजिक शास्त्र आहे, असें म्हणतां येणार नाहीं. मनुष्याचें मन सामाजिक आहे, यांत शंका नाहीं. परंतु मनुष्याच्या मनाची मूलभूत घटना विचारांत घ्यावयाची झाल्यास तें शास्त्र भौतिक शास्त्रांत किंवा निसर्गशास्त्रांत (Science of Nature) प्रविष्ट करावें लागेल. रोगशास्त्र (Pathology) भौतिक शास्त्र आहे; पण त्यांतहि मनुष्याच्या सामाजिक जीवनाचा संबंध येऊन पोंचतोच. वनस्पति-शास्त्र व प्राणिशास्त्र हीं तर सरळच भौतिक शास्त्रें आहेत; पण त्यांतहि मनुष्याच्या सामाजिक कृतींचा खूप खोल प्रवेश आहे. पुष्कळशीं धान्यें फळझाडें व इतर वनस्पति मनुष्याच्या हजारों वर्षांच्या प्रयत्नांमुळेंच आज ज्या स्वरूपांत दिसतात त्या स्वरूपांत अस्तित्वांत आल्या आहेत. त्यांचें मूळचें नैसर्गिक स्वरूप अजीबात बदलून गेलें आहे आणि तें मानवी कृतीनें बदललें आहे. जी गोष्ट वनस्पतींची तीच पशूंची. ग्राम्य पशु व ग्राम्य वनस्पति मानवी कृतींचें फल आहे. किती तरी रासायनिक द्रव्यें मनुष्य नसता तर अस्तित्वांतच आलीं नसतीं. म्हणून भौतिक शास्त्रांत सामाजिक शास्त्राचे धागे-दोरे विणले गेले आहेत. केवळ 'प्राधान्येन व्यपदेशाः भवन्ति' ह्या न्यायानेंच भौतिक शास्त्र व सामाजिक शास्त्र असें शास्त्रांचें विभजन विचाराच्या सोयीकरतां केलें आहे.

## इतिहास व इतर सामाजिक शास्त्रें यांचा संबंध

वर उल्लेखिलेल्या सामाजिक शास्त्रांचा मराठींत कितपत प्रवेश झाला आहे, याचा क्रमानें आतां परामर्श घेऊं. त्याचप्रमाणें मराठींत ह्या शास्त्रांचें स्वरूप कशा प्रकारचें आहे, याचाहि थोडक्यांत आढावा घेऊं. सगळ्या सामाजिक

शास्त्रांचें इतिहास हें अधिष्ठान आहे. कारण सगळीच मानवकृति इतिहास-निबद्ध आहे. इतिहास वगळून कोणतेंच सामाजिक शास्त्र बनत नाहीं. अशी कोणतीहि मानवी संस्था नाहीं, कीं जिचा इतिहास लक्षांत घेतल्यावांचून तिच्या यथार्थ स्वरूपाचें आकलन करतां येईल. प्रत्येक मानवी संस्थेंत अगणित स्थित्यंतरें झालेलीं आहेत. प्रत्येक स्थित्यंतर त्याच्या पूर्वीच्या अवस्थेंतून उत्पन्न झालेलें असतें. कार्यकारणभावाची अव्याहत परंपरा किंवा साखळी तपासल्याशिवाय कोणत्याहि वस्तूचा अर्थच उलगडत नाहीं. ही कार्यकारणभावपरंपरा म्हणजेच इतिहास होय. मानवजातिशास्त्र (Anthropology) आणि समाजशास्त्र (Socialogy) हीं दोन्हींहि शास्त्रें समाजसंस्थेचा व तिच्या अंगोपांगांचा व्यापकपणें सामान्यरूपानें विचार करतात. त्याकरतां मानवजीवनाचा सगळा इतिहास या शास्त्रास तपासावा लागतो. इतिहासाचा आधार (data) घेतल्याशिवाय विशिष्ट सामाजिक क्रिया, संस्था किंवा घटना उलगडून दाखविणेंच शक्य नाहीं. वरील सामान्य शास्त्रांप्रमाणेंच अर्थशास्त्र, राज्यशास्त्र वगैरे विशेष शास्त्रांनाहि आपल्या विशिष्ट विषयाचा इतिहास लक्षांत घ्यावाच लागतो.

## इतिहास हें शास्त्र व कला दोन्ही

इतिहास हें शास्त्र आहे कीं कला आहे असा वाद पूर्वी होता, तो वाद आतां राहिला नाहीं. इतिहास हें शास्त्रहि आहे व कलाहि आहे. शास्त्र म्हणण्याचें कारण सामान्य व विशेष कार्यकारणभावांची संगतवार मांडणी व परस्पर सुसंबद्ध सिद्धान्तांची रचना हीं जीं शास्त्रांचीं दोन मुख्य रूपें तीं इतिहासालाहि असतात. अनेक उदाहरणांवरून (Induction) सामान्य निगमन काढणें व अनेक सामान्य नियमांचा (deduction) विशिष्ट निष्कर्ष काढणें ह्या दोन शास्त्रक्रियांनीं इतिहास लिहिला जातो, व त्याचमुळें इतिहास वाङ्मयांत प्रतिष्ठा पावतो. इतिहास ही कलाहि आहे. अनेक विस्मय-जनक, भावनोद्दीपक सामाजिक घटनांचें वर्णन करून त्यांचें हुबेहूब चित्र वाचकांच्या अंतश्चक्षूंपुढें उभें करण्याचें कार्य इतिहासकारास करावें लागतें. त्याकरतां अलंकार, भाषाशैली, वर्णनचातुर्य, प्रतिभा इत्यादि कलांगांची जरूरी इतिहास-लेखकास असते. त्याचमुळें मॉन्सेन, गिबन, बकल

फिशर, वेल्स इत्यादि इतिहासकारांनीं इतिहासाला कलेच्या सौंदर्यपीठावर नेऊन बसविलें आहे.

## मराठींतील इतिहासलेखन व महाराष्ट्रीय इतिहासकार

मराठींत इतिहासतत्त्वाची चर्चा करणारे अनेक लेखक झाले आहेत. त्याचप्रमाणें इतिहास-लेखनाचाहि प्रयत्न कांहीं पंडितांनीं केला आहे. इतिहासलेखनापेक्षां इतिहासाचीं साधनें गोळा करणें हें काम अधिक उत्साहानें खरे, राजवाडे, पारसनीस वगैरे लोकांनीं केलें आहे. इतिहासाचीं साधनें म्हणजे इतिहास नव्हे. मराठी भाषेचा इतिहास लिहीत असतां मराठींतील जुनी नवी कविता, एकत्रित संग्रहित करावी लागते. हा कवितासंग्रह म्हणजे कवितेचा इतिहास नव्हे. लावण्या आणि पोवाड्यांचीं बाडें कुणीं जर प्रसिद्ध केलीं तर त्यास इतिहास-संशोधक म्हणण्यापेक्षां इतिहास-साधन-संशोधक म्हटलें पाहिजे. म. मो. कुंटे, राजारामशास्त्री भागवत, लो. बा. गं. टिळक, सर भांडारकर, महादेव गोविंद रानडे, शं. बा. दीक्षित., के. ल. दप्तरी, चिंतामण विनायक वैद्य, विश्वनाथ काशीनाथ राजवाडे, गोविंद सखाराम सरदेसाई, केळुसकर, श्रीधर व्यंकटेश केतकर, न. चिं. केळकर, प्रो. पी. एल्. वैद्य, प्रो. शं. दा. पेंडसे., बनारसचे प्रो. आळतेकर; प्रो. पां. वा. काणे, प्रो. बनहट्टी, नागपूरचे प्रो. मिराशी, श्री. यशवंत खुशाल देशपांडे, प्रो. शं. द. जावडेकर इत्यादि लेखकांनीं इतिहासासंबंधीं लेखन केलें आहे. न्या. मू. रानडे यांनीं जरी मराठींत लिहिलें नसलें तरी महाराष्ट्रीय इतिहासकार म्हणून त्यांचा वर उल्लेख केला आहे. संस्कृत साहित्याचा इतिहास इंग्लिशमध्यें प्रो. पां. वा. काणे, एम्. ए., यांनीं लिहिला आहे; त्याचा मराठींत अनुवाद झालेला आहे. प्राचीन आर्यसंस्कृतीचा इतिहास महादेव मोरेश्वर कुंटे यांनीं लिहिला व त्याचा अनुवाद मराठींत श्री. ओगले यांनीं केला आहे. लो. बा. गं. टिळकांचीहि महाराष्ट्रीय इतिहासकारांत गणना केलीच पाहिजे. कारण त्यांनीं वैदिक कालाचा इतिहास इंग्रजींत लिहिला आहे व त्याचें मराठींत भाषांतरहि झालें आहे. महाराष्ट्र इतिहासज्ञांमध्यें सगळ्यांत वरिष्ठ स्थान सर रामकृष्ण गोपाळ भांडारकर यांनाच द्यावें लागेल; परंतु त्यांच्याबद्दल अकारण गैरसमज महाराष्ट्रीय सुशिक्षित वर्गांत पसरल्यामुळें

त्यांची श्रेष्ठ इतिहासकृति मराठींत अवतरूं शकली नाहीं. 'दक्षिणेचा इतिहास' (History of the Deccan) आणि शैवधर्म-वैष्णवधर्मांचा इतिहास (Shaivism, Vaishnavism and other Minor Religious Sects in India) हे दोन ग्रंथ म्हणजे भांडारकरांच्या कीर्तीचे सोन्याचे कळसच होत. इतिहासाचें अत्यंत व्यापक व विस्तृत लेखन मराठींत करण्याचा पहिला मोठा प्रयत्न ज्ञानकोशकार केतकर यांनींच केला. ज्ञान-कोशाचे पहिले पांच प्रस्तावना-खंड मराठी भाषेंत पहिल्यांदाच अवतरलेला इतिहासोदधिच होय. सगळ्या जगाचा, विशेषतः भारतीयांचा इतिहास लिहिण्याचें काम ज्ञानकोशकारांनीं या पांच खंडांत केलें आहे. त्यांत त्यांना अंशतः यशहि आलें आहे. अंशतः म्हणण्याचें कारण असें कीं, श्री. केतकरांनीं जगाच्या इतिहासाचा व भारतीयांच्या इतिहासाचा सुसंगत आराखडा तयार करून व ऐतिहासिक घटनांची विशिष्ट पद्धतीनें संगती जुळवून हा इतिहास लिहिला नाहीं. इतिहासांतील सगळ्या प्रमुख घटना प्रस्तावना-खंडांत वर्णिलेल्या आहेत; पण पाश्चात्य देशांतील सुप्रसिद्ध इतिहासतज्ञांनीं इतिहास लिहीत असतांना इतिहासाचा संकलितपणें विशिष्ट अर्थ लक्षांत घेऊन व इतिहासाचें विशिष्ट तत्त्वज्ञान लक्षांत घेऊन इतिहास लिहिण्याचा प्रयत्न केला आहे, तसें ज्ञानकोशकारांनीं कांहींहि केलें नाहीं.

महाराष्ट्रांतील बरेच इतिहासलेखक प्रगतिज्ञ व पुराणपरंपराभिमानी अशा दोन तऱ्हेच्या संप्रदायांत विभागून गेलेले दिसतात. ज्या लेखकांस या दोन संप्रदायांपैकीं कोणत्याहि नेमक्या एका संप्रदायांत बसवितां येत नाहीं असे कांहीं इतिहासलेखक आहेत. पहिले इतिहासाचे सुधारणाशास्त्र किंवा प्रगति-शास्त्र (Philosophy of Historical Progress) ज्यांनीं आत्म-सात् केलें आहे. असे निःपक्षपाती बुद्धीचे इतिहासलेखक होत. दुसरे, पूर्व-परंपरेचा अभिमान बाळगणारे, राष्ट्रीय अभिमानानें व सांस्कृतिक अभिमानानें विभ्रांत चित्त झालेले प्रगतिशास्त्राचे किंवा इतिहासशास्त्राचे (Philosophy of History) सिद्धान्त नीट रीतीनें न पचविलेले इतिहासलेखक होत. म. मो. कुंटे, न्या. मू. म. गो. रानडे, सर भांडारकर वगैरे मंडळींनीं ऐतिहासिक प्रगतीचें रहस्य लक्षांत घेऊन व पाश्चात्यांची इतिहासपद्धति (Historical Method) नीट रीतीनें आत्मसात् करून घेऊन

इतिहास लिहिण्याचा प्रयत्न केला. स्वकीय संस्कृतीच्या अभिमानानें ग्रासलेले व इसिहास-लेखनांत प्रगतिशास्त्राचे सिद्धान्त लक्षांत न घेतां ऐतिहासिक विचार मराठींत मांडणारे लोक म्हणजे—वि. का. राजवाडे, चिं. वि. वैद्य, ज्ञानकोशकार केतकर वगैरे होत. इतिहासशास्त्राचे दोन महत्त्वाचे सिद्धान्त आहेत. पहिला सिद्धान्त असा कीं, धार्मिक विचारसरणीपेक्षां ऐहिक विचारसरणीच ( Sceular Thought ) मानवप्रगतीची निदर्शक असते व ऐहिक विचारसरणींत वैज्ञानिक विचारसरणी ( Scientific Thought ) श्रेष्ठ असते. दुसरा सिद्धान्त असा कीं, पुरोहितवर्गाची धार्मिक विचारपद्धतीची व धर्मसंस्थेची ज्या समाजावर मुख्य सत्ता व छाप असते, त्या समाजापेक्षां धर्मसंस्थेचें व पुरोहितवर्गाचें वर्चस्व ज्या समाजांत कमी झालेलें असतें तो समाज समाजरचनेच्या दृष्टीनें प्रगतीच्या वरच्या पायरीवर असतो. कायद्याचा इतिहास ज्यानें पाहिला असेल, त्यांना हें विधान नीट समजेल. पुरोहितीय धार्मिक कायद्यापेक्षां पुरोहितवर्चस्व नसलेला ऐहिक कायदा हाच समाजाच्या उच्च दर्जाच्या राजकीय व्यवस्थेचा निदर्शक असतो. कायदेपंडित मेन ( Maine )नें प्राचीन कायद्याचें विवरण करीत असतांना या मुद्द्याचें चांगलेंच स्पष्टीकरण केलें आहे. ग्रीक इतिहासांत पुरोहित वर्गाचें सामाजिक वर्चस्व ढिलें झाल्यानंतरच नवीन शास्त्रें उदयास आलीं. युरोपचा आधुनिक इतिहास हेंच तत्त्व पटवितो. हिंदुस्थानच्या इतिहासांत ब्राह्मणी वर्चस्व व धार्मिक विचारसरणीचें प्रभुत्व दीर्घकालपर्यंत टिकल्यामुळें सामाजिक प्रगति अतिशय मंदगतीनें झाली. क्षात्रवर्गास, राज्यसंस्थेस, व्यापारीवर्गास व उद्योगधंद्यांस सामाजांत उच्च स्थान देण्याची प्रवृत्ति वाढल्यामुळें, इतर समाज हिंदी समाजापेक्षां पुढें गेले. हिंदुस्थानांत पारलौकिक आचारविचार आणि पारलौकिक संस्थांना आधारभूत असलेला ब्राह्मणवर्ग व धार्मिक वर्ग यांसच कायमचें महत्त्व राहिलें. त्यामुळें चिरकालीन मध्यवर्ती राजकीय सत्ता उत्पन्न झाली नाहीं. ऐहिक विचारसरणी, ऐहिक कला व ऐहिक उद्यम यांना कायमचें गौणस्थान मिळालें. हा दृष्टिकोण केतकर, राजवाडे प्रभृति लेखकांस मुळींच पचला नव्हता. केतकरांनीं तर ब्राह्मणवर्गाचें भारतीय इतिहासांतील वरिष्ठ स्थान वारंवार प्रशंसिलें आहे व ब्राह्मणशासित समाजव्यवस्थेची मोठ्या आदरानें मीमांसा केली आहे.

त्यामुळें बौद्धक्रांतीच्या ऐतिहासिक रहस्याचें केतकरांस आकलनच झालें नाहीं. बौद्धविचारक्रान्तीनंतरच हिंदुस्थानांत नांवाजण्याजोगीं साम्राज्यें उत्पन्न झालीं; व त्यांचें श्रेय ब्राह्मणी धर्माच्या प्रसारास नसून, कर्मकांडास गौण लेखणाऱ्या नैतिक धर्मास आहे. त्यामुळें साम्राज्यास आवश्यक असलेला व्यापक कायदा अस्तित्वांत येऊं लागतो. श्री. राजवाडे हे संतांच्यापेक्षां ब्राह्मण-धर्माचा पुनरुद्धार करणाऱ्या प्रतिगामी रामदासाची तळी उचलून धरतात व जातिसंस्थेची महती गातात. राज्यपद्धति, समाजरचना व आर्थिक उत्पादन-पद्धति यांच्या संबंधांचें मूलगामी पृथक्करण करून विकासशील समाजाचें स्वरूप निश्चित करण्याचा प्रयत्न पाश्चात्य इतिहासकारांनीं केला आहे त्याचें मर्म या आमच्या सनातनी इतिहासलेखकांना अवगत करून घेण्याची बुद्धिच झाली नाहीं. त्यामुळें श्रुतिस्मृतिपुराणांतील वर्णाश्रमधर्मांच्या व समाजव्यवस्थेच्या पोटीं असलेल्या प्रगतिविरोधी तत्त्वांची व दोषांची ओळख या प्रसिद्ध इतिहासपंडितांना कधींच झाली नाहीं. कुंटे, रानडे व भांडारकर यांचें इतिहासविवेचन इतिहासशास्त्राच्या आधारावर झालें आहे. श्री. कुंट्यांच्या लेखनांत बौद्धक्रांतीबद्दल बराच गैरसमज दिसतो. परंतु त्यांची वेदकालीन सामाजिक स्थित्यंतरांचें विवरण करण्याची पद्धति बरीच आधुनिक आहे. प्रो. पी. एल्. वैद्य यांचें "बौद्धधर्माचा उदय व प्रसार" हें पुस्तक बौद्धक्रांतीचा अर्थ समजण्यास अधिक उपयुक्त होईल.

मराठीमध्यें अनुवादात्मक व मौलिक असें दोन्ही तऱ्हेचें इतिहास-वाङ्मय आहे. पाश्चात्य इतिहासकारांनीं लिहिलेलें मराठ्यांचा इतिहास, राजपुतान्याचा इतिहास, विजयानगर साम्राज्याचा इतिहास इत्यादि ग्रंथ मराठींत अनुवादरूपानें अवतरले आहेत. मराठ्यांच्या इतिहासाची सामग्री बरीच गोळा झाली आहे. श्री. गो. स. सरदेसाई यांनीं मुसलमानी, मराठी व इंग्रजी रियासतींचा इतिहास मराठींत समग्र रीतीनें आणण्याचा प्रयत्न केला आहे व त्यांच्या लेखनांत वास्तववादी दृष्टिहि आहे. "अर्वाचीन मराठी साहित्याचा इतिहास" नांवाचें पुस्तक अर्वाचीन मराठी वाङ्मयाचा आढावा घेण्याच्या उद्देशानें बडोद्याचे नेने व माने यांनीं प्रसिद्ध केलें आहे. मराठी वाङ्मयाच्या इतिहासांत श्री. आजगांवकर, भावे, पांगारकर वगैरे मंडळींनीं इंग्रजपूर्व मराठी वाङ्मयाचा व वाङ्मयकारांचा इतिहास बरा लिहिला आहे.

श्री. चिंतामणराव वैद्यांनीं मध्ययुगीन भारत लिहून, मराठी वाचकांस दुसऱ्या मार्गानें ज्ञात न होणाऱ्या भारतेतिहासाचें दालन उघडून दाखविलें आहे. श्री. वि. का. राजवाडे यांनीं इतिहासशास्त्रविषयक निबंध प्रस्तावनारूपानें लिहिले आहेत; पण त्यांत इतिहासशास्त्राचें गांभीर्य व गहनत्व दाखविण्याचा नुसता प्रयत्न आहे. परंतु इतिहासतत्त्वमीमांसा करण्यांत त्यांना अपयश आलें आहे. शास्त्रीय विचारसरणीची त्यांना आवड आहे, पण आकलन नाहीं; त्यामुळेंच वैदिक कालाबद्दल व स्मृतिकालाबद्दल त्यांच्या ठायीं नुसता आदर वसत आहे; पण मानवी इतिहासांत त्या इतिहासाला कोणतें स्थान आहे याची ओळख त्यांना होऊं शकली नाहीं. महाराष्ट्राच्या वसाहतकालासंबंधीं इतिहास लिहिण्याचा प्रयत्न व्युत्पत्तिशास्त्राच्या जोरावर त्यांनीं केला आहे. प्रतिभाशक्ति जोरदार असल्यामुळें कांहीं सुंदर कल्पना त्यांना मांडतां आल्या आहेत. त्यांनीं लिहिलेली महिकावतीच्या बखरीची व राधा-माधव-विलासचंपूची इतिहासविषयक प्रस्तावना फार नांवाजली आहे. पण त्यांतील भारतीय प्राचीन इतिहासविषयक कल्पना बऱ्याच निराधार आहेत. उदाहरणार्थ, राधा-माधव-विलासचंपूंतील चातुर्वर्ण्योत्पत्तिविषयक कल्पना पाहावी. प्राचीन भारतेतिहासास उपयुक्त अशी उत्कृष्ट माहिती देणारा ग्रंथ म्हणजे सिद्धेश्वरशास्त्री चित्राव यांचा प्राचीन चरित्रकोश होय. त्या मानानें मध्ययुगीन चरित्रकोश मध्यम दर्जाचा आहे. ज्ञानेतिहासाच्या दृष्टीनें ज्ञानकोशकार केतकरांचा "विज्ञानेतिहास" हा सुंदर ग्रंथ होय. प्रो. बनहट्टी यांचें "ज्ञानोपासना व भारतीयांचें कर्तव्य" हें पुस्तक ज्ञानेतिहासाच्या दृष्टीनें भारदस्त आहे. सांस्कृतिक इतिहासांत "ऋग्वेदकालीन संस्कृतीचा इतिहास" हें काशीकरांचें पुस्तक, "महाभारतोपसंहार" हें चिं. वि. वैद्य यांचें पुस्तक, आणि शं. दा. पेंडसे यांचे "महाराष्ट्र संस्कृतीचा इतिहास" हें पुस्तक लोकांच्या डोळ्यांसमोर आहे. त्यांत काशीकरांच्या पुस्तकासच इतिहासशास्त्राची कसोटी लागूं पडते. भारताचार्य चिं. वि. वैद्य यांचें "भारतोपसंहार" हें पुस्तक माहितीच्या दृष्टीनें बरें आहे; पण त्यांत सांगितलेली माहिति भारतांत कोठें आहे याचा पत्ताच सांगितला नाहीं; त्यामुळें इतिहासदृष्ट्या ह्या पुस्तकाची किंमत अगदीं शून्य आहे. प्रो. शं. दा. पेंडसे यांचें पुस्तक म्हणजे महाराष्ट्र-संस्कृतीची एका पंडित पुराणिकानें केलेली प्रशंसा, येवढ्याच

किंमतीचें आहे. बनारसचे प्रो. आळतेकर यांचें "प्राचीन शिक्षणपद्धति" हें मराठींत अनुवादिलेलें पुस्तक भारतीय शिक्षणेतिहासांत नमुनेदार ठरलें आहे. तसेंच प्रो. पां. वा. काणे यांच्या "धर्मशास्त्रविचार" या पुस्तकांत स्मृति-कालीन संस्कृतीची माहिती चांगली दिली आहे. श्री. महादेवशास्त्री दिवेकर यांचें "भारतीय संस्कृतीचा उत्कर्षापकर्ष" या पुस्तकांतील विचारांना शास्त्रीय महत्त्व मुळींच देतां येणार नाहीं. प्रचारकी व कीर्तनकारी दृष्टीनेंच या पुस्तकास महत्त्व आहे. आधुनिक भारतविषयक ऐतिहासिक चर्चा करणारें नांवाजलेलें पुस्तक "आधुनिक भारत" प्रो. शं. द. जावडेकर यांनीं लिहिलें आहे. त्यांतील मीमांसा राष्ट्रवादाच्या इतिहासाच्या दृष्टीनें मननीय झाली आहे. मात्र राष्ट्रवादावरील जावडेकरांचें भाष्य अत्यंत प्रतिगामी स्वरूपाचें आहे. त्यांतल्या त्यांत अहिंसावादाचें गूढ अध्यात्मवादाचें पुराण श्रद्धामय आहे व तें चिकित्सक दृष्टीनें त्याज्य आहे. आधुनिक विज्ञान, औद्योगिक क्रांति, लोकसत्ताक राजकीय क्रांति व समाजवाद या अंगांचा विचार करीत असतांना जावडेकरांची बुद्धि गांधीवादानें अंध झाली आहे. गांधीवाद ही भारतीय इतिहासांतील एक चमत्कारिक घटना आहे. त्यांतील अभिनव अंधश्रद्धेला युक्त्याभासांचे व हेत्वाभासांचें पाठबळ देण्याचा व्यर्थ प्रयत्न प्रो. शं. द. जावडेकर यांनीं केला आहे. त्यामुळें त्यांच्या बाकीच्या शास्त्रशुद्ध विवेचनाला कलंक लागला आहे.

## समाजशास्त्र व मानवजातिशास्त्र

वर मराठींतील इतिहासविषयक व इतिहासतत्त्वविषयक वाङ्मयाचा थोडक्यांत परामर्श घेतला. दुसरें मुख्य सामाजिक शास्त्र "समाजशास्त्र" होय. यासंबंधीं मराठी भाषेंत फारसें महत्त्वाचें लेखन मुळींच सापडत नाहीं. स्पेन्सरच्या समाजशास्त्राचा अनुवाद दाभोळकरमालेमध्यें सापडतो. "सुधारणा व प्रगति" हें पुस्तक दाजी नागेश आपटे यांनीं एका इंग्रजी ग्रंथावरून सुंदर रीतीनें अनुवादिलें आहे. श्रीधर व्यंकटेश केतकर ह्या महान् समाजशास्त्रज्ञाचें "भारतीय समाजशास्त्र" नांवाचें लहानसें पण मौलिक पुस्तक नागपूरच्या नवभारतमालेनें प्रसिद्ध केलें आहे. भारतीय समाजशास्त्रावर विस्तृत लेखन श्री. केतकर यांनीं "हिंदुस्थान व जग" ह्या ज्ञानकोशाच्या

प्रथम खंडांत केलें आहे. भारतीय समाजशास्त्राचीं तत्त्वें आधुनिक समाजशास्त्राशीं तुलना करतां मागासलेलीं दिसतात ही गोष्ट श्री. केतकर यांच्यासारख्या अधिकारी लेखकानें निदर्शनास आणावयास पाहिजे होती, पण तें त्यांना साधलें नाहीं. जातिभेदाची रचनापद्धति ज्या मध्ययुगीन आर्थिक व्यवस्थेमुळें उत्पन्न झाली ती आर्थिक व्यवस्थाच या मानवी जगांतून नष्टप्राय झाली आहे, व ती या नव्या मानवी जगाचा प्रलय झाल्याशिवाय पुन्हा कधीं काळीं पुनरुज्जीवित होणें शक्य नाहीं. चातुर्वर्ण्याचें ऐतिहासिक स्वरूप स्मृतिकालाच्या समाप्तीबरोबरच कालग्रस्त झालें. त्याला तात्त्विक दृष्टीनें उजळा देण्याचा नव्या युगांत कितीहि प्रयत्न केला तरी तो अपेशीच ठरेल. ब्राह्मणप्रधान म्हणजे– पुरोहितप्रधान समाजसंस्था यापुढें उत्पन्न होणें शक्य नाहीं. तसें व्हायचें म्हणजे जगास फार रानटी बनावें लागेल. त्या जुन्या अंधारयुगाला आतां कोणत्याहि समाजशास्त्रज्ञानें आवाहन देऊं नये. श्री. गो. म. जोशी, पुणें, यांनीं "हिंदु समाजरचनेचें शास्त्र" ह्या नांवाचें पुस्तक सनातनी दृष्टीचें आधुनिक समाजविज्ञानाच्या दृष्टीनें समर्थन करण्याकरितां लिहिलें आहे. त्यांनीं विज्ञानाच्या अग्नीवर शिळया कढीला ऊत आणण्याचा व बुरसलेल्या शिदोरीला ताजें बनविण्याचा प्रयत्न केला आहे. श्री. ना. गो. चापेकर यांनीं "आमचा गांव" या नांवाचें भारतीय समाजशास्त्रास पोषक अशी माहिती देणारें छान पुस्तक लिहिलें आहे. तें समाजशास्त्र नसून समाजशास्त्राचें साधन होय. मानवजातिशास्त्रावर मराठींत मुळींच वाङ्मय नाहीं. मानवजातिशास्त्रास अनुकूल व उपयुक्त अशी माहिती पुष्कळच आहे. उदाहरणार्थ, हिंदुस्थानांतील वैवाहिक चालीरितीसंबंधाची माहिती देणारें पुस्तक बडोदा येथील सयाजी पुस्तकमालेंत प्रसिद्ध झालें आहे. वि. का. राजवाडे यांचा "इतिहास व ऐतिहासिक" ह्या मासिकांत "विचार व विकार-प्रदर्शनाच्या साधनांची उत्क्रांति" हा निबंध मराठी भाषेला ललामभूत आहे. तो मानवजातिशास्त्राच्या एका शाखेंत बसतो.

## अर्थशास्त्र, राज्यशास्त्र व नागरिक नीति

अर्थशास्त्र सामाजिक शास्त्राची एक महत्त्वाची शाखा आहे. आर्थिक व्यवहार हा समाजजीवनाचा पाया आहे. सगळया सामाजिक संस्थांची

अर्थसंस्था ही मूलभूत संस्था आहे. युरोपांत अर्थविषयक शास्त्र यांत्रिक औद्योगिक क्रान्ति झाल्यानंतर जन्मास आलें. यंत्रयुगांत अर्थशास्त्र जन्मलें. ॲडाम् स्मिथ व रेकार्डो हे इंग्लंडमधील अर्थशास्त्राचे आद्य आचार्य होत. अर्थशास्त्रावर मराठींत अत्यल्प रचना झाली आहे. कारण या राष्ट्राच्या आर्थिक व्यवहाराचीं सूत्रें परकीयांच्या ताब्यांत, गेलीं दीडशें वर्षे गेलीं आहेत; त्यामुळें आर्थिक व्यवहाराचें विवेचन करणारें शास्त्र परकीयांकडूनच घ्यावें लागणें भागच होतें. युरोपियन अर्थशास्त्राचा अभ्यास करून लिहिलेलीं मराठींत पांच-सातांपेक्षां जास्त पुस्तकें सापडणार नाहींत. पहिल्यांदा कृष्णशास्त्री चिपळूणकर यांनीं मिल्च्या अर्थशास्त्राचें भाषांतर करण्याचा प्रयत्न केला पण तो अपुरा राहिला. ४० वर्षांपूर्वी लिहिलेलें श्री. आगाशे यांचें "अर्थ शास्त्र" हें पुस्तक मराठींत पहिलें होय. त्यांत खुल्या व्यापाराचें तत्त्व हिंदी उद्योगधंद्यांच्या वाढीस प्रतिबंध करतें ही गोष्ट पहिल्यांदा सांगितली आहे. अर्थशास्त्राचा मौलिक अभ्यास केलेले महान् पंडित कै. न्या. मू. रानडे होत. त्यांनीं इंग्रजींत भारतीय अर्थशास्त्रासंबंधीं इंग्लिश अर्थशास्त्रापेक्षां निराळीच व्यवस्था सुचविली आहे. औद्योगिक दृष्ट्या पुढारलेल्या राष्ट्रांना खुल्या व्यापाराचें तत्त्व अत्यंत लाभदायक होतें, परंतु औद्योगिक दृष्ट्या मागें पडलेल्या राष्ट्रांना तेंच तत्त्व घातक ठरतें. म्हणून सप्रतिबंध व्यापाराचें तत्त्व मागें पडलेल्या राष्ट्रांना लागू करणें जरूर आहे आणि मागासलेल्या राष्ट्रांतील उद्योगधंद्यांना—व विशेषतः भारतीय उद्योगधंद्यांना—संपूर्ण संरक्षण देण्याची आवश्यकता आहे याचें समर्थन रानडे यांनीं चांगलें केलें. जर्मनींतील त्या वेळच्या अर्थशास्त्रज्ञांची विचारसरणी भारतीय अर्थशास्त्रास व विशेषतः भारतीय औद्योगिक उन्नतीस अधिक उपयुक्त होय ही गोष्ट श्री. रानडे यांनीं ओळखली. प्रत्येक राष्ट्राचें अर्थशास्त्र थोड्याबहुत फरकानें भिन्नभिन्न असतें, असें त्यांनीं सांगितलें. हिंदुस्थानांतील राजकीय चळवळीचा आर्थिक पाया रानडे व दादाभाई नौरोजी यांनीं दाखविला. दादाभाईंचा "हिंदी आर्थिक शोषणाचा सिद्धान्त" (Drain Thesis) हा भारतीय राष्ट्रीय चळवळीची प्रेरक शक्ति बनला. ब्रिटिश अमदानींत हिंदुस्थानचा आर्थिक व्यवहार पाश्चात्य देशांच्या आर्थिक व्यवहाराशीं पूर्ण निगडित झाला; पण त्यामुळें भारतवर्षीय सामान्य जनतेची स्थिति सुधारण्याऐवजीं, तिची हलाखीच

वाढत गेली; त्यास ब्रिटिशांनीं व्यापारद्वारें हिंदुस्थानची केलेली लूटच कारण होय; हें हिंदी राष्ट्राच्या आर्थिक शोषणाचें तत्त्व मार्मिक रीतीनें दादाभाईंनीं मांडलें. मराठींत अर्थशास्त्रावरील दोन महत्त्वाचे लेखक म्हणजे, प्रि. गो. चिं. भाटे व प्रो. वा. गो. काळे हे होत. गो. चिं भाटे यांनीं पाश्चात्य अर्थ-शास्त्राची मूलभूत विचारसरणी मराठींत थोडक्यांत सुगम रीतीनें मांडली. प्रो. वा. गो. काळे यांनीं "अर्थशास्त्र" व "भारतीय अर्थशास्त्र" हीं दोन पुस्तकें लिहिलीं आहेत. काळे यांनीं हीं पुस्तकें नुकतींच लिहिलीं आहेत. आगाशे व न्या. मू. रानडे यांचा काळ आतां राहिला नाहीं. जगाच्या आर्थिक परि-स्थितींत गेल्या पंचवीस वर्षांत प्रचंड क्रांति झाली आहे. भांडवलशाहीच्या विकासाच्या काळीं जीं अर्थतत्त्वें निर्माण झालीं तीं आतां निःसत्त्व होऊन व्यर्थ ठरलीं आहेत. "खुल्या व्यापाराच्या तत्त्वाचें आतां पूर्ण उच्चाटन झालें आहे. कांहीं उदारमतवादी अर्थशास्त्रज्ञ केवळ मनःसमाधानाकरतांच अजून त्याचा जप करीत असतात. सगळ्याच जगाची, सोव्हियट रशिया सोडल्यास, आर्थिक अवनती होत आहे. उद्योगधंद्यांचें नियंत्रण करणारें व उत्पादनास प्रतिबंधक असें प्रतिगामी अर्थशास्त्र अस्तित्वांत येऊं लागलें आहे. हिंदुस्थानांत औद्योगिक प्रगति खुल्या व्यापाराच्या तत्त्वानें तर होणार नाहींच; पण सप्रतिबंधक व्यापाराच्या तत्त्वानेंसुद्धां थोड्याशा मर्यादेबाहेर होऊं शकणार नाहीं, ही गोष्ट आतां स्पष्ट दिसूं लागली आहे. मंदीचें संकट जगाच्या आर्थिक व्यवहारावर पूर्णपणें स्वार होऊन बसलें आहे. अशा स्थितींतून नवा मार्ग दाखविणारें अर्थशास्त्र पाहिजे. प्रो. वा. गो. काळे यांच्याकडून अशा अर्थशास्त्राची अपेक्षा करणें चूक ठरेल. श्री. वा. गो. काळे यांच्या "भारतीय अर्थशास्त्रांत" त्यांना स्वतःला अमान्य असलेला गांधीवादच शिरला आहे. हल्लींच्या अगतिक स्थितींच्या कचाट्यांतून बाहेर पडण्याचा श्री. काळे यांस एकच उपाय दिसतो. तो म्हणजे हिंदुस्थानांतील जुन्या लहानलहान हातधंद्यांचें पुनरुज्जीवन होय. आधुनिक यांत्रिक उद्योगधंद्यांच्या वाढीचा कसलाच उपाय ते सुचवूं शकत नाहींत. त्याचप्रमाणें ते परकीय भांडवलाचें दास्य प्रशस्त मानतात. काळे यांचे विचार या बाबतींत गुलामगिरीचा पुरस्कार करणारे आहेत. कारण श्री. काळे परकीय भांडवलाचें हिंदुस्थानांत स्वागत करतात.

याचा दुसरा अर्थ काय होईल ? "अर्थशास्त्र" ह्या पुस्तकांत समाजवादी व मार्क्सवादी अर्थशास्त्राचीं तत्त्वें खोडून काढण्याचा प्रयत्न काळे यांनीं केला आहे, पण तो सर्वस्वीं फसला आहे. मार्क्सचा श्रममूल्याचा सिद्धान्त (Labour-theory of Value) आणि अतिरिक्त मूल्याचा सिद्धान्त (Theory of Surplus Value) चुकीचे आहेत असें नुसतें कारणें न दाखवितां म्हटलें आहे. पण ते सिद्धान्त चुकीचे कसे, हें मुळींच श्री. काळे दाखवूं शकले नाहींत. आर्थिक नियोजनाचें व सामाजिक मालकीचे विवरण श्री. काळे यांस मुळींच करतां आलें नाहीं. आर्थिक नियोजन सोव्हियट रशियानें दोन पंचवार्षिक योजनांच्या द्वारें संपूर्ण रीतीनें यशस्वी केलें ही गोष्ट निदर्शनास आणण्याची जबाबदारी अर्थशास्त्रलेखकांवर पडते. सोव्हियट रशियाची आर्थिक नियोजनपद्धति (Planned economy) चुकीची वाटत असल्यास ती चुकीची कशी हें दाखविणें आजच्या शास्त्र-लेखकांचें कर्तव्य आहे. हें कर्तव्य श्री. काळे यांच्यासारख्या नामवंत लेखकानें जर पार पाडलें नाहीं तर तें कोणी पार पाडावें? जपान, अमेरिका, इटली, जर्मनी इत्यादि राष्ट्रांत आर्थिक नियोजनाचे प्रयत्न झाले; निदान त्यांचा तरी परामर्श श्री. काळे यांनीं घ्यावयास पाहिजे होता! तेथें तर समाजवादाचा बागुलबोवा नाहीं ना ?

राज्यशास्त्रासंबंधीं कांहीं पुस्तकें उल्लेख करण्यासारखीं झालीं आहेत. दाभोळकरमालेंत या विषयावरील एका इंग्रजी पुस्तकाचा अनुवाद प्रसिद्ध झाला आहे. श्री. शं. द. जावडेकर यांचें "राजनीतिशास्त्रपरिचय" हें पुस्तक मराठींत नांवाजण्याजोगें झालें आहे. लास्कीच्या ग्रामर ऑफ पॉलि-टिक्स ह्या पुस्तकाची छाया श्री. जावडेकर यांच्या या पुस्तकावर पडली आहे. फर्ग्युसन कॉलेजचे प्रो. लिमये यांनीं प्राचीन भारतीय राजनीतीविषयीं एक छोटेखानी पुस्तक लिहून ह्या विषयाची मराठींतील उणीव भरून काढली आहे. इंग्रजी अमदानीपूर्वीचें ह्या विषयावरचें पुस्तक म्हणजे पंत-अमात्यांची "राजनीति" हें होय. राज्यशास्त्राशीं संबद्ध असलेल्या अनेक विषयांचा व वादांचा ऊहापोह करणारी माला य. गो. जोशी प्रसिद्ध करीत आहेत. त्यांत लोकशाही, साम्राज्यवाद, समाजवाद, फॅसिझम् इत्यादि लहान पुस्तकें प्रसिद्ध झालीं आहेत. श्री. पां. वा. गाडगीळ, वाङ्मय-विशारद,

यांचें 'समाजवादाचा ओनामा' हें पुस्तक चांगलें उठावदार झालें आहे. प्रसिद्ध हिंदी तत्त्ववेत्ते भाई एम्. एन्. रॉय यांच्या 'फॅसिझम्' या खोल विचाराच्या पुस्तकाचाहि अनुवाद मराठींत झाला आहे. बेळगांव येथील बा. रं. सुंठणकर यांचें 'रॉयवाद' हें पुस्तक राज्यशास्त्रदृष्टया मराठी वाङ्मयांत अतिशय उच्च पदवीचें झालें आहे. "मार्क्सवादाचा प्रयोग" हा धारवाड येथील वकील श्री. स. रं. सुंठणकर यांचा ग्रंथ राज्यशास्त्रांतील व अर्थशास्त्रांतील विवादग्रस्त प्रश्नांवर झगझगीत प्रकाश पाडण्याइतका समर्थ झाला आहे. श्री. न. चिं. केळकर यांचें "राज्यशास्त्र" हें पुस्तक श्री. केळकर यांच्या वाङ्मय-कीर्तीत विशेष भर घालीत नाहीं; याचें कारण त्यांनीं तें फार घाईनें लिहिलेलें असावें. दृष्टान्त-अलंकारांच्या व अलंकारिक कोटि-प्रतिकोटींच्या भरीस पडून त्यांनीं स्वतःच्या पुस्तकाची शास्त्रीय किंमत कमी केली आहे. "नागरिक नीति" या संज्ञेचें महत्त्वाचें पुस्तक प्रो. पुणतांबेकर यांनीं लिहिलें आहे, तें नागपूरच्या अभिनवभारतमालेंत प्रसिद्ध झालें आहे.

## धर्मशास्त्र व नीतिशास्त्र

मराठींत धर्मसंस्थेची व धर्मतत्त्वांची समाजशास्त्रदृष्टया छाननी करणारा एकहि ग्रंथ प्रसिद्ध झाला नाहीं. श्रद्धेनें व भक्तीनें लिहिलेलें धर्मविषयक वाङ्मय मराठींत पुष्कळ प्रसिद्ध झालें आहे. हिंदूंच्या चालीरीतींत व धार्मिक कल्पनांत सुधारणा व्हाव्यात किंवा होऊं नयेत, ह्यासंबंधीं चर्चा करणारें बरेंच लिखाण मराठींत आढळून येतें. पण त्या लिखाणांस शास्त्राचा दर्जा नाहीं. "गीतारहस्यां"त प्रो. महादेव मल्हारप्रणीत "आधुनिक सुशिक्षितांचा वेदान्त" या पुस्तकांत आणि श्री. कोल्हटकरकृत "भागवतांच्या उपसंहारां"त धार्मिक तत्त्वांची चांगली प्रगल्भ चर्चा केलेली आढळून येते. पण सामाजिक शास्त्र या नात्यानें ज्या धर्मचर्चेला महत्त्व देतां येईल अशी चर्चा मराठींत कोठेंहि नाहीं. वेदान्त विषयाची किंवा आत्मा, पुनर्जन्म, ईश्वर-मोक्ष इत्यादि कल्पनांची चर्चा म्हणजे धर्मचर्चा असें जरी म्हणतां आलें तरी सामाजिक शास्त्रांत तिचा अंतर्भाव करतां येत नाहीं. वेदान्तविषयक ग्रंथ मराठींत पुष्कळ आहेत.

नीतितत्त्वांची शास्त्रीय चर्चा करणारी चार पांच पुस्तकें मराठींत प्रसिद्ध आहेत. दाभोळकरमालेंत स्पेन्सरच्या नीतिमीमांसेचा अनुवाद प्रसिद्ध झाला आहे. लोकमान्य टिळकांचें "गीतारहस्य" व वा. म. जोशी यांचें "नीतिशास्त्र प्रवेश" या दोन ग्रंथांनीं मराठींत सर्वोच्च स्थान पटकावलें आहे. या दोन्ही ग्रंथांत भारतीय व पाश्चात्य नीतितत्त्वांचा ऊहापोह केलेला आढळतो.

'गीतारहस्य'कारांनीं आधुनिक पाश्चात्य नीतिमीमांसेच्या विविधविचारसरणींचा समाचार घेऊन त्या सर्वांत भारतीय नीतिमीमांसेस त्रिकालाबाधित ठरविलें आहे. हें ठरवीत असतांना लो. टिळकांनीं गूढवादाचा आश्रय करावा लागला आहे. त्यांनीं आत्मानात्मविवेक ही नीतितत्त्वांची कसोटी ठरविली. परंतु जें आत्मतत्त्व चराचरांत भरून राहिलें आहे व विकारातीत आहे, त्याचा कितीहि विचार केला तरी कर्तव्याकर्तव्यें कशीं ओळखतां येतील, हेंच मोठें गूढ आहे. पाषाणांत माझें आत्मतत्त्व आहे हें कळल्यामुळें पाषाणाशीं पाषाणविषयक कर्तव्य कसें काय ठरणार? शत्रु व मित्र, चोर व साव, रानटी व सुधारलेला, गुन्हेगार व निरपराधी, बाल व वृद्ध, स्त्री आणि पुरुष, मनुष्य आणि मनुष्येतर या सर्वांत आत्मतत्त्व सारखेंच आहे; पण त्यासंबंधीं उत्पन्न होणारीं कर्तव्यें किती तरी प्रकारचीं आहेत. त्या निर्विकार व व्यापक आत्म्याशीं या कर्तव्याचा कांहींहि संबंध नाहीं. स्थितप्रज्ञाची बुद्धि हीच सर्वश्रेष्ठ न्यायनिर्णेत्री होय असें रहस्यकार मानतात; पण हा स्थितप्रज्ञ मनुष्यजातींत कसा सापडायचा? गीतेंत सांगितलेलीं त्याचीं लक्षणें कोणत्याहि मनुष्यप्राण्यास तंतोतंत लागू पडणार नाहींत. कारण जिवंत मनुष्याच्या ठायीं मनोविकार असणें स्वाभाविक आहे. तसेंच मनोविकारांवर विजय मिळविलेला एखादा माणूस जरी सापडला, तरी मानवसमाजाची विविध व वैचित्र्यपूर्ण रचना आणि समाजधारणेचें व समाजस्थित्यंतराचे सूक्ष्म नियम त्या गृहस्थास अवगत नसल्यास तो कर्तव्याकर्तव्याचा न्यायाधीश कसा होणार? गीतारहस्यांतील स्थितप्रज्ञ व आत्मानात्मविवेक हीं गूढतत्त्वें विवेचक बुद्धीला नीट आकलन होण्यासारखीं नाहींत. तसेंच, गीतारहस्यामध्यें गीतेला संपूर्ण प्रामाण्य दिल्यामुळें नवा शब्दप्रामाण्यवाद (Dogmatism) टिळकांनीं नीतिशास्त्रांत आणला आहे. बुद्धिवादानें गीतेची छाननी करण्याचें हें युग आहे. या वेळीं स्वतःप्रमाण धर्मग्रंथ म्हणून

गीतेचा स्वीकार केल्यानें बुद्धिवादाच्या वाढीस टिळकांनीं अडथळा केला आहे. अवतार, विभूति व अलौकिक पुरुष यांच्या प्रामाण्याचा स्वीकार केल्यामुळें भारतीय बुद्धीची स्वतंत्र वाढ खुंटली आहे. धर्मग्रंथ, अवतार, व विभूति यांचें स्वतःप्रामाण्य किंवा यांच्यावरील श्रद्धा भारतीय बुद्धीची व विज्ञानप्रवण-तेची हानि केल्याशिवाय कधींहि राहणार नाहीं.

वामन मल्हार जोशी यांचा 'नीतिशास्त्रप्रवेश' बुद्धिवादावर अधिष्ठित आहे. नीतिशास्त्रांतील अनेक तत्त्वांची चर्चा करून शास्त्रजिज्ञासा श्री. जोशी यांनीं प्रदीप्त केली आहे. पण निर्णायक स्वरूपाची चर्चा फार थोडी केली आहे. नैतिक मूल्यें निरनिराळ्या समाजरचनेंत निरनिराळीं असतात व त्यांचा विकास होत असतो. समाजरचना ज्या क्रमानें विकसित होत जाते त्या मानानें नीतिमूल्येंहि विकसित होतात. नीतीची सार्वभौम, शाश्वत व संपूर्ण तत्त्वें स्थापण्याचा प्रयत्न करणें या दृष्टीनें चुकीचें आहे. नीतिशास्त्राच्या चर्चेच्या घोटाळ्यांतून स्वतःच मुक्त न झाल्यामुळें श्री. जोशी हे निर्णायक सिद्धान्तसरणीप्रत पोंचले नाहींत. मनुष्यसमाजाच्या निरनिराळ्या स्थित्यं-तरांचा व रचनांतरांचा कार्यकारणभाव, प्रकार व स्वरूपें यांचा परामर्श घेतल्याशिवाय विविध नीतितत्त्वांचा विकास व प्रभाव निश्चित करतां येणें शक्य नाहीं. समाजाची ऐतिहासिक मीमांसा केल्याशिवाय नीतिशास्त्र तयार होऊं शकत नाहीं.

## भाषाशास्त्र व टीकाशास्त्र

( Criticism of Literature and Art ).

संस्कृत भाषा पाश्चात्य लोकांस ज्ञात झाल्याबरोबर त्यांना भाषाशास्त्र निर्माण करतां आलें. परंतु ह्या शास्त्राच्या निर्मितींत आधुनिक भारतीय विद्वानांनीं कांहीं फारशी भर घातली नाहीं. श्री. वि. का. राजवाडे हे चांगले भाषाशास्त्रज्ञ होते. त्यांनीं "संस्कृत भाषेचा उलगडा" हें भाषाशास्त्रासंबंधीं अभिनव विचारसरणीनें युक्त असें पुस्तक लिहिलें आहे. व्याकरण हें भाषा-शास्त्र नव्हे, तें भाषाशास्त्राचें साधन आहे. म्हणून व्याकरणावरील ग्रंथ भाषाशास्त्रांत अंतर्भूत होत नाहींत. " राजवाड्यांचा मराठी धातुकोश " हें

पुस्तक भारतीय भाषाशास्त्राच्या अभ्यासाला चांगलें उपयुक्त ठरेल. प्रो. कृ. पां. कुलकर्णी यांनीं मराठी भाषेतिहासाच्या अभ्यासास प्रारंभ केला आहे.

ललितसाहित्य व ललितकला यांचें रहस्योद्‌घाटन करणारें किंवा तत्त्व-चर्चा करणारें टीकाशास्त्र पाश्चात्य देशांत उदयास आलें आहे. संस्कृतमधील साहित्यशास्त्र याच शास्त्राचें पूर्वरूप होय. मराठींत टीकाशास्त्रविषयक लेखन हळूहळू वृद्धि पावत आहे. संस्कृतमधील साहित्यशास्त्राचा मराठींत अनेक लेखकांनीं अनुवाद केला आहे. संस्कृतमधील रससिद्धांताची साधक व बाधक चर्चा मराठींत सुरू आहे. श्री. द. के. केळकर यांचें "काव्यालोचन", प्रो. ना. सी. फडके यांचें "प्रतिभासाधन", श्री. न. चिं. केळकर यांचें "हास्य व विनोद" आणि "विनोदमीमांसा", प्रो. रा. श्री. जोग यांचा "अभिनक काव्यप्रकाश", श्री. आगाशे यांची " सारस्वतसमीक्षा ", श्री. ग. त्र्यं. माडखोलकर यांचें "अभिनव कविपंचक", लालजी पेंडसे यांचें "साहित्य व समाज जीवन", पु. ग. सहस्रबुद्धे यांचें " स्वभावलेखन " इत्यादि पुस्तकें महाविद्यालयीन शिक्षकांपुढें आणि विद्यार्थ्यांपुढें येत आहेत. आचार्य प्र. के. अत्रे, प्रो. पु. य. देशपांडे यांचे टीकाविषयक लेखहि उच्च दर्जाचे आहेत. लालजी पेंडसे यांच्या पुस्तकानें कांहीं वेळपर्यंत मराठी वाङ्मयलेखकांत व टीकालेखकांत खळबळ उडवून दिली. समाजवादी दृष्टिकोनानें टीकाशास्त्राचीं तत्त्वें मांडण्याचा हा पेंडसे यांचा प्रयत्न स्तुत्य जरी असला तरी तो यशस्वी झाला नाहीं ही गोष्ट श्री. पु. य. देशपांडे यांच्या 'प्रतिभा' मासिकांतील सात लेखांकांनीं पूर्ण रीतीनें सिद्ध झाली आहे. लालजींनीं हा प्रयत्न इतक्या घाईनें करावयास नको होता. त्यामुळें मार्क्सवादी दृष्टिकोनाबद्दल त्यांनीं मराठी विद्वानांत गैरसमज उत्पन्न केला आहे, आपल्या देशांत मार्क्सवादाचें अध्ययन नुकतेंच कुठें सुरू झालें आहे. त्यांत लालजींच्या घिसाडघाईनें व्यत्यय मात्र आणला. टीकाशास्त्रांत ( १ ) सामाजिक-इतिहासवादाचें तत्त्व दाखल झाल्याशिवाय टीकाशास्त्रास शास्त्रही पदवी येणारच नाहीं. ( २ ) त्याच-प्रमाणें मानवी भावनांच्या शाश्वत स्वरूपावर आणि सौंदर्याच्या शाश्वत तत्त्वां-वर जोंपर्यंत टीकाशास्त्र भर देत आहे, तोंपर्यंत टीकाशास्त्र प्रमाणभूत सिद्धांता-प्रत पोंचणार नाहीं. ( ३ ) तसेंच भावनांचें आलंबन बनणारें जीवनाचें स्वरूप जितकें विविध असतें, तितक्याच भावनाही विविध बनतात आणि हें

आलंबन जसजसें बदलतें व विकसित होत जातें त्याप्रमाणें भावनाहि वैचित्र्य-पूर्ण आणि विकसित होत जातात; हे तीन सिद्धान्त टीका-शास्त्राचे प्राथमिक सिद्धान्त होत. यांचा थांग समाजवादी टीकाकार सोडल्यास कोणत्याहि मराठी टीकाकारास लागला नाहीं. लालजी पेंडसे व पु. य. देशपांडे हे केवळ ह्या सिद्धांतास स्पर्श करूं शकतात. विशेषतः पु. य. देशपांडे यांनीं आपले सात लेखांक लिहूनच टीका-वाङ्मयास रामराम न केल्यास या विषयावर मराठींत चांगलें वाङ्मय ते लिहूं शकतील. प्रो. ना. सी. फडके व द. के. केळकर यांच्या पुस्तकांनीं मराठींतील टीका-वाङ्मयांत मिळविलेलें प्रशस्त स्थान अढळ आहे.

## सामाजिक क्रांतीचा सामाजिक शास्त्रांच्या निर्मितीशीं संबंध

'मराठींतील सामाजिक शास्त्रें' ह्या विषयावर बोलावयाचें म्हणजे मराठींत हीं शास्त्रें पद्धतशीर रीतीनें लिहिलीं जावयास पाहिजे होतीं, पण या शास्त्रांचें मराठींत दुर्भिक्ष आहे. भारतीय समाजसंस्थेचें आजचें स्वरूपच दुर्बळ, पराधीन व विस्कळित असल्यामुळें समाजविषयक शास्त्रें भारतीय वाङ्मयांत वाढूं शकत नाहींत. आपला सामाजिक संसार भरभराटीस आल्यावरच आणि स्वतंत्र झाल्यावरच आपल्या वाङ्मयांत सामाजिक शास्त्रें स्वतंत्रपणें भरभराटीस येतील. आपलें सामाजिक जीवन कोतें, म्हणून आपलीं शास्त्रें कोतीं! गेल्या ४०० वर्षांत पाश्चात्य समाजांत मोठमोठ्या सामाजिक, राजकीय व आर्थिक क्रांत्या झाल्या, जगभर त्यांनीं पराक्रम केला, नवीन नवीन भूखंडें शोधून काढलीं आणि ज्या ठिकाणीं जंगलें व जंगली मानवच होते तेथें मोठमोठे सुधारलेले समाज उत्पन्न केले. म्हणूनच सामाजिक शास्त्रें त्यांनीं निर्माण केलीं. ज्यांची सामाजिक क्रिया किंवा कर्तृत्व मोठें, त्यांनाच मोठीं सामाजिक शास्त्रें निर्माण करतां आलीं. आपलें सामाजिक कर्तृत्व अल्प व भिकारी म्हणून आपलें शास्त्रज्ञानहि अल्प आणि भिकारी आहे. जे नवा समाज निर्माण करतील व जुना समाज मोडून टाकतील, तेच नवीं विशाल समाजशास्त्रें निर्माण करतील. हिंदुस्थानांत सामाजिक क्रान्ति झाल्याशिवाय सामाजिक शास्त्रेंच निर्माण होणार नाहींत. आपलें जीवन डबक्यायेवढें आहे व म्हणून आपलीं शास्त्रेंहि डबक्यापेक्षां मोठीं कशीं असतील!

---

# मराठींतील तत्त्वज्ञानविषयक वाङ्मय

# व

# त्याचा गेल्या शतकांतील विकास*

प्राध्यापक न. ग. दामले.

अध्यात्मविद्या विद्यानाम् ।

आपल्या वाचनालयाच्या शतसांवत्सरिक उत्सवानिमित्त होत असलेल्या व्याख्यानमालेंत एक पुष्प गोंवण्याची आपण मला संधी दिलीत याबद्दल मी प्रथम आपले आभार मानतों. विशेषतः माझ्या सवडीनुसार व्याख्यानाचा दिवस ठरविण्यांत आपण दाखविलेली उदारता व तत्परता यामुळें तर मी आपला अधिकच ऋणी झालों आहे. चालकांनीं मला "मराठींतील तत्त्वज्ञानविषयक वाङ्मय व त्याचा गेल्या शतकांतील विकास" असा फार व्यापक विषय दिला आहे. त्याचें एकाच व्याख्यानांत सांगोपांग विवेचन करूं म्हटलें तर तें अशक्य आहे. म्हणून तत्त्वज्ञानाचीं उपांगें म्हणून समाविष्ट होणारीं नीतिशास्त्र, मानसशास्त्र, तर्कशास्त्र, सौंदर्यशास्त्र वगैरेंचा विचार मला आज येथें करतां येणार नाहीं. केवळ अध्यात्म व धर्म यांचें विवेचन करून व त्यांचा परस्परांशीं कसा संबंध आहे याचा स्थूलपणें विचार करून त्याबद्दलच्या ग्रंथलेखनाचा साधारण आढावा येथें काढावयाचा आहे. तथापि अध्यात्म व धर्म यासंबंधीं विचार करीत असतांना आत्मसंशोधनपर म्हणून तदंगभूत असें जें मानसशास्त्र त्याचाहि जातां जातां आवश्यक तेवढा उल्लेख करणें क्रमप्राप्त होणार आहे. असो. विषयाला अशी मर्यादा घातल्यानंतर अध्यात्म व धर्म यांचा तात्त्विक विचार करूं.

---

* प्रा. दामले यांनीं दिलेल्या व्याख्यानाचा सारांश.

आपलें भरतखंड ही अध्यात्मभूमि आहे. आपल्या सर्व वैयक्तिक व सामाजिक आचार-विचारांना अध्यात्माचा आधार आहे. मानवाच्या ऐहिक उत्कर्षाला गति आणि मार्गदर्शन अशीं दोन्हींहि कार्यें अध्यात्मज्ञान या पुण्यभूमींत आज हजारों वर्षें करीत आलें आहे. अंतिम सत्याचा अनुभव घेऊन त्याचें तर्कशुद्ध रीतीनें आविष्करण करणें हें अध्यात्माचें ध्येय आहे. अशा आविष्करणाचें योग्य आकलन करवून त्या योगें मानवांच्या मनांतील संदेह, भीति यांचा निरास करून त्यांस चिरसुखाचा व शांतीचा— ध्येयप्रवण शांतीचा—लाभ करून देणें हें त्याचें व्यवहारी कार्य आहे. प्रा. राधाकृष्णन् म्हणतात...

"In India philosophy stood on its own legs, and all other studies looked to it for inspiration and support. It is the master science guiding other sciences, without which they tend to become empty and foolish. The Manduka Upanishad speaks of Brahma-Vidya or the science of the eternal as the basis of all sciences, *Sarva-Vidya-Pratistha*. "Philosophy" says Kautilya, "is the lamp of all the sciences, the means of performing all the works, and the support of all the duties."

अंतिम सत्याचें एकदां आकलन झालें म्हणजे त्याच सत्याचा अनेकविध स्वरूपांतला जणूं काय विलासच असें जें हें विश्व त्याचें यथार्थ ज्ञान त्याबरोबर होईल यांत संशय नाहीं. "येन विज्ञातेन सर्वं विज्ञानं भवति" या भूमिकेवर भारतीय तत्त्वज्ञान अधिष्ठित आहे.

आतां अध्यात्मावर अनेक प्रकारचे आक्षेप घेण्यांत येतात त्याचा थोडक्यांत परामर्श घ्यावयास हवा. सध्यांच्या प्रगतीच्या— अर्थातच आधिभौतिक प्रगतीच्या— युगांत मनुष्य अनेक प्रकारच्या उद्योगांत मग्न झालेला आहे. त्यास रोजच्या जेवणासहि वेळ मिळत नाहीं आणि परिस्थिति ही अशी विचित्र येऊन ठेपली आहे, कीं जर मानव या धावत्या प्रगतीबरोबर धावला नाहीं, तर तो जगाच्या शर्यतींत मागें पडून, पाठीमागून वेगानें येणाऱ्याच्या

टांचेखालीं तुडवला गेल्याशिवाय राहणार नाहीं. 'ही जेथें सध्यांच्या प्रगतीची कहाणी, तेथें अध्यात्मासारख्या विषयाबद्दल बहुजनसमाजांत अनेक गैरसमज पसरावेत यांत नवल नाहीं.

अध्यात्माचा विचार मानवाला निष्क्रिय बनवितो अशी कित्येकांची समजूत आहे. परंतु अध्यात्माचें यथार्थ स्वरूप ज्याला समजलें तो निष्क्रिय राहूंच शकत नाहीं. अध्यात्म म्हणजे कांहीं सर्वसंगपरित्याग करून गिरिकंदरीं जाऊन एकलकोंडेपणानें राहणें नव्हे. सर्व ऐहिक कर्तव्यें अध्यात्मानें प्रेरित होऊन तो करीत राहतो. अध्यात्मविचार मानवांच्या आयुष्यांत खऱ्या आणि योग्य ध्येयाची स्थापना करतो व तें ध्येय एकदां ठरल्यानंतर त्याच्या प्राप्तीचे मार्गहि सांगतो. ज्यांच्या अंगीं अध्यात्म बाणलें त्या पुरुषांनीं आपलें कर्तव्य तत्परतेनें, अविरतपणें करून जगाला तेजस्वी पुरुषार्थांचे धडे घालून दिले आहेत. रामदास, विवेकानन्द यांच्यासारख्या कर्मयोग्यांचीं चरित्रें आपणांस हेंच सांगत नाहींत का?

हाच आक्षेप कांहीं लोक थोड्या निराळ्या भाषेंत मांडतात. त्यांचें म्हणणें असें कीं, अध्यात्माच्या अभ्यासामुळें मनुष्य निराशावादी होतो. जें तत्त्वज्ञान या जगाबद्दल मनांत तिरस्कार उत्पन्न करतें—जें तत्त्वज्ञान जें जें ऐहिक तें तें मिथ्या अशी समजूत करून देऊन मानवाचें मन इहलोकीच्या सर्व गोष्टीं-विषयीं पूर्णपणें विरागी बनवितें—त्या तत्त्वज्ञानाबद्दल किंवा अध्यात्माबद्दल असा आक्षेप सत्य ठरेल. परंतु भारतीयांच्या ओजस्वी तत्त्वज्ञानाची बैठक तर्कशुद्ध व स्थिरपायावर असल्यानें त्याबद्दल मात्र हा आक्षेप फोल ठरतो. मानवी जीवनांतील आनंद व उल्हास यांकडे आमच्या अध्यात्मानें दुर्लक्ष केलेलें नाहीं. प्रा. राधाकृष्णन् म्हणतातः—

"Indian thinkers are pessimistic in so far as they look upon the world order as an evil and a lie. They are optimistic since they feel that there is a way out of it into the realm of truth, which is also goodness."

दुसऱ्या कांहींचें म्हणणें असें आहे कीं, अध्यात्म मानवास समाजविन्मुख करतें. पारलौकिकाविषयीं मनामध्यें अतिरिक्त इच्छा उत्पन्न झाल्यामुळें

ऐहिकाविषयीं तो उत्तरोत्तर उदासीन होत जातो. परंतु हा आक्षेपहि वरच्या-सारखाच भ्रामक आहे. केवळ इंद्रियजन्य सुखाची अपेक्षा करूं नये. कारण तें क्षणजीवी आहे. आणि म्हणून मानवाच्या सबंध आयुष्याचें तें स्थिरध्येय होऊं शकणार नाहीं असें अध्यात्माचें सांगणें आहे. इंद्रियजन्य सुखापलीकडे कांहींतरी शाश्वत आनंद देणारें तत्त्व आहे व मानवानें तें अनुभाविण्यासाठीं अहर्निश यत्न करावा असा अध्यात्माचा आग्रह आहे. म्हणून कांहीं ऐहिक हें सर्व त्याज्य– त्यापासून जितकें दूर पळून जातां येईल तितकें बरें– असें अध्यात्म सांगत नाहीं; उलट ऐहिकांतूनच पारलौकिकाकडे कसें जावयाचें याचा विचार तें करतें. अध्यात्माची जीवनाकडे पाहण्याची दृष्टि शुद्ध, स्थिर व व्यापक अशी असते.

या दृष्टीनें आपल्या अध्यात्मांतील दर्शन हा शब्द फार महत्त्वाचा आहे. अध्यात्मांत तो अनुभूति या अर्थी वापरतात. "A darshana is a spiritual perception,—a whole view revealed to the soul." आध्यात्मिक उन्नतीचा परमोच्च बिंदु म्हणजेच अनुभूति अथवा साक्षात्कार होय. त्याशिवाय सर्व ज्ञान, सर्व तप, सर्व श्रम, व्यर्थ होत.

**अनुभूतिंविना मूढो वृथा ब्रह्मणि मोदते ।**

**प्रतिबिंबितशाखाग्रफलास्वादनमोदवत् ॥**

अर्थातच या उच्चतम स्थानीं जाण्यापूर्वी त्याआधींच्या पायऱ्या आपण चढावयास हव्या; म्हणूनच नित्यानित्यविवेक, इहामुत्रफलभोगविराग, शमदमादि साधनें व मुमुक्षुत्व यांचें महत्त्व वर्णिलें आहे. यांच्या साहाय्यानेंच मानव मोक्षाचा अधिकारी होऊं शकतो. आपली मोक्षाची कल्पना विश्व सामावेल इतकी विशाल आहे. तींत "संपूर्ण ज्ञान, संपूर्ण स्वातंत्र्य, आनंदातिशय व अखिल मानवजातीवरील प्रेम" या सर्वांचा अंतर्भाव होतो. मग अशा ध्येयानें प्रेरित झालेला मानव समाजविन्मुख कसा राहील ! उलट तो सर्वभूतहितरत असाच झाला पाहिजे. लो. टिळकांनीं गीतारहस्यांत अध्यात्म आणि आधिभौतिक शास्त्रें यांचे परस्परसंबंध मोठ्या मार्मिकपणें विशद केले आहेत. ते म्हणतात :

" मनुष्य या पृथ्वीवर निर्माण झाल्यापासून सर्व दृश्य व नाशवंत सृष्टीचें मूलभूत अमृत तत्व काय, व तें मला कसें प्राप्त होईल, याचा विचार तो एकसारखा करीत आला आहे; व आधिभौतिक शास्त्राची किती जरी वाढ झाली तरी, मनुष्याची अमृत तत्त्वाच्या ज्ञानाकडील ही स्वाभाविक प्रवृत्ति कधींही कमी व्हावयाची नाहीं. आधिभौतिक शास्त्रें कितीही वृद्धिंगत होवोत; सर्व आधिभौतिक सृष्टिविज्ञान बगलेस मारून तत्वज्ञान नेहमींच त्याच्यापुढें धांव घेत रहाणार! दोनचार हजार वर्षांपूर्वीं हीच स्थिति होती, व आतां पाश्चिमात्य देशांतूनही तोच प्रकार नजरेस येत आहे. किंबहुना मनुष्याच्या बुद्धीची ही हांव ज्या दिवशीं सुटेल त्या दिवशीं त्यास " स वै मुक्तोऽथवा पशुः " असें म्हणावें लागेल!—" (गी. र. पृ. २१० )......

हल्लीं जगांत अध्यात्म व भौतिक शास्त्रें यांचा संबंध पूर्णपणें तुटल्यासारखा झाला आहे. त्यामुळें आधिभौतिक प्रगतीला योग्य ध्येय राहिलें नाहीं. गतिपूर्ण आधिभौतिक ज्ञान त्यामुळें वाटेल त्या दिशेनें पळत सुटल्यासारखें दिसत आहे. आज जगांत चोहींकडे स्वार्थ, अंधश्रद्धा, कर्मठपणा यांचें प्राबल्य मातलें आहे. राष्ट्रीय दुरभिमान, जातीय वैमनस्य, आर्थिक तृष्णा व अधिकारलालसा हीं अतोनात वाढून मानवांतील शत्रुत्व निकराला येऊन पोंहोचलें आहे. म्हणूनच आज जगांतील राष्ट्रें युद्धाला प्रवृत्त झालेलीं आहेत. भौतिक शास्त्रांनीं आपल्यापरी प्रगति केली खरी; परंतु बाह्य विश्वाचें ज्ञान व त्या योगें पंचमहाभूतांवरील अधिकाधिक प्रभुत्व यापलीकडे त्यांस जाणें अशक्य आहे. अन्तर्विश्वाचें आकलन भौतिक शास्त्रांस होणार नाहीं. म्हणूनच मानवी आयुष्यांतील फक्त कांहीं भागांचाच त्यास विचार करतां येईल. बुद्धीच्या कक्षेबाहेर असलेल्या शाश्वत तत्त्वाचें परिशीलन व अभ्यास फक्त अध्यात्मच करूं शकेल. भौतिक समर्याद आहे, तें संपूर्ण नाहीं; म्हणून त्याचें मार्गदर्शकत्वहि मर्यादितच असणार; आणि आधिभौतिकाच्या मर्यादेबाहेरहि मानवी जीवन पसरलें असल्यानें त्या जीवनाचा विचार होणें अपरिहार्य म्हणून धर्माचा जन्म झालेला आहे. आधिभौतिकापलीकडील जीवनाविषयीं मानवाच्या मनांत असलेला अज्ञानाचा अंधःकार घालवून त्याला परमात्म्याचें दर्शन करवून शांति आणि समाधान देणारा असा फक्त धर्मच या वसुंधरेवर आहे. मानवसेवेंतच खरी ईश्वरभक्ति साठविली आहे.

या परमोच्च ध्येयाची सार्थ शिकवण फक्त धर्मच देतो. "आत्मनः मोक्षार्थं जगतः हिताय च" हा धर्माचा स्फूर्तिदायक संदेश आहे. वैयक्तिक संकुचित दृष्टि व्यापक करून अखिल विश्वाची सेवा कशी करावी याचें मर्म धर्मविचार सांगतो; म्हणूनच आधिभौतिक शास्त्रांची किंवा बुद्धीची कामगिरी किंवा किंमत कोठल्याहि प्रकारें कमी न करतां असें म्हणतां येईल कीं, केवळ धर्मामुळेंच मानवजातीचें संरक्षण व समुन्नति होईल.

धर्माची "चोदना लक्षणोऽर्थो धर्मः" अशी मीमांसकांनीं व्याख्या केलेली आहे. "धारणात् धर्मः" अशीहि व्याख्या कांहीं करतात. तर समर्थ "स्वरूपीं राहणें । हा स्वधर्म" असें सांगतात. या किंवा आणखी दुसऱ्या कितीहि व्याख्या केल्या तरी "धर्म" या कल्पनेच्या मध्यबिंदूशीं उभी असलेली 'नीति' मात्र कधींच डावलून किंवा वगळून चालणार नाहीं. नीति या शब्दाचा अर्थ समजून घ्यावयाचा तर असें म्हणतां येईल कीं सत्वगुणांचा पूर्ण उत्कर्ष म्हणजे 'नीति' होय. या दृष्टीनें हिंदुधर्म हा अत्यंत श्रेष्ठ धर्म आहे. सकृद्दर्शनीं तो अनेक मतें, पंथ व संप्रदाय यांची एक कशी तरी बनवलेली गोधडी आहे असें वाटेल; परंतु सूक्ष्म विचाराअंतीं या विविधतेंतहि ऐक्य भरलें आहे असें दिसून येईल.

आपला हा हिंदुधर्म फार व्यापक आहे; सर्व प्रकारच्या व सर्व दर्जाच्या लोकांना, त्यांची पात्रता व अभिरुची यांच्या अनुरोधानें अनेक देवतांची उपासना करण्याची मुभा देऊन ईश्वरी साक्षात्काराचे अनेक मार्ग या धर्मानें दाखविले आहेत. शिवाय तो इतका उदारशील आहे कीं, आपल्यालाच सत्यदर्शन झालें आहे व इतरांस तें होणार नाहीं असला खोटा हेकेखोरपणा त्यानें कधींच केलेला नाहीं. इतकेंच नव्हे तर सर्व धर्मांतील विभूतींना निःशंकपणें वंदन करण्याइतकी त्याच्या विचारांची प्रगल्भता मोठी आहे. प्रत्येकानें आपापल्या धर्माचें योग्य परिपालन करावें असा त्याचा आग्रह आहे.

धर्म म्हणजे अंधश्रद्धा नव्हे. मुक्ति हें ध्येय ठेवून त्याकरतां योग्य मार्गांनीं व प्रामाणिकपणें अहर्निश यत्न करणें म्हणजे धर्मपालन करणें होय. हिंदुधर्माची विचारप्रणाली अशी असल्याकारणानें त्यांतील विचारवंतांनीं सामाजिक स्वास्थ्य व सुव्यवस्था यांची उपेक्षा न करतां तीं दोन्ही कशीं

वृद्धिंगत होतील याकडे फार लक्ष पुरविलें आहे. म्हणूनच हा धर्म केवळ आध्यात्मिक आनंदाचा विचार करून न थांबतां त्याबरोबरच मानवाचा आधिभौतिक उत्कर्ष कसा होईल याचाहि जिव्हाळ्यानें विचार करतो.

याच जिव्हाळ्यामुळें वर्णाश्रमांची कल्पना उद्‌भूत झाली व ती धर्माचें एक प्रमुख अंग होऊन बसली. मनुष्याच्या सामाजिक कर्तव्यांची आखणी 'वर्णांत' दिसून येते, तर त्याच्या वैयक्तिक कर्तव्यांची विभागणी चार 'आश्रमांत' केलेली पाहावयास मिळते.

'पुरुषार्थ' या शब्दांत धर्माचें गतिस्वरूप स्पष्ट झालें आहे. परंतु ती गति एकांगी किंवा एककल्ली नाहीं; तर तिचें आक्रमण जीवनाच्या चारी दिशांस आहे. धर्म, अर्थ, काम व मोक्ष अशीं चतुर्विध साध्यें हिंदुधर्म पुढें ठेवतो; व म्हणून त्याची वाढ सर्वांगीण आहे. ईश्वरी साक्षात्कार करून घेऊन मानवजातीवर निस्सीम प्रेम ठेवणें व पूर्ण स्वातंत्र्य, ज्ञान व सात्त्विक आनंद यांचा लाभ करून घेणें हें या धर्माचें ध्येय आहे. कर्तव्याला हा धर्म मानाचें पहिलें स्थान देतो व त्या खालोखाल संपत्ति आणि सुख हीं मानलीं जातात. सद्‌गुण व नीति यांचें योग्य परिपालन करून संपत्ति व सुख संपादन करणें हें या धर्माला मान्य आहे. इतका सगळा विचार ज्या धर्मानें केला तो धर्म मानवाला समाजविन्मुख करील किंवा ऐहिकाबद्दल निराश करील हें संभवत नाहीं.

येथपर्यंत तत्त्वज्ञान व धर्म यांचें स्वरूप काय हें सांगितलें. आतां मराठी भाषेंतील तत्त्वज्ञानात्मक वाङ्मयाचें समालोचन करूं:—

मराठी भाषेंत मुकुंदराय (१२०६–१२७६) हे आदि कवि होत. हे संत-कवि जोगाईचें आंबें या गांवीं राहत असत. यांनीं 'विवेक-सिंधु', परमामृत', 'पवनविजय', 'मूळस्तंभ' व 'पंचीकरण' हे ग्रंथ लिहिले. यांची वाणी प्रासादिक असून शुद्ध, प्रौढ, गंभीर व अर्थपूर्ण आहे. या सर्व ग्रंथांत श्रीशंकराचार्यांच्या अद्वैत तत्त्वज्ञानाचें फार सुंदर विवेचन केलें आहे. अशा रीतीनें महाराष्ट्र-काव्यगंगेचा उगम अध्यात्माच्या मानससरोवरांतून झाला आहे. आणि पुढें झालेल्या संतकवींच्या कवितेंतहि याच अध्यात्मविचाराचा उज्ज्वल विकास झालेला दृष्टीस पडतो.

मुकुंदरायांच्या नंतर महाराष्ट्रभाषेला, विचाराला, आणि तत्त्वज्ञानाला निरंतर ललामभूत झालेले श्रीज्ञानेश्वर यांचें नांव घ्यावयास पाहिजे. श्रीज्ञानेश्वर नाथसांप्रदायी होते. त्यांनीं लिहिलेली "ज्ञानेश्वरी" इतकी अलौकिक आहे कीं तो ग्रंथराज केवळ मराठी वाङ्मयांतच काय, पण अखिल जागतिक वाङ्मयांत अनेक दृष्टींनीं अनुपम आणि अग्रेसर आहे. आणि सर्वांत आश्चर्याची गोष्ट म्हणजे इतका सरस ग्रंथ ज्ञानेश्वरांनीं आपल्या वयाच्या फक्त सोळाव्या वर्षी लिहिला (शके १२१२). ज्या वयांत जगांतला रोजचा साधा व्यवहार देखील आपणांस समजत नाहीं त्या वयांत ज्ञानेश्वरांनीं विश्वाचें कोडें उकलण्याचा यशस्वी मार्ग समाजाला आपल्या रसाळ व अधिकारयुक्त वाणीनें सांगितला. ज्ञानेश्वरींत माधुर्य, मोहिनी आणि मार्दव यांचा गोड त्रिवेणीसंगम झाला असून, अध्यात्माचें पवित्र जीवन दुथडी भरून शान्त वाहत आहे. त्यांतील प्रत्येक ओवी पक्व द्राक्षाप्रमाणें आहे. प्रा. रानडे यांनीं म्हटल्याप्रमाणें "उपमा, भाषासौंदर्य, तत्त्वज्ञान, साक्षात्कार, भक्ति व अद्वैत यांची सांगड, अलौकिक निरीक्षणशक्ति, अप्रतिहत कवित्वशैली, अलोट वाङ्माधुर्य या सर्व गुणांच्या संमिश्रणानें हा ग्रंथ न भूतो न भविष्यति असें म्हणावयास हरकत नाहीं."

या ग्रंथांत काव्यसम्राज्ञी तत्त्वज्ञानाच्या रत्नजडित सिंहासनावर विराजमान झालेली आहे; आणि तिच्या सुरम्य मुखावर प्रतिभा, प्रसाद व प्रेम यांचें संमिश्रण झाल्यामुळे अत्यंत चेतोहर अशी प्रभा विलसत आहे. निराळ्या शब्दांत सांगावयाचें तर, "शब्द इतके रसाळ योजिले आहेत, कीं त्याच्या योगानें कानांनाहि जिभा फुटतील व प्रत्यक्ष पिशाच्चाच्या मनालाहि सात्त्विकपणाचा उमाळा येईल. ज्याला यांतलें तत्त्वज्ञान कांहीं कळत नाहीं असा मनुष्य देखील या ग्रंथांतल्या सौंदर्याला भुलून गुंगून राहतो. ज्याला थोडेंसें कळलें तो ही भावार्थाची उघडी खाण पाहून, आपल्या स्वतःला धन्य मानून घेतो. आणि ज्याला अधिकार आहे त्याला या गीतासृष्टीपुढें दुसरी सृष्टि तुच्छ वाटते."

ज्ञानेश्वरीची उभारणी गीतेंतील तत्त्वज्ञानावर झाली असल्यानें गीतेंत जे जे विषय आले ते ते सर्व ज्ञानेश्वरींत आलेले आहेत. प्रकृतिपुरुषविवेक, क्षराक्षर

विवेक, क्षेत्रक्षेत्रज्ञ-विचार यावर ज्ञानेश्वरींतील तत्त्वज्ञानाची बैठक साधली असून त्या तत्त्वाच्या विकसनांत शंकराचार्यांचें अद्वैत व रामानुजाचार्यांची भक्ति यांचा मोहक मिलाफ साधला आहे. ज्ञानेश्वरीचें शब्दसौष्ठव इतकें गोड आहे, कीं तत्त्वज्ञानासारखा रूक्ष विषय देखील सुगम, सुसेव्य आणि सुखद झाला आहे. ज्ञानेश्वरीशिवाय श्रीज्ञानेश्वरांनीं अमृतानुभव, चांगदेवपासष्टी व अभंग इतकी ग्रंथरचना केली आहे. वयाच्या एकवीस वर्षांच्या आंत इतकी प्रतिभाशाली व वैभवसंपन्न ग्रंथरचना करून सरस्वतीच्या कंठाभरणांत अनुपम तेजानें तळपणाऱ्या या वाङ्मय-कौस्तुभाचें चोखामेळा वर्णन करतो :—

**ज्ञानेश्वर नामें धरिला अवतार । क्षेत्र अलकापूर इंद्रायणी ॥**
**अद्वैत ज्ञानाची करूनि उजरी । टीका ज्ञानेश्वरी ग्रंथ केला ॥**
**अमृत अनुभवी गुरुगम्य ज्ञान । दाउनीया जन उद्धरीले ॥**
**बारा शतें अठरा शक शालिवाहन । दुर्मुख अभिधान संवत्सर ॥**
**कृष्ण त्रयोदशी कार्तिक मास । बैसे समाधीस ज्ञानदेव ॥**
**जातिहीन चोखा विनवी जोडुनी कर । समाधी निर्धार संजीवनी ॥**

श्रीज्ञानेश्वरांनीं भागवतधर्माचा जो पाया घातला त्याचें सुंदर मंदिर बांधण्याला पुढील साधुसंतांनीं हातभार लावला. त्यांत नामदेवांचा ( १२७०-१३५० ) ज्ञानेश्वरांच्यानंतर उल्लेख केला पाहिजे. नामदेव हे भक्तीचा मूर्तिमंत अवतार होते. संसारांतील अनेक उपाधींनीं व असंख्य यातनांनीं त्रस्त झाल्यामुळें नामदेवांचें चित्त परमेश्वराकडे वळलें व ते विठोबाला शरण गेले. पुढें थोड्याच दिवसांत विठोबाच्या प्रेरणेनें विसोबा खेचर नांवाच्या साधु पुरुषास गुरु करावा अशी त्यांना स्फूर्ति झाली. विसोबा खेचराच्या उपदेशानंतर नामदेवांचें मन ईश्वराकडे पूर्णपणें वळलें व ते सारा वेळ भजन-कीर्तन करूं लागले. कीर्तन करतांना ते अभंग रचीत असत. नामदेवांचे अभंग फार प्रेमळ व प्रासादिक आहेत. त्यांच्या अभंगांना भक्तिपर भावगीतें ( Devotional Lyrics ) असें संबोधतां येईल.

नामदेवांच्या वेळीं महाराष्ट्रांत पुष्कळ संतमंडळी होतीं. त्यांपैकीं बहुतेकांनीं कवित्व केलें आहे. जनाबाईचे अभंग अत्यंत गोड व भक्तिरसपूर्ण आहेत. त्याचप्रमाणें विसोबा खेचर, परिसा भागवत, गोरा कुंभार, चोखामेळा, जोगा

परमानंद, वगैरे संतांनीं अभंगरचना केलेली आहे. या संतमंडळांत सर्व जातींचे, सर्व वर्णांचे, आशिक्षित-सुशिक्षित असे साधु होते. यावरून भागवत-धर्मांत कुणालाहि मज्जाव नव्हता हें दिसून येतें. ज्ञानेश्वरांनीं स्थापन केलेला भागवतधर्म जितका उदार व उदात्त तितकाच सर्वसमावेशक व सर्वसंग्राहक आहे.

यानंतर एकनाथांचा (१५३३–१५९९) उल्लेख केला पाहिजे. एकनाथांचे गुरु जनार्दनस्वामी हे होत. एकनाथांनीं ज्ञानेश्वरी व अमृतानुभव या ग्रंथांचें अध्ययनहि जनार्दनस्वामीपाशींच केलें. श्रीएकनाथांनीं 'एकनाथी भागवत', 'रुक्मिणी स्वयंवर', अभंग इत्यादि विपुल ग्रंथरचना केली आहे. प्रपंच व परमार्थ यांची सांगड घालण्याचें कार्य एकनाथांनीं केलें. एकनाथांच्या चरित्रानें सर्वांना मोहिनी घातली आहे. न्यायमूर्ति रानडे म्हणतात : "एकनाथी भागवत वाचलें असतां मनाला शांति वाटून कृतार्थता वाटतें." प्रो. रानडे म्हणतात : "एकनाथांचे इतर ग्रंथ बुद्धिवादाचे आहेत, पण अभंग अनुभवप्रधान आहेत. त्यांनीं प्रपंच व परमार्थ यांची विलक्षण सांगड घालून, संसारामध्यें असतांच परमार्थ कसा करावा हें त्यांनीं जसें आपल्या उदाहरणानें सर्व लोकांस शिकविलें, त्याप्रमाणें दुसऱ्या कोणत्याहि संतानें शिकविलें नाहीं असें म्हटलें असतां अतिशयोक्ति होईल असें वाटत नाहीं." सारांश, ज्ञानेश्वरानंतर महाराष्ट्राच्या सांस्कृतिक इतिहासांत महनीय भर घालणाऱ्या विभूतींत एकनाथांनाच अग्रपूजेचा मान द्यावा लागेल, यांत संदेह नाहीं.

भागवतधर्माच्या मंदिराचा कळस असें ज्यांचें यथार्थ वर्णन केलें जातें, त्या तुकारामांच्या अभंगरचनेसंबंधानें आतां विचार करूं. हरिभजनीं व हरिकीर्तनीं त्यांची अलोट भक्ति होती. त्यांच्या उचंबळलेल्या अन्तःकरणांतील उद्रेक म्हणजे त्यांचे अभंग होत. तुकारामाचे अभंग म्हणजे महाराष्ट्रशारदेचा अमोल अलंकार आहे. त्यांच्या अभंगांत विलक्षण जिव्हाळा व गोडवा आहे. तुकारामांनीं भक्तीचा जसा प्रसार केला, तशीच सामाजिक सुधारणेचीहि कामगिरी केली. या भागवतधर्मांतील अनुयायांनीं आपल्या देवतांची भक्ति करण्यास सर्वांस मोकळीक दिली, हिंदूंतील जातिभेदाची तीव्रता कमी केली,

ब्राह्मणांच्या कर्मठपणाला आळा घातला, धर्माला आबाल-सुबोध स्वरूप प्राप्त करून दिलें. तुकोबांच्या अभंगांत इतका जिव्हाळा आहे, कीं पंत-पंडितांची विद्वत्ताप्रचुर काव्यरचना मागें पडून जुनी झाली तरी तुकोबांचे साधे, सरळ आणि सुंदर अभंग अजून घरोघरीं सद्‌गदित अंतःकरणानें म्हटले जातात.

तुकारामानंतर रामदासांची स्वाभाविक आठवण होते. श्रीसमर्थांनीं दासबोध, करुणाष्टकें, मनाचे श्लोक इत्यादि ग्रंथरचना केली आहे. दासबोध हा ग्रंथ धर्म, नीति व व्यवहार यांचा ज्ञानकोश आहे. त्यांचे अभंग व करुणाष्टकें हीं भक्तिरसपूर्ण आहेत. रामदास हे केवळ संत नव्हते तर कर्म-योगी राष्ट्रगुरु होते. केवळ ईश्वरभजनांत रममाण होऊन राष्ट्रोद्धाराकडे दुर्लक्ष करूं नये असें त्यांचें मत होतें. विशेषेंकरून त्यांच्या दासबोधांत परमार्थिक कर्मयोग्याची वर्तणूक कशी असावी याबद्दल त्यांनीं जे विचार प्रगट केले आहेत ते स्वानुभवावरूनच केले आहेत. प्राचीन संतकवींत राष्ट्रीय दृष्टि असलेले कर्मयोगी संत असें समर्थांचें वर्णन करितां येईल.

यानंतरच्या पुढील काळांत मराठी भाषेंत आख्यानात्मक व श्लोकबद्ध अशी पुष्कळ काव्यरचना झाली आहे. वामन पंडितांची "यथार्थदीपिका" हा ग्रंथ पांडित्यप्रचुर असल्यानें त्याचा येथें विशेष गौरवपूर्ण उल्लेख करणें अवश्य आहे.

हें सर्व प्राचीन वाङ्मय आध्यात्मिक व भक्तिरसात्मक आहे. त्यांत अद्वैत व सगुणोपासना यांची सांगड घातली आहे. त्याचप्रमाणें तें पद्यात्मक असून त्यांत परंपरानुगामित्व प्रामुख्यानें प्रत्ययास येतें. आमच्या प्राचीन वाङ्मयांत जितका भक्तीचा प्रकर्ष झाला आहे, तितका जगांतील दुसऱ्या कोणत्याहि भाषेंत झाला नसेल. या आपल्या वाङ्मयांत गुरुभक्तीचें महत्त्व विशेष मानलें गेलें आहे. श्री. पांगारकरांनीं म्हटल्याप्रमाणें "ज्ञानेश्वरी हा मी महाराष्ट्राचा आद्य ग्रंथ मानतों, व ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, रामदास व तुकाराम हे पांचहि राष्ट्रगुरु असें मानतों. या महाराष्ट्रपंचायतनाच्या कर्तबगारीवर व पुण्याईवर महाराष्ट्राचा भाग्योदय आधारलेला आहे असें मला निश्चित वाटतें." (म. वा. इ.). संतांनीं हें वाङ्मय स्वानुभवानें लिहिलेलें

असल्यामुळें त्यांत पराकाष्ठेचा जिव्हाळा व जिवंतपणा आहे. साधुसंतांनीं निर्माण केलेल्या या संप्रदायांत जातिभेदाला थारा नाहीं. भक्ति प्रधान व जाति अप्रमाण असें जें एकनाथांनीं म्हटलें आहे तें अगदीं खरें आहे. एकंदरींत हें वाङ्मय आज देखील कुणाचेंहि अन्तःकरण तल्लीन करून त्याला सदुपदेश व शाश्वत सुखशांति यांचा लाभ करून देईल असें मला वाटतें...

आतां अर्वाचीन काळच्या वाङ्मयाबद्दल श्री. फडके यांनीं म्हटल्याप्रमाणें—"अव्वल इंग्रजींतील उगमापासून हा शोध घेतां आरंभीं नारायणमहाराज जालवणकर यांचीं सहा सागरतीर्थें, हंसराजस्वामी यांचे वेदेश्वरी सदाचार, वाक्यवृत्ति इत्यादि वेदान्ती घाट, विष्णुबुवा ब्रह्मचारी यांचे विवादाचे भोवरे, विठोबाअण्णांचे सुंदर शब्दकुसुमांनीं फुललेले आणि भक्तिरसानें डवरलेले वाग्लताकुंज, श्रीवासुदेवानंदसरस्वती यांची श्रीदत्तपदवाहिनी गंगा याप्रमाणें वाक्प्रवाहाचा निर्मळ निरंजन भाग अनुक्रमानें आढळतो."—यशवंत, पृ. १९४.

पण या सर्वांत विष्णुबुवा ब्रह्मचारी ( १८२५–१८७१ ) यांना अग्रपूजेचा मान दिला पाहिजे. राजकारणाच्या क्षेत्रांत त्या काळीं परस्थ यशस्वी झालेले, त्यामुळें धर्मकारणांतहि आपण तसेंच होऊं असा त्यांना विश्वास वाटूं लागल्यास नवल नाहीं. याच ईर्षेनें प्रेरित झाल्यामुळें त्या वेळीं जिकडे तिकडे ख्रिस्तधर्माच्या प्रचारकांची एक प्रचंड लाटच उसळली होती. विष्णुबुवासारख्या हिंदुधर्माच्या निस्सीम अनुयायापुढें हा एक फार मोठा पेच येऊन पडला होता. परंतु विष्णुबुवा असल्या प्रसंगानें गडबडले नाहींत. त्यांची भक्ति येवढी अढळ, त्यांचें अध्यात्म इतकें खोल, वृत्ति इतकी धीरगंभीर, आणि वाणी इतकी अमोघ, कीं बुवांच्या तेजस्वी, विचारपरिप्लुत वक्तृत्वापुढें ख्रिस्ती धर्मोपदेशकांचा प्रचार पूर्णपणें नीरस आणि पोचट ठरला. हिंदुधर्मावर उडाविले गेलेले शिंतोडे त्यांनीं साफ धुऊन तर काढलेच परंतु त्याबरोबरच त्यांतील विचार किती प्रगल्भ, किती उदार आणि समाजहिताचे आहेत हेंहि सिद्ध करून दिलें; व त्यामुळें ख्रिस्ती उपदेशकांची कांहींच डाळ न शिजतां समाजांत हिंदुधर्माबद्दल आदर आणि अभिमान जागृत राहिला. श्री. जावडेकर बुवांच्या धर्मप्रचाराबद्दल म्हणतात, "धर्म याचा अर्थ व्यापक असून समाजाचा ऐहिक अभ्युदय त्यांच्या धर्मांत अंतर्भूत

होत असे. आपल्या समाजांत सुधारणा झाल्या पाहिजेत असें त्यांना वाटत असलें तरी, त्या सुधारणा करण्यासाठीं पाश्चात्य संस्कृतीचा आश्रय करावा अशी त्यांची वृत्ति नव्हती. आपल्या प्राचीन संस्कृतींतूनच आपणास भावी अभ्युदयाचा मार्ग उपलब्ध होईल असें त्यांना वाटत असे." (आधुनिक भारत पृ.११६). स्वतःच्या संस्कृतीला न सोडतांहि त्यांचे विचार किती पुरोगामी होते हें त्यांनीं स्वतःच्या ग्रंथांतून ठिकठिकाणीं केलेल्या समाजसत्तावादाच्या पुरस्कारावरून दिसून येतें.

विष्णुबुवा ब्रह्मचारी यांचेनंतर 'लोकहितवादीं'चा उल्लेख करावा लागेल. त्यांना सामाजिक सुधारणेची तीव्र तळमळ होती. राजकीय दृष्ट्या हिंदुस्थानांत लोकसत्तेची स्थापना व राष्ट्रधर्माचा उदय व्हावा असें त्यांस मनःपूर्वक वाटत असे. परंतु त्यांचेवर पाश्चात्य संस्कृतीची छाप बसली होती. आपला इतिहास, आचार, विचार हे दोषयुक्त असून, त्यांत फारच सुधारणा घडवून आणली पाहिजे असला, कांहीं वेळां एकांगी, मतप्रचार त्यांनीं केला. त्यांनीं धर्मसुधारणेचीं जीं पंधरा कलमें सांगितलीं आहेत तीं मननीय आहेत. त्यांपैकीं पांच खालीं उद्धृत करतों:

(१) प्रथम सर्वांनीं ईश्वराचें भजन अंतःकरणापासून करावें.

(२) प्रत्येकास आपले विचाराप्रमाणें आचार करण्याची व बोलण्या-लिहिण्याची मोकळीक असावी.

(३) आचारापेक्षां नीति प्रमुख असावी.

(४) मनुष्य-मात्रास तुच्छ मानूं नये; जात्यभिमान नसावा; सर्वांशीं सारखें दयापूर्वक वागावें; सर्वांचें कल्याण करावें.

(५) सत्यानें सर्वांनीं चालावें, सत्याचें विरुद्ध वर्तणूक करूं नये.

लोकहितवादींचे समकालीन दुसरे सुधारक म्हणजे जोतीराव फुले. महाराष्ट्रांतील ब्राह्मणेतर चळवळीचे हे संस्थापक होत. त्यांच्याच प्रेरणेनें सत्यशोधक समाज जन्मास आला. जोतिराव फुले यांची महाराष्ट्रांतील आद्य सुधारकांत गणना करणें अवश्य आहे.

१८६७ सालीं प्रार्थनासमाजाची स्थापना झाली. यांत ब्राह्मोसमाजाचेंच बरेचसें अनुकरण दिसतें. यांत मूर्तिपूजा निषिद्ध असून एकेश्वरी उपासनेचें तत्त्व मान्य केलें आहे. परंतु या समाजांत न्या. रानडे व डॉ. भांडारकर यांसारखे पुरुष असूनहि त्याला विशेष लोकप्रियता मिळाली नाहीं. व्यक्तिशः रानड्यांचें मत देवधर्म, कायदा, नीति, शिष्टाचार हीं मनुष्याच्या अध्यात्मिक उन्नतीचीं व व्यावहारिक प्रगतीचीं साधनें आहेत असें होतें. पण एकंदरींत पाहतां धार्मिक जागृतीपेक्षां समाजानें सामाजिक सुधारणेलाच अधिक हातभार लावला असें म्हणावें लागतें.

मराठी वाङ्मयांतील सुवर्णयुगाला विष्णुशास्त्री चिपळूणकर यांचेपासून सुरुवात झाली. निबंधमालेच्या लेखनापासून मराठी वाङ्मयाच्या विकासाला प्रारंभ झाला. त्यांनीं जरी धर्म किंवा तत्त्वज्ञान यावर लिहिलें नाहीं तरी मराठींत किती उत्कृष्ट, सरस आणि प्रभावी गद्य लिहितां येतें हें सिद्ध करून दिलें. आगरकरांनीं देखील धर्मकारणापेक्षां समाजकारणच अधिक केलें.

१८९०–१९०० च्या काळांत सुप्रसिद्ध पाश्चात्य ग्रंथकारांच्या ग्रंथांचीं पुष्कळच मराठी भाषांतरें झालीं आहेत. प्रो. भानू यांचा 'नीतिशास्त्राचीं मूलतत्वें', प्रो. कर्वे यांचा 'नीतिसिद्धान्त', ना. ल. फडके यांचा हर्बर्ट स्पेन्सरच्या ग्रंथाधारें लिहिलेला 'अज्ञेयमीमांसा' किंवा शं. बा. दीक्षित यांनीं मॅक्समुल्लरच्या धर्मावरील व्याख्यानांना महाराष्ट्रीय लेणें चढवून लिहिलेला 'धर्ममीमांसा' असे अनेक ग्रंथ त्या काळीं प्रसिद्ध झाले. ते सारे विस्तृत असून अशा प्रकारच्या ग्रंथांना छापून प्रसिद्धि देण्याचें श्रेय गणेश बळवंत दाभोळकर या तत्त्वज्ञानप्रेमी गृहस्थांनाच दिलें पाहिजे. मात्र भाषेच्या दृष्टीनें दाभोळकर ग्रंथमालेंतील पुस्तकें फारशी आकर्षक नाहींत... रामचंद्र कृष्ण जठार ( १८९८ ) यांचें 'स्वानंद साम्राज्य' या वेदांतपर ग्रंथाला लोकप्रियता लाभली आहे. श्रद्धाशील लोकांना तो ग्रंथ अत्यंत जिव्हाळ्याचा व हृदयस्पर्शी वाटतो.

यापुढें १९१५ पर्यंत मराठींत तत्त्वज्ञानविषयक स्वतंत्र असें ग्रंथकर्तृत्व फारसें झालें नाहीं. पण कै. लो. टिळक यांचें 'गीतारहस्य' प्रसिद्ध झाल्यानंतर मात्र तत्त्वज्ञानवाङ्मयाला जणूं कांहीं नवीन बहर आला. 'गीता-रहस्य'

हा ग्रंथ इतका अद्वितीय आहे कीं, मराठी भाषेला आणि महाराष्ट्रीय तत्त्वज्ञानाला तो नेहमींच भूषण म्हणून राहील. त्यांतील पहिलीं पंधरा प्रकरणें तर इतकीं उत्कृष्ट साधलीं आहेत कीं, दादासाहेब खापर्डे म्हणत असत त्याप्रमाणें तीं खरोखर 'गद्य पंचदशी'च होत. निष्काम कर्मयोगाचें तत्त्व लोकमान्यांनीं गीतारहस्यद्वारा लोकांपुढें ठेविलें व त्यायोगें समाजांतील विचारांत विलक्षण आंदोलन सुरू झालें. सांप्रदायिक मताविरुद्ध लोकमान्य गेले म्हणून सांप्रदायी लोकांत खळबळ उडाली; परंतु त्यामुळें गीतारहस्याची असामान्य योग्यता कुठल्याच अंशानें कमी न होतां उलट ती वर्धमानच झाली. गीतारहस्यांत लोकमान्यांनीं पाश्चिमात्य तत्त्वज्ञानाचाहि प्रसंगोचित परामर्श घेतला असून भारतीय संस्कृतीचें श्रेष्ठत्व पटवून दिलें आहे. तत्त्वज्ञानासारख्या गहन विषयाची चर्चा प्रौढ व प्रसन्न मराठी भाषेंत किती उत्तम करतां येते हेंहि 'रहस्यां'त लोकमान्यांनीं दाखवून दिलें. त्यामुळें आधुनिक मराठी विदग्ध वाङ्मयांतहि त्याला अग्रपूजेचा मान द्यावा लागेल.

गीतारहस्याच्या खंडन-मंडनपर असें पुष्कळ वाङ्मय प्रसिद्ध झालें आहे. कोल्हटकर, हुपरीकर, विष्णुशास्त्री बापट यांनीं खंडन केलें असून चिं. वि. वैद्य, सदाशिवशास्त्री भिडे वगैरेनीं मंडन केलें आहे. त्यांत विष्णुशास्त्री बापटांचें ग्रंथकर्तृत्व विशेष उल्लेखनीय आहे. शंकराचार्यांची उपनिषद्भाष्यें, वेदान्तसूत्रभाष्य, गीताभाष्य इत्यादिकांचें संस्कृतांतून सुंदर व विद्वत्तापूर्ण मराठीकरण केलें; त्या सर्वांची पृष्ठसंख्या ४००० वर जाईल. याबद्दल मराठी वाचक त्यांचें सदैव ऋणी राहतील. गीतारहस्याच्या सिद्धान्ताचें समर्थन सदाशिवशास्त्री भिडे यांनीं आपल्या 'रहस्यदीपिका' या ग्रंथांत केलें आहे. तसेंच लेलेशास्त्री यांनीं ऋग्वेदभाष्य, गीताभाष्य, वाल्मीकिरामायण या ग्रंथांचीं भाषांतरें करून मराठींत चांगली भर घातली आहे. रा. शं. रा. राजवाडे यांनीं 'गीताभाष्य' लिहून त्यांत पाश्चात्य तत्त्वज्ञानाचा चांगलाच परामर्श घेतला आहे.

'चिपळूणकर मंडळी' यांनीं सनातनी हिंदूंचें धार्मिक वाङमयाचें पुराणेतिहास हें फारच मोठें दालन मराठी वाचकांच्या संचारास खुलें करून दिलें आहे. त्यांनीं रामायण, महाभारत, भागवत, योगवासिष्ठ या संस्कृत ग्रंथांचीं मराठींत सुबोध भाषांतरें केलीं आहेत. या भाषांतरांच्या कामीं दातार,

उपासनी, मोडक, फफे, राशिवडेकर, बर्वे, द्रवीड, इत्यादि विद्वानांनीं चांगलें साहाय्य केलें आहे; व संस्कृत न जाणणाऱ्या लोकांना त्या भाषेंतील उत्कृष्ट विचारवैभवाचा लाभ करून दिला आहे. प्रो. भानू यांचा देखील येथें गौरवपूर्वक उल्लेख केला पाहिजे. त्यांनीं गीतेवर भाष्य लिहिलें आहे व उपनिषदांचीं भाषांतरें केलीं आहेत. फडके, बर्वे यांनीं केलेलीं विवेकानंद व रामतीर्थ यांच्या व्याख्यानांचीं भाषांतरें लोकप्रिय झालीं आहेत. विवेकानंदांच्या भाषांतरित व्याख्यानांमुळें लोकांमध्यें तत्त्वज्ञानाची पुष्कळच अभिरुचि उत्पन्न झाली.

चिं. वि. वैद्य यांचा 'भारताचा उपसंहार' हा ग्रंथ फार उत्कृष्ट आहे. या ग्रंथांत वैद्यांनीं महाभारताचें सर्वांगीण समालोचन केलें आहे. त्याचप्रमाणें कोल्हटकरांचा 'भागवताचा उपसंहार', व महाराष्ट्रीय यांचा 'रामायणाचा उपसंहार' हे ग्रंथहि विद्वत्ताप्रचुर आहेत. अशाच पद्धतीनें योगवासिष्ठाचा उपसंहार हा ग्रंथ अजून लिहावयाचा आहे. या ठिकाणीं श्री. फडके यांच्या 'वेदान्तनिदर्शन' या ग्रंथाचा उल्लेख करावयाला हरकत नाहीं. या ग्रंथांत वेदान्ताची मांडणी चांगली केली आहे. काथवटे यांनीं 'अद्वैतसिद्धान्ताचा युक्तायुक्त विचार' या पुस्तकांत मायावादाची अयुक्तता दाखवून सरतेशेवटीं मध्वसिद्धान्तांतील तत्त्वांचा सारांश दिला आहे.

यानंतर खालील ग्रंथकारांनीं केलेली तात्त्विक व धार्मिक वाङ्मयसेवा उल्लेखनीय आहे. श्री. शंकरराव देव यांनीं समर्थांच्या वाङ्मयसंशोधनाचें प्रशंसनीय कार्य केलें आहे. साखरेबुवा, पांगारकर, देशमुख, जोग, प्रो. दांडेकर, प्रो. रानडे यांनीं महाराष्ट्रीय संतवाङ्मयाशीं आणि आजगांवकर, दासगणू यांनीं संत-चरित्राचा लोकांना दृढ परिचय करून दिला आहे. साखरेबुवांचे 'विचारसागररहस्य' व पांगारकरांचे ज्ञानेश्वर, एकनाथ, तुकाराम हे धर्मप्रवण वाचकांचे आवडते ग्रंथ आहेत. श्री. फडके यांनीं 'ब्राह्मोसमाजाचा' विस्तृत इतिहास लिहिला आहे. त्यांनीं सनातनी दृष्टीनें ब्राह्मोसमाजाचें परीक्षण केलें आहे. त्यांत राजा राममोहनराय, केशवचंद्रसेन, प्रतापचंद्र मुझुमदार, आनंदमोहन बोस इत्यादि व्यक्तींचीं रसाळ चरित्रें लिहिलीं आहेत. श्री. वैद्य यांनीं प्रार्थनासमाजाचा माहितीपूर्ण इतिहास लिहिला आहे. त्याचप्रमाणें जन्मांध सिद्धपुरुष गुलाबराव यांचे ग्रंथ,

श्री. भागवत-चिपळूणकर यांची धर्मजागृतिमाला, श्री. सातवळेकर यांचा 'पुरुषार्थ' व 'वैदिक धर्म', वैद्य यांनीं संपादिलेली सुबोधपत्रिका, भांडारकर, रानडे, मोडक यांचीं धर्मपर व्याख्यानें, श्री. न. चिं. केळकर यांचें 'भारतीय तत्त्वज्ञान', प्रो. रानडे यांची 'अध्यात्मग्रंथमाला' इत्यादि ग्रंथांनीं आधुनिकांची दृष्टि धर्माकडे आकर्षित करण्याचें कार्य केलें आहे. गोऱ्हेशास्त्री, मराठे, जांभेकर, दिवेकर, चित्राव यांनींहि धार्मिक कार्य केलें आहे. याशिवाय गोळे यांचें 'हिंदुधर्म आणि सुधारणा', चिंचाळकर यांची 'परमार्थविचारमाला', माटे यांची 'ब्रह्मविद्या प्रबोधरत्नमाला' इत्यादि ग्रंथांचा उल्लेख करावयाला हवा.

श्री. दप्तरी यांनीं 'धर्मरहस्य' हें चांगलें पुस्तक लिहिलें आहे. या पुस्तकांत धर्मासंबंधीं विद्त्ताप्रचुर विवेचन केलें आहे. प्रो. काणे यांचें 'धर्मविचार' हें पुस्तकहि मननीय आहे. त्याचप्रमाणें प्रो. वामनराव जोशी यांनीं 'नीतिशास्त्रप्रवेश' हा ग्रंथ लिहिला आहे. या ग्रंथांत तात्त्विक विषयाची सहजरम्य अशा भाषेंत उत्कृष्ट चर्चा केली आहे. श्री. कवीश्वर यांचा 'कला व नीति' हा निबंध चांगला आहे. आनंदकर्ते वासुदेव गोविंद आपटे यांचें 'सौंदर्य व कला' हें पुस्तक वाचनीय आहे. दाजी नागेश आपटे यांच्या 'नीतिशास्त्रप्रबोध' या ग्रंथाचाहि आदरपूर्वक उल्लेख करणें अवश्य आहे. श्री. वि. स. गोगटे यांचा 'नीतिशास्त्रविचार' हा ग्रंथ नीतिशास्त्रावरील प्रश्नांशीं व विषयाशीं प्रथमपरिचय करून देण्याच्या कामीं उपयुक्त आहे.

पाश्चात्य तत्त्वज्ञानाशीं मराठी वाचकांचा परिचय व्हावा या दृष्टीनें फार थोडें वाङ्मय निर्माण झालें आहे. त्यांत श्री. दत्तात्रय गोविंद केतकर यांच्या 'पाश्चात्य तत्त्वज्ञान', प्रि. भाटे यांच्या 'कँट व शंकराचार्य' व 'तीन तत्त्वज्ञानी', व श्री. शं. रा. राजवाडे यांच्या 'ख्रिस्तांतक नीत्शे' या पुस्तकांचा विशेष उल्लेख करावा लागेल.

महाराष्ट्रांतील तत्त्वज्ञानेतिहासांत "भारतीय तत्त्वज्ञानसंस्था" अमळनेर, या संस्थेच्या कार्याचा गौरवानें निर्देश केला पाहिजे. या संस्थेनें चालविलेलें 'तत्त्वज्ञानमंदिर' हें तत्त्वज्ञान या विषयाला वाहिलेलें एकच मराठी त्रैमासिक आहे; व या त्रैमासिकांत आतांपर्यंत धर्म व तत्त्वज्ञान या विषयांवर अनेक विद्वान् लोकांनीं पुष्कळ लेख लिहिले आहेत.

येथपर्यंत मराठी भाषेंतील धार्मिक व तत्त्वज्ञानात्मक वाङ्मयाचें समालोचन केलें. अर्थातच व्याख्यानाची कालमर्यादा संभाळावयास हवी म्हणून आतांपर्यंत प्रसिद्ध झालेल्या सर्व ग्रंथांचा परामर्श तर नव्हेच पण नामनिर्देश सुद्धां करतां आला नाहीं याची मला पूर्ण जाणीव आहे. अनिर्दिष्ट ग्रंथांची योग्यता कमी लेखण्याचा मुळींच मानस नाहीं हें सुज्ञ वाचकांस सांगणें नको. मराठी भाषेंत तत्त्वज्ञानविषयक वाङ्मयांत कोणते प्रवाह आहेत व त्या प्रवाहांतील प्रमुख म्हणून कांहीं ग्रंथांचीं नांवें सांगून त्याबद्दल कांहींचा जास्त तपशील सांगण्यापलीकडे आज जास्त कांहीं करतां आलें नाहीं याबद्दल मला खेद होतो. तथापि केलें एवढ्या समालोचनावरून देखील आपल्या ध्यानीं स्पष्ट आलें असेल कीं, कांहीं थोडे अपवाद सोडून दिले तर, गेल्या शंभर वर्षांतील मराठी तत्वज्ञान-वाङ्मयांत अभिनव आणि स्वतंत्र विचारप्रवर्तन कोणी फारसें केलेलें नाहीं. संस्कृत किंवा इंग्रजी ग्रंथांचीं भाषांतरें अगर रूपांतरें करण्याकडेच लेखकांचा अधिक कल दिसतो; परंतु महाराष्ट्रांत तत्त्वज्ञानाचा जर खरा आणि तेजस्वी प्रकर्ष व्हावयाचा असेल, तर ही प्रवृत्ति सोडून द्यावयास हवी. अर्थातच जगांत सध्यां कोणते विचारप्रवाह आहेत व पूर्वी कोणते होते व ते कां बदलले याचें ज्ञान आपणांस जरूर पाहिजे; परंतु तें ज्ञान प्राप्त करून घेतल्यानंतर तेथेंच थांबतां कामा नये. त्यावर आपला म्हणून कांहीं स्वतंत्र विचार व्हावयास पाहिजे व त्यायोगें कांहीं तरी मौलिक ग्रंथनिर्मिति व्हावयास हवी. अशा मौलिकतेनें तेजाळलेले ग्रंथ आपल्याकडे झाल्याशिवाय समाजांत नवचैतन्य खेळूं लागणार नाहीं. सांप्रदायांना चिकटून राहण्याचे दिवस संपले हें ओळखून ग्रंथकर्तृत्व झालें पाहिजे. सध्यांच्या काळांत किती तरी नवीन विचार बुद्धीच्या क्षितिजावर उगवून चमकूं लागले आहेत. त्यांकडे आमच्यांतील विचारवंतांनीं आपली शोधक शास्त्रदृष्टि लावली पाहिजे. सापेक्षतावाद ( Relativity ), अनिश्चिततावाद ( Indeterminacy ), मनोविश्लेषणशास्त्र ( Psycho-analysis ), अभिनव उत्क्रान्ति ( Emergent Evolution ) याबद्दल उपलब्ध ज्ञान आत्मसात् करून घेऊन त्याचा स्वतंत्रपणें विचार झाला पाहिजे. आधुनिक शास्त्रांचा उपयोग आमच्या तत्त्वज्ञानानें करून घ्यावयास हवा; म्हणजे वैचारिक प्रगतीला निःसंशय फार मदत होईल.

वैचारिक क्रान्ति झाल्याशिवाय समाजाचें योग्य दिशेनें ध्येयसिद्धीकरितां जोरानें पुढें पाऊल पडणार नाहीं, हा इतिहासाचा सिद्धान्त नीट मनांत धरून तर्कशुद्ध विचारप्रवर्तन करण्यासाठीं जर आम्ही लिहूं, तर आज आळसलेला समाज ध्येयशून्य न राहतां, नवोन्मेषानें कार्यप्रवण होऊन ही पुण्यभूमि पुन्हा आपल्या पहिल्या ओजानें व मांगल्यानें दीप्तिमान् होईल, यांत तिळप्राय शंका नाहीं. अशा प्रकारची ग्रंथनिष्पत्ति आपल्या मातृभाषेत–मराठींत–झाली पाहिजे. तरच या ग्रंथांचा आपल्या समाजांतील बहुसंख्याकांना उपयोग होईल.

भाषण फारच लांबलें तरी आपण तें शांतपणें ऐकलें याबद्दल आपले मी मनःपूर्वक आभार मानतों.

आपल्या प्रांतांतील दोन थोर दिवंगत कवि, गोविंद व चंद्रशेखर, यांचा आदरपूर्वक निर्देश करून मी आपलें भाषण संपवितों.

विद्ययाऽमृतमश्नुते ।

---

# मराठींतील चरित्रवाङ्मय

लेखकः—प्रा. र. श्री. जोगळेकर, एम्. ए. नाशिक.

के. गोविंदाग्रजांनीं 'काव्याची व्याख्या' लिहितांना 'काव्य कराया जित्या जिवाचें जातिवंत करणेंच हवें' असा एक निर्बंध सांगितला आहे. परंतु मला वाटतें, काव्यापेक्षां चरित्रविषय होण्यास हें 'जित्या जिवाचें जातिवंत करणें' अत्यवश्य आहे. 'नर जो अपनी करणी करे तो नर का नारायण होय' असें तुळसीदास सांगतो. 'अपनी करणी' केल्यानें मनुष्य कृतिरूपानें, कीर्तिरूपानें अमर होतो आणि कालांतरानें त्याला देवपणहि प्राप्त होतें. जन्मास आलेल्याला आज नाहीं उद्यां मरावयाचें आहेच! किंबहुना उभ्या आयुष्यांत निश्चित आणि अपरिहार्य कोणती गोष्ट असली, तर ती मरण. परंतु मनुष्यानें आपल्या तेजस्वी बुद्धिमत्तेनें ज्याप्रमाणें कित्येक अपरिहार्य वाटणाऱ्या निसर्गनियमांवर मात केली आहे, तद्वत् अपरिहार्य मरणावरहि त्यानें एक परीनें जय मिळविला आहे. एखादी थोर व्यक्ति आपल्या आयुष्यांत असें कांहीं कार्य करिते, अशी कांहीं विचारसंपदा निर्माण करिते, कीं त्यामुळें प्रचलित परंपरेला कलाटणी मिळते. एवढेंच काय पण एखादी रूढि कोलमडून पडते; आणि मग तो कालखंड त्या व्यक्तीच्या नांवानें ओळखला जातो. अर्थात् काळानें व्यक्तीला नाहींशी करण्याचें एकीकडे राहून, व्यक्तिच काळावरती आपली मुद्रा उमटवितें. अशा समाजधुरीणांकडून समाजाची प्रगति होते, अशा लोकाग्रणींविषयीं लोकांना– समकालीन, उत्तर कालीन लोकांना— आदर वाटतो. अशा विभूतींच्या जीवनानें राष्ट्रजविन तेजस्वी, उत्साही होतें. अशा महात्म्यांच्या जीवनाची अम्लानमाला म्हणजे राष्ट्राचा स्फूर्तिप्रद इतिहास! अनेकांच्या पवित्र जीवनगंगा मिळूनच राष्ट्राचा जीवन-सागर निर्माण होतो. सर्व तीर्थांचें माहेरघर किंवा 'परमं परायणम्' म्हणून सागर स्तवार्ह असला तरी, प्रत्येक तीर्थहि वंदनीय असतेंच. राष्ट्राचा इतिहास, राष्ट्राचें जीवन यांचा आदरयुक्त अभिमान प्रत्येकास वाटतो तद्वतच

राष्ट्राचें जीवन ज्यांनीं निर्माण केलें त्यांच्या चरित्राविषयींहि आदर आणि अभिमान वाटणें अगदीं स्वाभाविक आहे. या आदरभावनेच्या पोटींच चरित्रवाङ्मयाचा जन्म होतो. चरित्र लिहितांना, कीर्तिरूपानें उरलेल्या लोकमान्यांच्या कीर्तिरूपास चिरंतनता देण्याचा चरित्रकाराचा उद्देश असतो. केवड्याच्या पानाचा सुगंध वाऱ्यावर विरून जाण्यापूर्वी स्त्रिया नाहीं का तो आपल्या कुंकवाच्या करंड्यांत सामावून ठेवीत !

इटालीचा कवि ॲरिओस्टो यानें यासंबंधीं एक रूपक रचिलें आहे. प्रत्येक मनुष्याच्या आयुष्याच्या दोरीला एक पदक बांधलेलें असतें. त्यावर त्याचें नांव कोरलेलें असतें. जेव्हां मृत्यु ही आयुष्याची दोरी तोडतो त्या वेळीं काळ हें पदक घेऊन विस्मृतीच्या नदींत फेकून देतो; परंतु यांपैकीं कांहीं—अगदीं थोडीं पदकें--विस्मृति-नदींत पडतां पडतांना हंस तीं झेलतात आणि चिरंतनतेच्या मंदिरांत नेऊन तेथें त्यांची प्राणप्रतिष्ठा करितात. ॲरिओस्टोनें सांगितलेले हंस म्हणजे आपले चरित्रकार होत.

मृत्यूनें आयुष्याची दोरी तोडल्यावर, विस्मृतीच्या नदींत पदकें नेऊन टाकण्याचें काळाचें काम जसें अनादि कालापासून चालू आहे तसेंच त्यांतील थोडीं पदकें चिरंतनतेच्या मंगल मंदिरांत नेऊन ठेवण्याचें हंसांचें कामहि तेव्हांपासूनच चालू असलें पाहिजे.

लेखनकला अवगत होण्यापूर्वी हीं चरित्रें तोंडींच आणि म्हणूनच पद्य-स्वरूपांत नांदलीं असलीं पाहिजेत. लेखनकलेचा शोध लागल्यानंतर तिचें ज्ञान असलेल्यांनीं चरित्रें लिहून ठेविलीं असावीं. रामायण-महाभारतापासून अलीकडच्या काळापर्यंत धावता दृष्टि क्षेप टाकला तर अशीं चरित्रें वेळोवेळीं निर्माण झालेलीं दिसतात. सगळींच चरित्रें आज उपलब्ध नि प्रसिद्ध नसतील आणि महाभारतांत राजांच्या समवेत ऋषींमुनींची–किंबहुना याहूनहि सामान्य व्यक्तींचीं– चरित्रें आख्यानरूपानें का होईना–पण आलीं आहेत, तरीसुद्धां या चरित्रांविषयीं एक विशेषता ध्यानांत येते ती अशी कीं, चरित्र-विषय व्हायला राजवंशाचा किंवा तपश्चर्येचा आधार लागे. सामान्य लोकांना नि त्यांच्या जीवनाला काव्यविषय वा चरित्रविषय होण्याइतकें महत्त्व प्राप्त झालें नव्हतें. कालिदासानें आपल्या रघुवंशांत 'रघूणामन्वयं वक्ष्ये' असा

संकल्प सोडून सूर्यवंशांतील राजांचीं चरित्रें गाइलीं. रामायण, महाभारत, रघुवंश इत्यादिकांना चरित्र म्हणण्यापेक्षां आपण काव्य म्हणतों हें योग्यच आहे. कवीला त्या त्या चरित्रविषयाविषयीं एवढी आपुलकी आणि प्रेम वाटत होतें कीं, त्या आपुलकीच्या प्रेमानें त्याची प्रतिभा पल्लवित होऊन चरित्राला काव्यरूप प्राप्त झालें आहे. Winternitz लिहितों, "History and biography have in India never been treated other than by poets and as a branch of epic poetry."

महाभारतकाळापासून तों थेट अलीकडच्या काळापर्यंत आपल्या मानवी जीवनावर धर्माचा, धर्माचाराचा आणि धार्मिक कल्पनांचा इतका पगडा होता कीं, मानवाला आणि मानवाच्या ऐहिक जीवनाला कुणी विशेषसें महत्त्व दिलें नाहीं. मानवाचें जीवन म्हणजे 'असार जीवित केवळ माया', 'जग हें अळवावरचें पाणी' अशीच ज्याची त्याची भावना; या आयुष्यांत कांहीं संपादन करावयाचें असेल तर तें परलोकसाधन; या जीवनांत कशाला महत्त्व असेल तर तें देवादिकांना आणि होमहवन, पूजाअर्चा इत्यादि धर्माचारांना; सर्वशक्ति एकवटून आराधना करायची तर ती देवाची; मोरोपंतांनीं आपल्या आर्याभारतांत पुन्हा पांडवचरित्रच गाइलें; कां? तर "वाटे चरित्र त्यांचें आपण कांहीं तरावया गावें" म्हणून; स्तुति करायची झाली तर ती परमेश्वराची; नराची स्तुति करणें व्यर्थ; ती करूं नये असा नियम! अर्थात् देवाच्या खालोखाल देवाच्या भजनीं लागलेल्या देवमाणसांचें महत्त्व; तेव्हां या साधुसतांचीं चरित्रें मराठींत होऊं लागलीं. साधुसंतांच्या जोडीलाच किंबहुना वरच्या अंगाला नवधर्मपंथाचे संस्थापक बसतात. तेव्हां त्यांचींहि चरित्रें होऊं लागलीं. शंकरविजय आणि ललितविस्तार हे संस्कृत ग्रंथ उदाहरण म्हणून सांगतां येतील. महानुभावपंथांतील चक्रधराचें 'लीळाचरित्र' प्रसिद्ध आहे. ज्ञानेश्वरांचें चरित्र सच्चिदानंदबाबांनीं लिहिल्याचा उल्लेख आहे. नामदेवानें 'आदि तीर्थावळी समाधि' मिळून ज्ञानेश्वराचें चरित्र सांगितलें आणि निरंजनमाधवानें 'ज्ञानेश्वरविजय' लिहिला. (नाभाजी), उद्धवचिद्घन, दासो दिगंबर, महिपतीबोवा ताहराबादकर, भीमस्वामी, राजाराम प्रासादी या संतचरित्रकारांनीं पूर्वीच्या संतांचीं चरित्रें मोठ्या भक्तिभावानें लिहिलीं आहेत. महिपतीच्या भक्तविजय, भक्तलीलामृत, संतविजय, संतलीलामृत यांचा

सर्वांना परिचय आहेच. यांपैकीं कांहीं चरित्रें नाभाजी आणि उद्धवचिद्घन यांच्या आधारें लिहिलीं असलीं तरी, दामाजी-भानुदासादिकांचीं चरित्रें लिहितांना, विशेषतः तुकारामाचें चरित्र सांगतांना, चरित्रनायकाच्या वंशजांकडून चरित्रविषयक वृत्तांत गोळा करून मग तीं चरित्रें रचिलीं आहेत ही गोष्ट महिपतीस खचित भूषणावह आहे. असाच चौकसपणा राजाराम प्रासादींच्या भक्तमंजरींत दिसून येतो.

या सर्व संतचरित्रांत काटेकोर सत्यकथनापेक्षां एकांगी भाविकतेवर सारा भर! चरित्रनायकाविषयीं अत्यादराची नि आपुलकीची भावना! हे साधुसंत अतिमानुष कोटींतले अशी दृढ श्रद्धा! त्यामुळें ऐकीव दंतकथांवर विसंबून हीं चरित्रें लिहिलीं गेलीं. डोळसपणानें पारख-निवड अशी झालीच नाहीं. अर्थात् अत्यादराच्या भावनेमुळें अद्भुतता आणि आपुलकीच्या प्रेमामुळें काव्यात्मता या दोन धर्मांनीं या चरित्रांस ग्रासलें आहे. संतचरित्रांचें स्वरूप या काळीं सामान्यतः असें होतें.

आंग्लाईपूर्वी एका वेगळ्या प्रकारचे– राजांचे आणि राजकारणी पुरुषांचे चरित्रप्राय ग्रंथ उपलब्ध आहेत. सभासदाची बखर, श्रीशिवाजीमहाराजांच्या चरित्रावर झालेले 'चित्रगुप्ताची बखर' आणि 'श्रीशिवछत्रपतींचें चरित्र' इत्यादि ग्रंथ तेव्हांच्या राजपुरुषांचा आणि राजकारणाचा उणापुरा परिचय करून देतात. या काळांतील आणखी उल्लेखनीय ग्रंथ म्हणजे नाना फडणविसाचें आत्मचरित्र आणि गंगाधरशास्त्री पटवर्धन यांचें आत्मचरित्र. शेवटचें आत्मचरित्र आत्मसमर्थनपर आहे, तर नानांचें आत्मचरित्र सडेतोड प्रामाणिकपणानें लिहिलेलें आहे. स्वतःचे दोष दाखविण्याच्या या धैर्याविषयीं काव्येतिहाससंग्रहकारांनीं नानांची प्रशंसा केली आहे. बखरी बहुधा आदरातिशयानें लिहिलेल्या असल्या तरी त्यांत बरेंच ऐतिहासिक सत्यकथन असतें. या दृष्टीनें 'श्रीशिवछत्रपतींचें सप्तप्रकरणात्मक चरित्र' इत्यादिकांचा चरित्रप्राय ग्रंथांत अंतर्भाव करण्यास तितकीशी अडचण नाहीं.

आंग्लाई आल्यावर आपल्याकडील मनु अगदीं पालटला. सर्वच क्षेत्रांत स्थित्यंतर झालें. समाजाची हळूहळू परंतु निश्चयानें पुनर्घटना होत चालली. या पुनर्घटनेचें सर्वांत प्रभावी कारण म्हणजे शिक्षण. नवीन राज्यांत नवीन

पद्धतीचें शिक्षण चालू झालें. विद्यादानाचे नि ज्ञानप्रसाराचे निरनिराळे उपाय योजण्यांत आले. यांपैकींच एक उपाय म्हणजे ग्रंथलेखनास उत्तेजन देण्यासाठीं सरकारनें 'दक्षिणा प्राइझ् कमिटी' नेमिली. या कमिटीच्या प्रोत्साहनानें इतर ग्रंथांसमवेत अत्यल्प का होत ना परंतु कांहीं चरित्रग्रंथहि निर्माण झाले. योगायोगाची गोष्ट म्हणजे कृष्णशास्त्री चिपळूणकरांसारख्या हिंदी गृहस्थानें सॉक्रेटीसच्या चरित्राचा मराठींत अनुवाद केला आणि कॅ. मॅक्डोनाल्ड या इंग्रजी गृहस्थानें 'नाना फडणविसाची बखर' लिहिली. १८५८ मध्यें महादेवशास्त्री कोल्हटकरांनीं 'कोलंबसचा वृत्तांत' लिहिला; १८५९ मध्यें कॅ. मॅक्डोनाल्डच्या आधारें श्री. पंडितांनीं 'नाना फडणविसाचें चरित्र' लिहिलें. १८६० मध्यें जनार्दन रामचंद्रजी यांनीं आपल्या 'कविचरित्र' या ग्रंथांत अनेक कवींची त्रोटक माहिती दिली. १८७६ या वर्षी लिहिलेल्या आपल्या 'डॉक्टर जॉन्सन' या निबंधांत विष्णुशास्त्री चिपळूणकरांनीं खालील टीप दिली आहेः—"गेल्या वीस पंचवीस वर्षांत सॉक्रेटीस्, कोलंबस, खुसरू, नाना फडणवीस, कॅपटन् कुक्, कॅथरैन इतक्यांचीं चरित्रें प्रसिद्ध झालीं. शिवाय दोन तीन वर्षांपूर्वी दक्षिणा प्रैज कमिटीकडून पसंत झालेलीं वॉशिंग्टन, फ्रांक्लिन्, लॉर्ड क्लैव हींही चरित्रें इंदुप्रकाशांत छापलीं गेलीं. याखेरीज अलीकडे रा. विनायक कोंडदेव ओक यांनीं केलेलीं 'शिकंदर बादशहा', 'पीटर धि ग्रेट' व 'ड्यूक ऑफ वेलिंग्टन' हींही सरकारनें विकत घेऊन प्रसिद्ध केलीं आहेत. पण इतक्या सर्व चरित्रांत सॉक्रेटिसाचें मात्र चोहोंकडे प्रसिद्ध असून तिसऱ्या आवृत्तीपर्यंत त्याची मजल पोंचली आहे."

या बारा चरित्रांत 'सॉक्रेटिसचें चरित्र' तेवढेंच चोहोंकडे प्रसिद्ध झालें, याचें कारण उघडच आहे. सॉक्रेटीससारखा विचारवंत तत्त्ववेत्ता आणि कृष्णशास्त्र्यांसारखा अनुवादक! मग काय हवें? चरित्रांतील बांधेसूद रचना मूळचीच असली तरी अनुवादासाठीं केलेल्या निवडीविषयीं आणि शालीन भाषेसंबंधीं चिपळूणकरांची प्रशंसाच केली पाहिजे. १८७६ वर्षी धाकट्या शास्त्रीबुवांनीं दिलेली ही चरित्र-ग्रंथांची नामावलि पाहिली कीं अचंबा वाटतो. या बारा चरित्रांत अकरा चरित्रें पाश्चात्य स्त्रीपुरुषांचीं आणि एकच काय तें आपल्याकडील नाना फडणविसाचें. आणि तेंहि पुन्हा मॅक्डोनाल्डच्या बखरीच्या आधारें लिहिलेलें. पण अचंबा तरी कसला? हीं चरित्रें लिहितांना

अभिमानाचा प्रश्न होतांच कुठें ? दक्षिणा प्राइझ् कमिटीच्या प्रोत्साहनानें किंवा 'दक्षिणेच्या' लोभानें बळेंच लादून घेतलेलें हें काम होतें. तें दक्षिणा प्राइझ् कमिटीच्या मान्यतेस उतरेल अशा पद्धतीनें करावयाचें म्हणजे प्रथमच चरित्रविषयासाठीं निवड करावयाची ती एकाद्या इंग्रजाची. म्हणजे अर्धे काम झालें. ही एक दृष्टि झाली. दुसरें असें कीं, इंग्रजाचें चरित्र लिहावयास घेतलें कीं, दुसरें तिसरें कांहीं न करितां त्या व्यक्तीचें इंग्रजी भाषेंतील चरित्र घ्यावयाचें आणि त्याचा कसाबसा अनुवाद करायचा कीं आटोपलें ! आपल्याकडील धुरंधर व्यक्तीचें चरित्र लिहावयास घ्यावयाचें म्हणजे मुळापासूनच प्रारंभ. तत्संबंधीं अगोदर कागदपत्रें कोठें मिळतात याचा शोध; तदनंतर तीं मिळविण्याची यातायात; मिळाल्यावर तीं निवडण्याचें आणि जोडण्याचें काम; बरें, एवढेंहि करून लिहिलेलें चरित्र दक्षिणा प्राइझ् कमिटीच्या मान्यतेस उतरलें तर ठीक. अशा चरित्रासंबंधीं इंग्रजी अधिकाऱ्यांची काय मनोवृत्ति असेल याची वानवा; आणि पुन्हा विशिष्ट पद्धतीनें लिहिण्याच्या दृष्टीनें हा चरित्र-वाङ्मयाचा प्रकार मराठींत नवीनच. या साऱ्या गोष्टी ध्यानीं घेतल्या कीं, कृष्णशास्त्री चिपळूणकरांसारख्याचाहि कल एतद्देशियाचें, विशेषतः ऐतिहासिक पुरुषाचें स्वतंत्र चरित्र लिहिण्याकडे कां झाला नाहीं याचा थोडा तरी उलगडा होतो. वि. कॉ. ओक यांच्या चरित्रलेखनविषयक धोरणाची अशाच कांहींशा पद्धतीनें संगति लावतां येते. त्यांनीं पुस्तक रूपानें लिहिलेल्या बारा-तेरा चरित्रांत बहुतेक चरित्रें पाश्चात्यांचीं आहेत. एकादें चांगलेंसें इंग्रजी चरित्र आढळलें आणि मराठींत त्याचें भाषांतर झालेलें नसलें कीं ओकांनीं तें उतरलेंच मराठींत. एतद्देशियांचीं म्हणून त्यांनीं लिहिलेलीं चरित्रेंहि सर्वसाधारण जनतेला मोहनी पाडतील अशीं नाहींत. अर्थात् ओकांचें अनन्यसाधारण वैशिष्ट्य वेगळेंच आहे. तें म्हणजे त्यांनीं 'बालबोध' मासिक सतत चौतीस वर्षें चालवून त्यांतून ४०२ लहान लहान चरित्रें लिहिलीं हें होय.

चिपळूणकरांनीं दिलेली चरित्रांची वरील नामावलि पूर्ण नाहीं हें उघड आहे. तींत चौबळांचा 'रामदास स्वामी' (१८७१) आणि आजेरकरांचे 'विष्णुबुवा ब्रह्मचारी (१८७३)' इत्यादि ग्रंथांचा उल्लेख नाहीं. या दोन ग्रंथांचा येथें निर्देश करण्याचें कारण असें कीं, सर्वसाधारण मानानें या

काळांतील चरित्रें परभृत, परक्यांचीं अशींच असलीं तरी निबंधमाला निघण्या-पूर्वी आपल्याकडे एतद्देशियांविषयीं— किंबहुना समकालीनांविषयीं— चरित्रें होऊं लागलीं होतीं हें ध्यानीं यावें.

इंग्रज सरकारनें विद्याप्रसाराला प्रारंभ केल्यापासून ३०।४० वर्षांच्या आंत त्याचीं सुचिन्हें दिसूं लागलीं. १८६७ वर्षीं निलकंठराव कीर्तने यांनीं ग्रँड डफच्या इतिहासावर प्रतिकूल टीका केली; तेव्हांपासून विद्वानांमध्यें इति-हासाविषयीं जागृति उत्पन्न होऊन आपल्या इतिहासाकडे आपण स्वतःच्या डोळ्यांनीं पाहण्याची प्रवृत्ति उत्पन्न झाली. १८६७ वर्षींच निघालेल्या विविध-ज्ञानविस्तारांतून ऐतिहासिक वृत्तान्त येऊं लागला. १८७४ मध्यें विष्णु-शास्त्र्यांनीं 'इतिहास' या विषयावर आपल्या निबंधमालेंत मार्मिक नि विचार-प्रवर्तक लेख लिहिला. १८७८ मध्यें शाळिग्राम, साने, मोडक आणि चिपळूण-कर यांनीं सहकार्यानें काव्येतिहाससंग्रह काढला. या मासिकांतून साने यांनीं मोठ्या आस्थेनें संपादिलेल्या बखरी प्रसिद्ध होऊं लागल्या. अगोदरच निबंध-मालेनें लोकांच्या विचारांत क्रांति घडवून आणली होती. स्वधर्म, स्वदेश, स्वभाषा यांचा अभिमान वाढूं लागला होता. न्यूनगंड नाहींसा होऊन आत्मविश्वास बळावीत होता. अशा वेळीं आपल्या पूर्वजांच्या बखरी वाचायला मिळाल्या. त्यामुळें इतिहासाकडे लोकांचें अधिकच लक्ष वेधलें आणि इतिहासासंबंधीं समाजांत गोडी उत्पन्न झाली. या वेळीं ऐतिहासिक पुरुषांचीं चरित्रें लिहिण्यास खरा प्रारंभ झाला असें दिसतें. शाळिग्राम यांचें 'बापू गोखले-चरित' (१८७७), बापट यांचें 'थोरले बाजीरावसाहेब यांचें चरित्र' (१८७९), निगुडकरांचें 'परशुरामभाऊ पटवर्धन-चरित्र' (१८८२) आणि लोकहितवादींचा 'पृथ्वीराज चव्हाण' (१८८३) हीं चरित्रें या काळांतील इतिहासविषयक जिज्ञासेचीं द्योतक आहेत. शाळिग्राम आणि निगुडकर यांनीं आपलीं चरित्रें अनेक ग्रंथाधारें शोधपूर्वक लिहिलीं आहेत. परंतु बापटांनीं लिहिलेलें चरित्र मात्र कल्पित प्रसंगांनीं आणि काव्यमय वर्णनांनीं नटलेलें आहे. यामुळें चरित्रदृष्ट्या हा ग्रंथ सदोष ठरला तरी वाचतांना तो मोठा रोचक वाटतो आणि तो वाचून वाचकांचा स्वाभिमान उद्दीपित होतो. या काळांत उत्पन्न झालेल्या स्वाभिमानाचें हें फळ आहे असें समजावयास अडचण नाहीं.

चरित्रें चांगलीं वठावयास चरित्रकाराच्या ठिकाणीं आदराची आणि आपुलकीची भावना असावी लागते. किंबहुना विभूतिपूजा हेंच कित्येक वेळां चरित्रलेखनाचें प्रवृत्तिनिमित्त असतें. या दृष्टीनें हीं चरित्रें महत्त्वाचीं वाटतात. अर्थात् अजून ऐतिहासिक चरित्र-लेखनाचें पाया भरण्याचें काम चालू होतें. लोकांच्या इतिहासविषयक जिज्ञासेला थोडें थोडें खाद्य पुरवून ती वृद्धिंगत करण्याचें आणि तद्द्वारा ज्ञानप्रसार करण्याचे हे यत्न होते. लोकहितवादी 'पृथ्वीराज चव्हाण'च्या प्रस्तावनेंत लिहितात, "जुने इतिहास आपल्या महाराष्ट्र भाषेंत आणवतील तितके आणावे हें जें आमचें म्हणणें त्या म्हणण्यापैकींच हा प्रस्तुतचा अल्प प्रयत्न आहे." अर्पणपत्रिकेंत ते म्हणतात, "महाराष्ट्र देशांतील लोकांमध्यें ग्रंथसमृद्धिद्वारें ज्ञानसमृद्धि व्हावी, या हेतूनें देशबांधवांस हा ग्रंथ परमप्रीतिपुरःसर अर्पण केला आहे."

या पायावर पुढील बांधकामास प्रारंभ झाला. देशभक्तीच्या जाज्वल्य भावनेनें प्रेरित होऊन 'धनुर्धारी' (रा. वि. टिकेकर) यांनीं मराठेशाहींतील मोहऱ्यांचीं सुटसुटीत परंतु चुरचुरीत आणि उत्तेजक चरित्रें लिहिलीं. चरित्रांच्या नुसत्या शीर्षकांकडे पाहिलें तरी त्यांच्या भावनेची तीव्रता लक्षांत येईल. 'जवानमर्द मराठेगडी जनकोजी शिंदे', 'जवानमर्द ब्राह्मणभाई हरिपंत फडके', 'राज्यकार्य धुरंधुर फडणिस नाना' इत्यादि.

अशा तऱ्हेचीं रसरशीत आणि प्रोत्साहक चरित्रें होत असतांना, इतिहासाचें सूक्ष्म परिशीलन करून ऐतिहासिक सत्यास धरून कांटेकोरपणें ऐतिहासिक व्यक्तींचीं चरित्रें लिहिण्याची प्रथा वासुदेवशास्त्री खरे यांच्यापासून खरीखरी चालू झाली असें दिसतें. १८९२ त त्यांनीं 'नाना फडणविसाचें चरित्र' लिहिलें. १८९४ त महादजी। शिंद्यांचा पक्ष उचलून धरण्यासाठीं नातूंनीं 'महादजीचें चरित्र' लिहिलें. या वर्षी पारसनिसांनीं 'झांशीच्या महाराणी लक्ष्मीबाई' आणि १९०० मध्यें 'ब्रह्मेंद्रस्वामींचें चरित्र' प्रसिद्ध केलीं. खरे-पारसनिसांनीं पाडलेली ही प्रथा आतां चांगली रूळली आहे. बा. ना. देवांचें 'अहिल्याबाईचें चरित्र', केळुसकर आणि वैद्य यांचीं 'शिवाजी महाराजांचीं चरित्रें', सरदेसाई बेहरे, गुप्ते यांनीं अनुक्रमें लिहिलेलीं, 'नानासाहेब, बाजीराव, थोरले माधवराव' हीं चरित्रें चटकन् सांगतां येतील.

एकीकडे इतिहाससंबंधीं अशी जागृति होत असतां, नुसत्या भूतकाळा-वरच नव्हे तर वर्तमानकाळावर दृष्टि खिळवून नवीन युग निर्माण करण्याचे प्रयत्न १८८० पासून चालू झाले होते. १८८० मध्यें निघालेलें 'न्यू इंग्लिश स्कूल', १८८१ मधील 'केसरी-मराठा', १८८५ मधील 'राष्ट्रीय सभे'ची स्थापना, १८८८ मध्यें निघालेला 'सुधारक' इत्यादिकांनीं राजकीय आणि सामाजिक क्षेत्रांत नवनवीन विचार आणि नवनवीन आकांक्षा उत्पन्न केल्या होत्या. १८६७ त मुंबईस स्थापन झालेला 'प्रार्थनासमाज', १८७० मधील पुण्यांतील 'पुनर्विवाहासंबंधींचा वाद', १८७३ तील 'सत्यशोधक समाजा'ची आणि 'थिऑसॉफिकल सोसायटी'ची स्थापना इत्यादिकांमुळें धर्मक्षेत्रांतहि जागृति होऊन धर्मासंबंधीं नवीन विचार करण्याचें धैर्य दिसूं लागलें.

या कांहीं घटनांचा निर्देश करण्याचें प्रयोजन असें कीं, १८८० च्या आधीं-पासून महाराष्ट्रांत (महाराष्ट्रापुरताच येथें विचार करावयाचा आहे) स्वतंत्र विचार करून देशस्थिति सुधारण्याच्या यत्नांस प्रारंभ झाला होता. पूर्वीची सर्वतोपरी विस्कटत चाललेली घडी पुन्हा घालण्याचें काम चालूं झालें होतें. त्यामुळें धर्माचीं किंवा समाजपुरुषाचीं बंधनें ढिलावत जाऊन समाजांतील व्यक्ति पुढें सरसावत होत्या. कर्तृत्वशाली पुरुषांना महत्त्व येऊं लागलें होतें. मनुष्याची मनुष्य म्हणून योग्यता पटूं लागली होती. मानवी जीवनाकडे अधिक लक्ष वेधूं लागलें होतें. मानवी जीवनांतील गुंतागुंती ध्यानांत येऊन आणि मानवी जीवन स्वातंत्र्यानें, अभिमानानें, सुखानें जगणें श्रेयस्करच आहे अशी जाणीव होत होती. याचा परिणाम दोन तीन पिढ्यानंतर चरित्र-वाङ्मयावर झाल्याविना राहिला नाहीं. उदाहरण द्यावयाचें झाल्यास 'विष्णुशास्त्री चिपळूणकरांचें चरित्र' आणि 'डॉ. आनंदीबाई जोशी यांचें चरित्र' या दोन ग्रंथांचें देतां येईल.

१८८५ मध्यें स्थापन झालेल्या राष्ट्रीय सभेमुळें राजकीय आकांक्षांना पद्धत-शीर वळण लागलें. राजकारणाचा अभ्यास होऊं लागला. पाश्चात्य देशांतील राजकारणी पुरुषांकडे दृष्टि वळून त्यांचीं चरित्रें होऊं लागलीं. रिचर्ड कॉब्‌-डेन, जॉन ब्राइट, ब्रॅड्‌ला यांचीं चरित्रें झालीं. १९०१ मध्यें केळकरांनीं 'गॅरिबाल्डी' हा ग्रंथ लिहिला आणि १९०७ मध्यें विधिविशारद सावर-करांनीं 'मॅझिनीचें आत्मचरित्र' हा ओजस्वी ग्रंथ प्रसिद्ध केला. श्री. मुंडले

यांनीं महाराष्ट्रीय तरुणास ' बहुश्रुत, साक्षेपी, विचारवंत व कार्यक्षम बनविण्याच्या हेतूनें ' पाश्चात्य देशोद्धारकांचीं चरित्रें लिहिलीं. 'काव्हूर ऊर्फ इटलीचा रामदास' ( १९१५ ), 'प्रिन्स बिस्मार्क' ( १९१७ ) आणि 'विल्यम दि सायलेंट' या चरित्रांच्या निवडीवरून त्यांचा उद्देश स्पष्ट होतो. विशेषतः काव्हूरचें रामदासाशीं दाखविलेलें साम्य कुणाच्याहि डोळयांत भरण्याजोगें आहे. याच मालिकेंत बसण्यासारखीं दुसरीं चरित्रें म्हणजे नेपोलियनचीं बापट, मुंडले आणि भावे यांनीं लिहिलेलीं चरित्रें. प्रा. ना. सी. फडके यांचीं 'हिम्मत बहाद्दर टेरेन्स मॅक्स्विनी' आणि 'आयरिश धुरंधर इमॉन डी व्हॅलेरा' हीं पुस्तकें उल्लेखनीय आहेत. मुसोलिनी, हिटलर, लेनिन, कार्ल मार्क्स इत्यादिकांवरहि मराठींत आतां चरित्रें झालीं आहेत.

पाश्चात्य राष्ट्रवीरांचा स्वार्थत्याग आणि त्यांचे राजकारणाचे पेचप्रसंग नि आडाखे ध्यानांत यावे या प्रधानहेतूनें जरी वरील ग्रंथांची रचना होत असली, तरी बहुश्रुतपणा वाढून ज्ञानप्रसार व्हावा हा निरुपद्रवी उद्देशहि असे ग्रंथ लिहितांना नसतो असें नाहीं. या निरागस जिज्ञासेनें लिहिलेलें पुस्तक म्हणजे प्रा. माटे यांचें 'पाश्चात्य पुरुषश्रेष्ठ' हें होय.

स्वाभिमानाची भावना चरित्रवाङ्मयांत दोन मार्गांनीं कशी आविष्कृत झाली तें आतांपर्यंत पाहिलें. स्वाभिमानाच्या भावनेला प्रगट व्हायला आणखी एक द्वार मिळालें. अर्थात् ही स्वाभिमानाची भावना एकांगी नसून, तिच्या जोडीला धार्मिक बुद्धि, भक्तीची भावना आणि थोडीशी संशोधकाची वृत्ति इतक्या उण्या-अधिक उपाधि होत्या. या सर्व प्रवृत्ति संतचरित्रांत फलद्रूप झाल्यासारख्या दिसतात. तसेंच पाहिलें तर जनार्दन रामचंद्र यांनीं १८६० वर्षी त्रुटित कविचरित्रें पुस्तकरूपानें लिहिलीं. १८७१ त चौबळांचा 'रामदास स्वामी' प्रगट झाला याचा उल्लेख वर आलाच आहे. एकनाथ आणि तुकाराम यांचीं चरित्रें अनुक्रमें १८७२ आणि १८७७ त प्रसिद्ध झालीं. १८८० त हंसांनीं तुकारामावर निबंध लिहिला आणि पुढें दोन दोन वर्षांनीं मोरोपंत आणि वामन पंडित यांच्यावर निबंध लिहिले. १८८३त सहस्रबुद्धे यांनीं 'एकनाथाचें चरित्र' लिहिलें. हें चरित्र शोधपूर्वक दक्षतेनें आणि सहृदयतेनें लिहिलेलें आहे. संत-चरित्रांत चमत्कारादि अद्‌भुत गोष्टींचें वर्णन करावें कीं करूं नये

यासंबंधीं दहाव्या प्रकरणांत केलेलें विवेचन एकदां दृष्टीखालीं घालण्यासारखें आहे. यानंतर तप दीड तप या संत-कवींकडे कोणी विशेषसें वळलेलें दिसत नाहीं. १८९८-९९ त श्री. भारदे यांनीं सुधारकांतून 'ज्ञानदेव व ज्ञानेश्वर' हा प्रबंध प्रसिद्ध केला आणि त्याला उत्तर देण्यासाठीं श्री. भिंगारकरांनीं १९०० त केसरींतून विस्तृत लेखमाला लिहिली. विजापूरकरांच्या ग्रंथ-मालेंत १९०० च्या चेतानें वि. का. राजवाडे यांनीं तुकाराम, मुक्तेश्वर आणि रामदास यांच्यावर निबंध लिहिले. या निबंधांना चरित्रपर म्हणतां आलें नाहीं तरी जुन्या कवींकडे पुन्हा विद्वानांची दृष्टि वळल्याची ही खूण आहे. 'रामदास' निबंधांतील प्रतिपादनावर मागाहून बरीच भवति न भवति झाली; पण तिच्याशीं येथें आपणांस कांहीं कर्तव्य नाहीं. बा. अ. भिडे यांनीं 'सरस्वती मंदिर' मासिकांतून तुकाराम, मुक्तेश्वर आणि वामन यांच्यावर लेख लिहिले. अशा रीतीनें संतकवींचा परामर्श घेतला जात होता. परंतु संतकाव्याचें वा संतचरित्राचें नांव निघालें कीं लगेच आठवण होते ती ह. भ. प. पांगारकरांची; इतका त्यांचा संतकाव्याशीं आणि संतचरित्रांशीं निकटचा संबंध आहे. किंबहुना संतकाव्य त्यांच्या जिव्हाग्रीं नाचतें आहे आणि संतचरित्र त्यांच्या जीवनक्रमांत प्रतिबिंबित झालें आहे. 'ज्ञानेश्वरचरित्र व ग्रंथविवेचन', 'तुकारामचरित्र', 'मुक्तेश्वर-चरित्र आणि काव्यविवेचन', 'ज्ञानेश्वरांची प्रभावळ', 'एकनाथचरित्र', 'संतचरित्रमाला' आणि विशेष उल्लेखनीय म्हणजे 'मोरोपंतचरित्र आणि काव्यविवेचन' हा त्यांचा सुप्रसिद्ध ग्रंथ. एवढी विपुल ग्रंथसंपदा निर्माण करून त्यांनीं संतचरित्र-वाङ्मयांत खरोखरीच मोलाची भर घातली आहे. श्री. पांगारकरांची वाणी आणि लेखणी दोन्ही सारख्याच रसाळ आहेत. त्यांच्या चरित्रांत विवेचक चिकित्सेपेक्षां, श्रद्धालु भाविकता अधिक आढळली तरी त्यांत चिकित्सा आणि विवेचन नाहींत असें नाहीं. त्यांच्या मोरोपंतांच्या चरित्रांत त्यांच्या संशोधक नि सारासार विवेचकबुद्धीचा आणि त्यांच्या मार्मिक नि रसिक सहृदयतेचा सुंदर संगम झालेला दिसतो. श्री. पांगारकरां-नंतर लगेच कुणाचें स्मरण होत असेल तर तें महाराष्ट्रभाषा-भूषण आजगांवकरांचें. यांनीं 'महाराष्ट्र कविचरित्रां'च्या आठ भागांत कित्येक लहान मोठ्या कवींचीं चरित्रें देऊन त्यांच्या काव्याचाहि थोडक्यांत परामर्श घेतला

आहे. 'महाराष्ट्र संत-कवयित्री' हें त्यांचें अलीकडे प्रसिद्ध झालेलें पुस्तक वाचनीय आहे. या दोन खंद्या चरित्रलेखकांव्यतिरिक्त आणखी कित्येकांनीं संतचरित्रें लिहिलीं आहेत. भिंगारकरबुवा, पारख, प्रा. दांडेकर, गु. प्रा. अळतेकर यांनीं ज्ञानेश्वरावर विवेचक चरित्रें लिहिलीं आहेत. मुळे यांचें 'नामदेवचरित्र', राजारामशास्त्री भागवत आणि टिपणीस यांनीं लिहिलेलीं एकनाथाचीं चरित्रें, आठल्ये यांचें 'समर्थांचें सामर्थ्य ऊर्फ रामदास स्वामींचा लीलानुग्रह', स. खं. अळतेकर यांचें 'श्रीसमर्थचरित्र', केळूसकर, टिपणीस, यांचीं तुकारामाचीं चरित्रें इत्यादि अनेक लहान मोठे भलेबुरे चरित्रग्रंथ मराठींत झाले आहेत.

संतचरित्र म्हटलें कीं तें अद्‌भुत चमत्कार, पाल्हाळ, अतिशयोक्ति यांनीं भरलेलें असावयाचें अशी आपली सामान्य कल्पना आहे. आणि बरींचशीं संतचरित्रें पाहिलीं तर ती खरीहि आहे. त्यांत समाधानाची गोष्ट म्हणजे आधुनिक विद्वानांचें या संतचरित्रांकडे वळलेलें लक्ष. भिंगारकर, प्रा. दांडेकर गु. प्रा. अळतेकर व स. खं. अळतेकर इत्यादिकांनीं लिहिलेल्या चरित्रांतून विवेचक बुद्धीचा समतोलपणा आढळतो.

चरित्र लिहिण्याची प्रथा पडत चालल्यावर केवळ भूतकाळांतील ऐतिहासिक पुरुष वा संतकवि किंवा परदेशांतील थोर विभूति यांच्यावरच चरित्रें रचलीं जातील हें संभवनीय नव्हतें. सभातरंगकारानें म्हटल्याप्रमाणें "स्वदेशजातस्य नरस्य नूनं गुणाधिकस्यापि भवेदवज्ञा" हें जरी खरें असलें; आणि याच न्यायानें वर्तमानकाळापेक्षां भूतकाळाभोंवतीं आपोआप आदराचें तेजोवलय निर्माण होतें ही अनुभवसिद्ध गोष्ट असली, तरी ज्यांच्याविषयीं प्रेमादर वाटेल अशा थोर विभूति या काळांत आपल्याकडे उत्पन्न झाल्या होत्या. आंग्लाईनंतर थोड्याच वर्षांत इकडे नवीन इतिहास घडूं लागला होता, नव्या युगाची स्थापना होत होती. हा इतिहास जे घडवीत होते, या नवीन युगाच्या स्थापनेसाठीं जे झटत होते त्यांच्याकडे चरित्रकारांचें लक्ष गेल्याविना कसें राहील ? अशा समाजनायकांविषयीं समाजाला प्रेमादर वाटणें अगदीं स्वाभाविक आहे. एवढी प्रेमादराची भावना आणि त्या व्यक्तीभोंवतीं उत्पन्न झालेल्या घटनांचा इतिहास सांगण्याची

इच्छा चरित्रलेखनास प्रेरक होतात. अशा प्रेरणेनें आपल्याकडे कित्येक राष्ट्रपुरुषांचीं चरित्रें लिहिलीं गेलीं आहेत. १८७३ मध्यें आजरेकरांनीं लिहिलेलें विष्णुबुवा ब्रह्मचारी यांचें चरित्र मागें निर्देशिलें आहेच. १८६५ मध्यें दिवंगत झालेले नानाशंकरशेट यांचें चरित्र बऱ्याच उशिरानें लिहिलेलें असलें तरी, ( १९१६ ) त्याचा येथेंच उल्लेख करतों. या चरित्रासंबंधीं A. R. Scoble लिहितात-- "I might say without exaggeration that the life of Mr. Jagannath Shankarset was a history of native advancement in Bombay." समाजोन्नतीसाठीं त्यांनीं जे चारी अंगांनीं प्रयत्न केले त्यामुळेंच त्यांच्या चरित्राला एवढें महत्त्व प्राप्त झालें आहे. विष्णुशास्त्री चिपळूणकर आणि डॉ. आनंदीबाई जोशी यांच्यावर लिहिलेल्या चरित्रांचा उल्लेख मागें एकदां केलाच आहे. विष्णुशास्त्री चिपळूणकरांवर त्यांच्या बंधूंनीं लिहिलेल्या चरित्राव्यतिरिक्त १८९१ सालीं श्री. बेलसरे यांनीं एक चरित्रात्मक निबंध लिहिला. त्यानंतर बा. ना. देव, प्रा. न. र. फाटक, पांगारकर, माडखोलकर, आणि प्रा. बनहट्टी यांनींहि त्यांच्या चरित्रावर— विशेषतः त्यांनीं केलेल्या कार्यावर— मर्मग्राही, उद्बोधक निबंध लिहिले. श्री. बा. ना. देव यांनीं बाळ गंगाधरशास्त्री जांभेकर ( १८९२ ), आणि विनायक जनार्दन कीर्तने (१८९७) यांचीं चरित्रें लिहिलीं. १८९७ वर्षीच श्री. सहस्रबुद्धे यांनीं लो. टिळकांचें त्रोटक चरित्र लिहिलें. पुढें गुरुजी, कुलकर्णी, पुरोहित, दामले इत्यादिकांनीं लोकमान्यांचीं चरित्रें लिहिलीं. या सर्वांहून सर्व दृष्टींनीं श्रेष्ठ म्हणजे श्री. तात्यासाहेब केळकर यांनीं लिहिलेलें 'टिळक-चरित्र'. या चरित्रांत लोकमान्यांची भव्यता चांगलीच प्रतीत होते. लोकमान्यांचें चरित्र सांगतांना तत्कालीन कित्येक लहान-मोठ्या घडामोडींचा साद्यंत वृत्तांत श्री. केळकरांना द्यावा लागला आहे. परंतु ही गोष्ट केवळ अपरिहार्य होती. ज्या घडामोडींस लो. टिळकांचें कर्तृत्व उणें-अधिक कारणीभूत होतें, ज्या घडामोडी एका परीनें त्यांच्या जीवनांत समाविष्ट होतात, त्यांचा इतिहास टाळून कसें चालेल ? अर्थात् प्रत्येक घटना जणूं वेगळी, तिचा तेवढ्यापुरता वृत्तांत सादर करायचा आणि मग पुढचें प्रकरण चालू करायचें ही पद्धति मात्र चरित्र-लेखनकलेस मान्य नाहीं. जीवनाच्या एकपिंडीभूत महान्

घटनेमध्यें समाविष्ट होणाऱ्या या संचारी अंगभूत घटना एकरूपतेच्या नात्यानेंच चरित्रांत आल्या पाहिजेत. त्यांचा वेगळेपणा उघडपणें दिसतां कामा नये. या चरित्रासंबंधीं प्रा. बनहट्टींनीं एक आक्षेप घेतला आहे आणि तोहि बहुंशीं खराच आहे. या चरित्रांत चरित्रनायकाच्या प्रत्येक कृतीचें समर्थन करण्याकडे कल दिसतो. चरित्रकाराची भूमिका पक्षपाती पुरस्कर्त्यांची नसून, ती विवेचक विवरणकर्त्यांची असते. चरित्रलेखनकलेच्या दृष्टीनें असे अल्प दोष या चरित्रांत असले तरी, हें चरित्र मराठी भाषेला भूषणावह आणि श्री. केळकरांच्या कीर्तीला सर्वस्वीं साजेसेंच आहे. प्रा. न. र. फाटक यांनीं लिहिलेलें 'न्या. मू. रानडे यांचें चरित्र' विशेष उल्लेखनीय आहे. या चरित्रांत त्या काळांतील विविध चळवळी, नवनवीन उपक्रम, नवनवीन सुधारणेचे प्रयत्न आणि या सर्वांना न्यायमूर्तींनीं दिलेली प्रेरणा, आणि यासंबंधीं त्यांनीं जातीनें केलेलें कार्य यांचा इतिहास कळतो. या चरित्रांत न्यायमूर्तींची व्यापकबुद्धि आणि कार्याकार्यविवेक यांचा ठसा वाचकांच्या मनावर उमटल्याविना राहत नाहीं. या चरित्राची मांडणी मात्र बरीच विस्कळीत झाली आहे. रचनेंत बांधेसूदपणा असता तर हेंच चरित्र अधिक उठून दिसलें असतें. गु. प्रा. अळतेकर यांनीं आगरकरांवर लिहिलेल्या चरित्रात्मक निबंधाचा येथेंच निर्देश करणें बरें. बोलून चालून हा 'निबंध' असल्यामुळें चरित्रलेखनकलेचे नियम या ग्रंथास लावतां येणार नाहींत. तरी पण 'निबंध' म्हणूनहि या चरित्रांतील एक वैगुण्य सांगतां येईल. हा निबंध जणूं आगरकरांचा पक्ष लढवण्याच्या अभिनिवेशानें लिहिला आहे असें वाटतें. सत्यासत्य पारखण्याची वेळ आली कीं, गुळमुळीत न लिहितां निर्भीड सडेतोडपणानें लिहावें लागतें हें योग्यच आहे. विचार-उच्चारांचा प्रांजलपणा हा गु. प्रा. अळतेकर यांचा स्वभावसिद्ध स्थायी गुण आहे. आणि आगरकरांचें शिष्यत्व तें हेंच! परंतु या चरित्रापुरतें बोलायचें तर या चरित्र-निबंधांत निःपक्षपाती, सूक्ष्म विवेचकबुद्धि सर्व ठिकाणीं सारख्याच तीव्रतेनें चालवलेली दिसत नाहीं.

यानंतर चरित्रकार म्हणून श्री. श्रीनिवास नारायण कर्नाटकी आणि श्री. द्वा. गो. वैद्य यांचा उल्लेख करणें उचित होईल. श्री. कर्नाटकी यांनीं डॉ. भांडारकर, न्या. मू. तेलंग व डॉ. भाऊ दाजी लाड यांचीं चरित्रें लिहिलीं

आहेत. श्री. वैद्य यांनीं डॉ. भांडारकर आणि सर नारायणराव चंदावरकर यांचीं चरित्रें रचिलीं आहेत. श्री. कर्नाटकींचीं चरित्रें गुणांनीं बेताबाताचीं आहेत. त्यांत चरित्र-व्यक्तीच्या कार्याची आपणांस चांगली कल्पना येतें, एवढेंच! वैद्यांनीं लिहिलेलीं चरित्रें मात्र जीवनविषयक धागेदोरे नीट परिश्रम-पूर्वक जुळवून चरित्र-नायकाचें व्यक्तित्व प्रगट होईल अशा पद्धतीनें रचिलीं आहेत. श्री. साने गुरुजी (पां. स. साने) यांनीं नामदार गोखले, ईश्वरचंद्र विद्यासागर, इतिहासाचार्य राजवाडे आणि अमळनेरचे सखाराम महाराज यांचीं चरित्रें लिहिलीं आहेत. साने गुरुजींचें सर्वच लेखन त्यांच्या अंतः-करणांतून उगवलेलें असतें; ते बोलतात तेंहि अगदीं अंतःकरणापासून, हृदयाच्या आंतल्या गाभाऱ्यांतून; नुसत्या ओठांनीं उसनें बोलणें त्यांना साधतच नाहीं. ते बोलतात तसेंच लिहितात. त्यांचीं दृष्टि जीवनाचा सदा ठाव शोधीत असते. औपचारिक वरपांगीपणा तिच्या गांवींहि नाहीं. या सर्व चरित्रांतून त्या त्या व्यक्तींच्या जीवनांत आढळणारें जीवनरहस्य, तेथें मिळणारा जीवनविषयक संदेश हुडकून काढण्याचा त्यांचा उद्देश दिसतो. एका व्यक्ती-संबंधीं किंवा घटनेसंबंधीं लिहितांना उगाच दुसऱ्या व्यक्तीवर वा घटनेवर शिंतोडे उडविण्याची खोड त्यांना नाहीं. त्यांचें लेखन म्हणजे त्यांच्या हृदयाप्रमाणें निर्मळ आणि सोज्ज्वल!

श्री. गं. दे. खानोलकर यांनीं अण्णा विजापूरकर, श्री. कृ. कोल्हटकर आणि लाला लजपतराय यांचीं चरित्रें लिहिलीं आहेत. यांपैकीं श्री. कृ. कोल्हटकरांचें चरित्र जरी कामचलाऊच उतरलें असलें, तरी अण्णा विजापूर-कर आणि लाला लजपतराय यांचीं चरित्रें, त्यांनीं केलेल्या विविध कार्याचें निदर्शन आणि रचना या दृष्टींनीं चांगलीं वठलीं आहेत.

एवढ्याशा स्थल मर्यादेंत किती म्हणून चरित्रांचीं आणि चरित्रलेखकांचीं नांवें सांगूं? गेल्या शतकांत ज्यांनीं देशोन्नतीला या नाहीं त्या प्रकारें हातभार लावला त्यांपैकीं बहुतेकांवर चरित्रप्राय लहान-मोठीं पुस्तकें लिहिलीं गेलीं आहेत.

आणखी विशेष गोष्ट अशी कीं, चरित्रनायकाची निवड महाराष्ट्रापुरतीच मर्यादित नाहीं. ईश्वरचंद्र विद्यासागर आणि लाला लजपतराय यांच्या

पुस्तकांचा निर्देश नुकताच केला आहे. प्रा. ना. सी. फडके यांनीं लिहिलेलें 'दादाभाई नौरोजी यांचें चरित्र', श्री. रा. प्र. कानिटकर यांनीं लिहिलेलीं ' मोतीलाल नेहरू' आणि 'रवींद्रनाथ टागोर' हीं चरित्रें, तसेंच श्री. भिडे यांचीं 'जवाहरलाल नेहरू', 'सुभाषचंद्र बोस' आणि 'पंडित मदनमोहन मालवीय' हीं चरित्रें सहज डोळ्यांपुढें येण्यासारखीं आहेत. महात्मा गांधींचीं अनेक चरित्रें आहेत. त्यांत सौ. अवंतिकाबाई गोखले, सीताराम केशव दामले आणि सीताकांत यांनीं लिहिलेलीं चरित्रें प्रसिद्ध आहेत.

याप्रमाणें आतांपर्यंत स्वाभिमानाची एक स्थायी भावनाच निमित्तभेदानें, थोडथोड्या भिन्न कारणांनीं वर उल्लेखिलेल्या पांचसहा प्रकारच्या चरित्रांस कशी कारणीभूत झाली हें दाखविण्याचा यत्न केला आहे. परंतु चरित्रें लिहिण्यास आणखीहि कांहीं इतर निमित्तें होतात.

सामाजिक राजकीय जीवनाविषयीं ज्यांना विशेष जिव्हाळा, त्यांनीं त्या क्षेत्रांत कार्य केलेल्यांचीं चरित्रें लिहिलीं. त्याचप्रमाणें ज्यांचें मन धर्म-विषयाकडे अधिक कललेलें, त्यांनीं धर्मसंस्थापकांवर — बुद्ध, महावीर, महंमद पैगंबर इत्यादिकांवर — चरित्रें लिहिलीं.

नाटककार आणि नट यांच्यासंबंधीं वाटणारें कुतूहल पुरवण्याकरितां त्यांचीं चरित्रें लिहिलीं गेलीं. अण्णासाहेब किर्लोस्कर, गणपतराव जोशी, भाऊराव कोल्हटकर, बालगंधर्व इत्यादिकांचीं चरित्रें झालीं आहेत.

विश्वविद्यालयानें नेमलेल्या अभ्यासक्रमांत अंतर्भाव झाल्यामुळें कांहीं ग्रंथकारांचीं चरित्रें लिहिलीं गेलीं. बर्क (चापेकर), कार्लाइल (दामले), स्पेन्सर (फडके), मेकॉले इत्यादिकांचीं चरित्रें लिहिण्यास त्या त्या चरित्र-नायकाचें विश्वविद्यालयाच्या अभ्यासक्रमांत असलेलें स्थान कारणीभूत झालेलें आहे. अलीकडे श्री. हर्षे यांनीं लिहिलेलें 'तुकाराम-चरित्र', कु. वेणूबाई पानसे यांनीं लिहिलेलें 'हरि नारायण आपटे यांचें चरित्र', श्री. खांडेकरांनीं लिहिलेले गडकरी-आगरकरांवरील चरित्रात्मक विवेचक प्रबंध इत्यादि ग्रंथ, या ग्रंथकारांना अभ्यासक्रमांत विशेष महत्त्व असल्यामुळें निर्माण झाले असावे असें वाटतें.

साहित्य-संमेलनाच्या निमित्तानें श्री. कृ. कोल्हटकर आणि वा. म. जोशी यांचीं चरित्रें लिहिलीं गेलीं. साठाव्या वर्षी होणाऱ्या सत्काराच्या निमित्तानें 'गौरव-ग्रंथ' निर्माण होत आहेत.

आतांपर्यंत स्वाभिमानाची भावना स्वदेश, स्वभाषा, स्वधर्म आणि स्वजन इत्यादि मार्गांनीं कशी प्रगट झाली याचें दिग्दर्शन केलें; आणि तेवढ्यापुरता अमळ विस्तारानें कांहीं चरित्रांचा आणि चरित्रकारांचा, अधूनमधून अल्प-स्वल्प टीकेसह निर्देश केला. सर्व चरित्रांचें वा चरित्रकारांचें संकीर्तन करण्याचा हेतु नव्हता. तरी पण जेवढ्या चरित्रांचा नि चरित्रकारांचा प्रसंगोपात्त उल्लेख आला आहे तेवढ्यांवरून मराठी भाषेंत चरित्रें पुष्कळशीं आहेत असा कोणाचाहि ग्रह होईल, आणि तो खराहि आहे. मराठी भाषेंत आज छाती दडपून टाकणारी, थक्क करून सोडण्याइतकी चरित्रांची संख्या नसली तरी, आहे ती संतोष वाटण्यासारखी आहे निश्चित! मेसर्स बाबाजी सखाराम आणि कंपनीनें आर्यभूषण छापखान्यांत छापून प्रसिद्ध केलेल्या महादेव गोविंद रानडे यांच्या एकवीस पानी चरित्रापासून तों तात्यासाहेब केळकरांनीं लिहिलेल्या १९४४ पानांच्या टिळकचरित्रापर्यंत; आणि कृ. आ. गुरुजी यांच्या अगदीं छोट्या पौराणिक भीष्मचरित्रापासून तों श्री. भसे यांच्या अतिविस्तृत परदेशी टॉलस्टाय-चरित्रापर्यंत सर्व लहान-मोठ्या, प्राचीन-अर्वाचीन, देशी-परदेशी चरित्रांची परिगणना केली तर चरित्रांची एकूण संख्या ८०० ची सीमा ओलांडून १००० च्या उंबरठ्यासमीप गेलेली आढळेल असें वाटतें. ही संख्या कांहीं उपेक्षणीय नाहीं. परंतु नुसत्या संख्येला केव्हांच महत्त्व नसतें; संख्येसमवेत गुणांकडे लक्ष पुरविलें पाहिजे; आणि गुणांवर भर देऊन जर या चरित्रांची पारख केली तर पुष्कळशीं चरित्रें वाङ्मयगुणसंपन्न नाहींत असें म्हणावें लागेल.

ऑक्सफर्ड कोशांत चरित्राची व्याख्या "The history of the lives of individual men as a branch of literature" म्हणजे व्यक्तीचा वाङ्मयस्वरूपी जीवनेतिहास– अशी केली आहे. या व्याख्येंत (व्यक्ति) जीवन, इतिहास आणि वाङ्मयस्वरूप हे तीन घटक महत्त्वाचे आहेत. चरित्रामध्यें चरित्रभर जीवनाचा सूर वाहत असला पाहिजे. नुसते प्रसंग, घटना, चळवळी यांचा प्रपंच करून त्यांत जीवनाचें रहस्य नसेल

तर, आंत राम आढळला नाहीं म्हणून हनुमामानें फेकून दिलेल्या मौक्तिक-सराप्रमाणें, या चरित्रांचें महत्त्व कोणीच मानणार नाहीं. नुसतीं युद्धें आणि वर्षावळी देणाऱ्या इतिहासाची जी गत, तीच अशा चरित्रांची! चरित्र-व्यक्तीच्या जीवनाशीं जिव्हाळ्यानें समरस झाल्याविना जीवनाचा हुंकार चरित्रांत भरतां येणार नाहीं. प्राचीन संतांच्या चरित्रांत चमत्कार आणि अद्‌भुत घटना यांचें वर्णन असतें, परंतु संतांच्या व्यक्तित्वविकासाकडे तितकेंसें कुणी लक्ष देत नाहीं. कै. बा. अ. भिडे यांच्या तुकाराम-चरित्रांत मात्र तुकारामाच्या मनःस्थितीचें, मतपरिवर्तनाचें, हृदयपालटाचें विवेचन वाचावयास सापडतें. चरित्रामध्यें 'इति ह आस' या जातीचें सत्यकथन असावयास हवें. चरित्र म्हणजे कल्पित कवन किंवा कादंबरी नव्हे. श्री. बापट यांच्या 'पहिले बाजीराव पेशवे' या चरित्रांत ऐतिहासिक सत्यकथनापेक्षां काल्पनिक घटनाप्रसंगांचेंच वर्णन आलें असल्यामुळें या ग्रंथास चरित्रग्रंथ कितपत म्हणावें असा प्रश्न पडतो. वासुदेवशास्त्री खरे यांच्या नाना फडणविसांच्या चरित्रांत आणि केळुसकरांच्या शिवाजीच्या चरित्रांत मात्र ऐतिहासिक सत्यकथनावर भर दिलेला आहे; त्याचप्रमाणें काशीताई कानिटकरांनीं मूळचीं पत्रें देऊन, आणि बुद्धिपुरःसर मूळची खरीखरी माहिती मिळवून डॉ. आनंदीबाई जोशी यांचें चरित्र लिहिलें आहे. चरित्रांत सत्यकथनाचें अतीव महत्त्व न कळल्यामुळें बापटांनीं पहिल्या बाजीराव पेशव्यांच्या चरित्रांत काल्पनिक वर्णनें घातलीं; परंतु जाणून बुजून सत्य लपवण्याकडेहि दुसऱ्या कारणांनीं प्रवृत्ति होते. चरित्रांत वर्णिलेल्या घटनांमुळें किंवा केलेल्या विधानांमुळें कोणाचें मन दुखविलें जाण्याचा संभव असल्यास अशा घटना किंवा विधानें सर्वस्वीं गाळण्याकडे किंवा त्यांना मुरड घालून तीं निरुपद्रवी करण्याकडे प्रवृत्ति होते. तात्यासाहेब कोल्हटकरांचें आत्म-चरित्र प्रसिद्ध झाल्यावर कांहीं लोकांचीं मनें दुखावल्याचा वृत्तांत आपणांस ठाऊक आहे. आणि नटवर्य बोडस यांनीं लिहिलेल्या 'माझी भूमिका' या आत्मचरित्रां-तील कांहीं उल्लेखांवरून न्यायमंदिरापर्यंत हें प्रकरण गेल्याचें आपण ऐकतों. सत्यापलापाचें दुसरें कारण असें कीं, चरित्रकार ज्या व्यक्तीचें चरित्र लिहितो त्या व्यक्तीसंबंधीं त्याच्या मनांत आदराची भावना असते; या आदराच्या भावनेमुळें त्याला चरित्रव्यक्तीचे दोष दिसत नाहींत हें एक, किंवा

दिसले तरी तो डोळ्यांवर कातडी ओढतो; त्यामुळें चरित्रनायकाचें चित्रण धुतलेल्या तांदळांप्रमाणें स्वच्छ दिसतें. चरित्रकाराचे ठिकाणीं आदराची, प्रेमाची भावना असावी परंतु प्रेमान्धता नसावी; उदारता असावी परंतु उठल्या सुटल्या गोडवे गाणारी स्तुतिपाठप्रियता नसावी. चरित्रव्यक्ति आणि चरित्रकार यांच्यामध्यें गुरुशिष्याचें नातें असलें तरीहि भिडस्तपणा बळावतो. अशा रीतीनें एकांगी चरित्रें लिहिण्याची प्रथा पूर्वापार आहे आणि तिचें समर्थनहि पूर्वापार होत आलें आहे. " Good things for good men and evil things for evil men " या तत्त्वाचा पुरस्कर्ता Bede आठव्या शतकांतला आहे. कार्लाइलसुद्धां लिहितो, " The history of mankind is the history of its great men: to find out these, clean the dust from them, and place them on their proper pedestal." परंतु याविषयीं Voltaire चें म्हणणें असें आहे कीं, " We owe consideration to the living; to the dead we owe truth only." I love Socrates but the truth more." असें म्हणणाऱ्या प्लेटोचा सडेतोड प्रांजलपणा चरित्रकारांत असला पाहिजे. मुजुमदारांनीं लिहिलेल्या " अण्णासाहेब किर्लोस्करांच्या " चरित्रावर टीका करतांना तात्यासाहेब कोल्हटकर लिहितात, " अण्णासाहेब बरेच विषयी असावेत असें दिसतें. याविषयीं आम्हीं एक आख्यायिका ऐकिली आहे, ती प्रस्तुत चरित्रांत कोठें दिसली नाहीं. ती अशी: '............' ही आख्यायिका अण्णासाहेबांच्या कुटुंबाचें मन दुखवूं नये, या हेतूनें चरित्रकारांनीं गाळली असावी......कदाचित् चरित्रनायकास लांच्छन येईल, या भीतीनें त्यांनीं हा भाग वगळला असावा. पण ही त्यांची भीति निराधार होती, असें आम्हांस वाटतें.........अशा एखाद्या आख्यायिकेमुळें चरित्रनायकाच्या अनेक अलौकिक गुणांस हरताळ लागेल. अशी भीति त्यांस नको होती." इत्यादि.

अर्थात् काय सांगायचें आणि काय वगळायचें हा विवेक, कलेच्या धोरणानें आणि मुख्य विषयप्रतिपादनाच्या अनुषंगानें करावा लागेल. एक वेळ एखादी घटना वगळली गेली किंवा चुकीनें एखादी चुकीची घटना ग्रथित केली गेली, तरी एक वेळ चालेल; परंतु जाणूनबुजून चुकीचें एककल्ली,

पक्षपाती प्रतिपादन पक्षाभिनिवेशानें करणें दोषास्पदच मानलें पाहिजे. विष्णुशास्त्री चिपळूणकरांसंबंधीं बा. ना. देव, मुंडले, प्रा. न. र. फाटक यांचे लेख; आणि टिळक-चरित्रावर दैनिक 'ज्ञानप्रकाशां'तून प्रसिद्ध झालेली श्री. आंबेकरांची लेखमाला आणि 'विविधज्ञानविस्तारां'तून प्रसिद्ध झालेले प्रा. न. र. फाटक यांचे लेख या दृष्टीनें वाचनीय आहेत. एकूण चरित्रांत सत्यकथनाची आणि प्रांजल प्रतिपादनाची अत्यंत आवश्यकता आहे.

चरित्राला वाङ्मयाचें रूप जर दिलेलें नसलें तर तें चरित्र म्हणजे एक प्रकारची दैनंदिनीच होईल. चरित्रांत जीवनेतिहासाला जितकें महत्त्व, तितकेंच त्याच्या रचनेला, कलांगाला आहे. विष्णुशास्त्र्यांनीं लिहिलेलें जॉन्सन्चें चरित्र, किंवा पांगारकरांनीं लिहिलेलें मोरोपंतांचें चरित्र यथार्थ आणि सुंदर चरित्राचें उदाहरण म्हणून पुढें करतां येईल.

चरित्र म्हणजे नुसतें वाङ्मयीन निवेदनहि नव्हे; नाहीं तर माहितीच्या अभावीं अगदीं तुटपुंजा जीवनेतिहास असलेलें परंतु अलंकारिक भाषेनें शृंगारलेलें 'वामन दाजी ओक यांचें पुष्पभाषात्मक चरित्र' उत्कृष्ट म्हणून चरित्रकार पेठे यांची प्रशंसा करावी लागेल.

चरित्रांत सत्य आणि सौंदर्य यांचा 'सुरेख संगम' व्हावयास सर्व प्रसंग, घटना, कृति यांचा सुसंगत अन्वय लावून सलग, एकजीव जीवनपट विणला गेला पाहिजे. अर्थात् हें बुद्धीचें काम आहे; भावनेचें नव्हे. बुद्धीनें, सारासारविचारानें प्रसंग-घटनांची निवड करावयास हवी. कित्येक वेळां अगदीं बेतीव, आखीव अखंड चरित्रापेक्षां त्या चरित्रांतली एखादी कृति वा उक्ति आपल्या मनावर चरित्रनायकाच्या व्यक्तित्वाचा चिरंतन ठसा उमटावितें. या दृष्टीनें भव्य, डोळ्यांत भरणाऱ्या कृतींपेक्षां एखादी घरगुती, व्यक्तिगत स्वभावछटा सांगणें श्रेयस्कर ठरतें. न्या. मू. रानडे लहानपणीं अंगावर घातलेले दागिने सदऱ्याआड झाकून टाकीत आणि बोटांतील अंगठीचा खडा अधोमुखी होईल अशा पद्धतीनें बोटांत उलटी अंगठी घालीत किंवा सोंगट्यांनीं खेळतांना खांचाकडून स्वतःवर मात होऊं देत, या बारीक सारीक गोष्टींनीं त्यांचें मन आपणांस जेवढें कळतें तेवढें 'चहा-प्रकरण' किंवा 'पुनर्विवाह-प्रकरण' यांवरूनहि कळत नाहीं. न जाणों, ईश्वर असलाच

तर त्याच्या पेढीवर पुण्य जमा होईल अशा वृत्तीनें कै. छत्रे निजण्यापूर्वी रामरक्षा म्हणत असत; या आख्यायिकेवरून त्यांच्या नास्तिकपणांत दुटप्पी, व्यापारी धोरणहि होतें हें जितकें मनावर ठसतें, तसें दुसऱ्या कशानेंहि ठसणार नाहीं. ज्या परिसरांत, ज्या वातावरणांत चरित्रनायक वाढला, विहरला त्याचेंहि यथार्थ चित्रण व्हावयास हवें. एकंदर रचना अशी असावी कीं, चरित्रव्यक्तीच्या स्वभावाचा खोल ठावहि लागेल, त्याच्या सर्वांगीण जीवनाचा ठळक ठसाहि उमटेल आणि सर्व घटना किंबहुना साद्यंत जीवन-क्रम चलत्‌चित्रपटाप्रमाणें आपल्या डोळ्यांपुढें प्रत्यक्ष घडतो आहे असें वाटेल.

चरित्र लिहायला चरित्र-नायक मोठा बुद्धिमान् असला पाहिजे असें नाहीं. तसेंच त्याच्या व्यक्तित्वाची उंची डोळे वर करून बघण्याइतकी पाहिजे किंवा त्यानें मोठमोठ्या घडामोडी केलेल्या पाहिजेत असेंहि नाहीं. सामान्यतः बुद्धिमान्, महानुभाव, कृतिवीर असेच चरित्रनायक निवडण्यांत येतात हें खरें; परंतु अशी निवड करतांना चरित्रलेखकाचे हेतु, सदुपदेश, प्रोत्साहन, कृतज्ञता, पुण्यस्मरण इत्यादि असतात; परंतु चरित्राकडे कलेच्या निरपेक्ष दृष्टीनें पाहिलें तर चरित्र कुणाचेंहि लिहितां येईल. लिहिणारा कुशल भेटला कीं झालें. कारण प्रत्येकाच्या जीवनांत कांहीं ना कांहीं 'अंदर की बात' असतेच. ती मेख ओळखून चरित्र लिहावयाचें म्हटल्यास सामान्य मनुष्याच्या जीवनाचें चांगलें चरित्र रचितां येईल. अशीं चरित्रें आपल्याकडे लिहिलीं जात नाहींत याचें एक कारण मानवी जीवनाचें इतकें महत्त्व आपणांस वाटत नाहीं आणि कलेची निरपेक्ष दृष्टि आपणांस एवढी आवडत नाहीं. नाहीं तर जेवढीं हृदयें तेवढीं रहस्यें, 'योजकस्तत्र दुर्लभः' एवढेंच काय तें!

चरित्रकाराच्या अंगीं तीक्ष्ण आणि सूक्ष्मनिरीक्षण शक्ति, बारीक-सारीक गोष्टी टिपून घेण्याची उत्सुकता, धारणाशक्ति, सारासार बुद्धि प्रांजलपणा आणि कळकळ हे गुण असले पाहिजेत. मराठी भाषेंत जीं चरित्रें आहेत त्यांपैकीं पुष्कळ चरित्रांवरून चरित्रकारानें पूर्वी बरींच वर्षें चरित्र लिहिण्याचा संकल्प करून, चरित्रनायकाच्या जीवनाचें सूक्ष्म निरीक्षण करून चरित्र लिहिलें आहे असें वाटत नाहीं. या नाहीं त्या कारणानें चरित्र लिहिण्याची इच्छा व्हावी, सहजीं मिळेल तेवढी माहिती मिळवावी आणि ती क्रमवार लिहून

मोकळें व्हावें असाच सामान्य प्रघात दिसतो. परंतु दिवसानुदिवस व्यक्तीला महत्त्व प्राप्त होत चाललें आहे आणि बोधवादासमवेत कलावादहि आपला अधिकार सांगण्यास पुढें सरसावला आहे. यामुळें यापुढें कलापूर्ण व्यक्तिचरित्रें अधिकाधिक निर्माण होतील अशी आशा करण्यास प्रत्यवाय नाहीं.

चरित्रासंबंधीं एवढें विवेचन झाल्यावर आतां आपणांस आत्मचरित्रांकडे वळलें पाहिजे. मराठीमध्यें आत्मचरित्रें थोडीं आहेत. परंतु आहेत तीं बरींच चांगलीं आहेत. विष्णुबुवा ब्रह्मचारी यांनीं आपल्या वेदोक्तधर्मप्रकाशाला जोडलेल्या आपल्या जीवनवृत्तानें आधुनिक मराठींत आत्मचरित्रांचा विभाग उघडला. त्यानंतर बाबा पदमनजींचा 'अरुणोदय' प्रसिद्ध झाला. या अरुणोदयांत बाबांनीं अगदीं लहानपणापासून आपला वृत्तान्त दिला असून, आपल्या मनांत कसकसा आणि कां पालट पडत गेला याचें अगदीं प्रांजल, रेखीव नि उठावदार वर्णन केलें आहे. त्यांच्या घरचे कुलधर्म, पूजाअर्चा, पांडवप्रताप, हरिविजयादि ग्रंथांचें वाचन, मिशनरी शाळा, तेथील वातावरण यांचें इतकें स्वाभाविक पद्धतीनें वर्णन केलें आहे कीं, आपण आपल्या डोळ्यांपुढें सर्व गोष्टी पाहत आहों असा भास होतो. आणि बाबांच्या मनांत विचारक्रान्ति कां होत होती याचा आपणांस अचंबा वाटत नाहीं. झालेल्या गोष्टींचें यथातथ्य चित्र बाबांनीं काढलें आहे. कोठेंहि समर्थनाचा प्रयत्न दिसत नाहीं आणि सर्व पुस्तक वाचून झाल्यावर बाबांनीं धर्मांतर कां केलें याचा उलगडा होतो. बाबांच्या या प्रांजल नि यथातथ्य कथनाचा प्रभाव जाणून अरुणोदयाच्या इंग्रजी भाषांतराला 'Once a Hindu, now a Christian' असें कांहींसें प्रचारकी नांव दिलें आहे. यानंतर दादोबा पांडुरंग यांनीं लिहिलेलें आत्मचरित्र १९२७–२८ मध्यें 'विविधज्ञानविस्तारां'तून अंशतः प्रसिद्ध झालें. साध्या, सरळ अंतःकरणाचें अव्याजमनोहर प्रतिबिंब या आत्मचरित्रांत पाहायला सापडतें.

'आमच्या आयुष्यांतील आठवणी' हा रमाबाई रानडे यांनीं लिहिलेला हृद्य ग्रंथ १९१० वर्षीं प्रसिद्ध झाला. माधवरावांच्या स्वभावाची खरी ओळख या पुस्तकांत होते. भाषा साधी, घरगुती, आणि झालेल्या गोष्टी लपंडाव न करितां सांगितलेल्या. त्यामुळें हें पुस्तक मोठें रम्य झालें आहे.

श्री. धोंडो केशव कर्वे यांचें आत्मचरित्र म्हणजे एका परीनें पुनर्विवाह आणि अनाथ-बालिकाश्रम यांचेंच चरित्र. या चरित्रांत अण्णासाहेबांची नेटानें कार्य करण्याची धडाडी आणि त्यांची ध्येयनिष्ठा यांचा चांगला प्रत्यय येतो.

धर्मानंद कोसंबी यांचें 'निवेदन', श्री. पावगी यांचें 'आत्मवृत्त', श्रीमती पार्वतीबाई आठवले यांची 'माझी कहाणी', श्री. देवधर यांचा 'जीवनवृत्तान्त' इत्यादि पुस्तकें उल्लेखनीय आहेत. श्री. माटे यांची 'प्रेम कीं लौकिक' ही कादंबरी आत्मचरित्रपर आहे. अर्थात् सांगूनसवरून ही कादंबरी असल्यामुळें हिच्यांतील नेमका चरित्रपर भाग कोणता आणि काल्पनिक कोणता तें कळणें कठीण झालें आहे.

श्री. वि. दा. सावरकर यांच्या 'माझी जन्मठेप' या ग्रंथांत त्यांच्या कारागृहांतील जीवनाचा वृत्तान्त आला आहे. जन्मठेपीच्या कारागृहांतील स्वतःचें जीवन आणि श्री. सावरकरांसारखा प्रतिभाशाली लेखक! त्यामुळें या ग्रंथांतील वर्णनें वाचून ज्याचें हृदय थरारलें नसेल, त्याला 'स वै मुक्तोऽथवा पशुः' असेंच म्हणावें लागेल. कारावासांतील कष्टावह भीषण परिस्थिति आणि अशा परिस्थितींत आपलें स्वत्व राखून दिवस कंठणारा मराठा वीर! कोणा मराठ्याचें अंतःकरण हें पुस्तक वाचतांना कळवळणार नाहीं?

श्री. न. चिं. केळकरांचा 'गतगोष्टी' अर्थात् 'माझी जीवन-यात्रा' हा ग्रंथ आत्मचरित्रांमध्यें पहिल्या श्रेणींत बसेल. केळकरांचें जीवन! यामुळें या आत्म-चरित्रांत 'आत्म'पदाचा परिघ विस्तृत असल्यामुळें या कालखंडांतील अनेक घडामोडींचें वर्णन आलें आहे. आणि त्या घडामोडींत श्री. केळकरांचें कर्तृत्व नेमकें किती याची आपणांस पुरी कल्पना येते; आणि या ग्रंथांत लौकिक जगांत वावरणारे केळकर आणि घरांत वावरणारे केळकर यांचीहि आपणांस ओळख होते; म्हणूनच हा ग्रंथ नांवाजावयाचा! नाहीं तर लौकिकां-तले केळकर आमच्या परिचयाचे होते. आमची इच्छा घरांत वागणाऱ्या केळकरांशीं आपली ओळख व्हावी अशी, आणि ती या ग्रंथानें बहुतांशीं पुरी झाली असें मानावयास अडचण नाहीं.

यानंतर मराठींतील एका अनन्यसाधारण ग्रंथाचा उल्लेख करावयाचा आहे. हा ग्रंथ म्हणजे श्रीमती लक्ष्मीबाई टिळकांनीं लिहिलेलीं 'स्मृतिचित्रें'.

या ग्रंथांतील ऋजुता, खेळकरपणा आणि घराऊ भाषा केवळ अनुपम आहे. दुःखें सोसतांना ज्यांनीं सोशिक वृत्ति दाखविली त्यांनीं दुःखें संपल्यावर त्यांचें खेळकर मनमोकळेपणानें वर्णन करावें हें साहजिक आहे. छिद्रान्वेषी निंदकाला उणें दिसूं नये म्हणून या चरित्रांत कोठेंहि धावदोरा घालण्याचा किंवा चरित्रपट तेवढ्यापुरता तुरपून मुरडून घेऊन टीप घालण्याचा प्रयत्न केलेला दिसत नाहीं. या स्मृतिचित्रांत प्रामाणिकपणानें पराकोटि गाठली आहे. मराठी भाषेंत 'आमच्या आयुष्यांतील आठवणी', 'डॉ. आनंदीबाई यांचें चरित्र' आणि 'स्मृतिचित्रें' हे तीन स्त्रियांनीं लिहिलेले तीन ग्रंथ म्हणजे तंत्र न पढलेल्या स्त्रिया किती अत्युत्तम लिहूं शकतात याचा बिनतोड पुरावा आहे.

श्री. पांगारकर यांच्या 'चरित्रचंद्रा'त आत्मगौरव जरा अधिक झाला आहे. नटवर्य बोडसांच्या 'माझी भूमिका' या ग्रंथांतहि आत्मश्लाघेचा थोडा दर्प मारतो. एरवीं या ग्रंथांत कृतकृत्यतेची, समाधानाची वृत्ति चांगली उमटली आहे.

एकूण मराठी भाषेंत आत्मचरित्रें पुष्कळशीं नसलीं तरी, आहेत तीं टाकाऊ नाहींत. कांहीं तर उत्कृष्टच आहेत. वस्तुतः आत्मचरित्र लिहिणें हें मोठें बिकट आहे. आत्मचरित्र लिहितांना लेखकाला स्वतःची माहिती पुरेपूर असते एवढेंच काय तें; एरवीं अडचणीच अधिक. स्वतःसंबंधीं अपवादभूत लिहवत नाहीं आणि आत्मश्लाघा वाचकांना रुचत नाहीं. स्वत्वाची जाणीव विसरणें हें सोपें नाहीं; आणि स्वत्वाची जाणीव तर कलेला विघातक असते. ज्याला आपल्याशीं तात्पुरता का होईना पण दुजाभाव कल्पून अगदीं तिऱ्हाइताच्या तटस्थवृत्तीनें स्वतःच्या जीवनाचें परीक्षण-निरीक्षण करून आपला जीवनपट उलगडून दाखवितां येईल त्यालाच आत्मचरित्र चांगलें लिहितां येईल. परंतु ही तिऱ्हाइताची तटस्थवृत्ति अगदीं थोड्या लोकांना साधते. म्हणूनच यशस्वी, लोकप्रिय आत्मचरित्रें अगदीं थोडीं असतात.

चरित्रें काय किंवा आत्मचरित्रें काय, लोकांना आवडतात याचें कारण उघड आहे. जीवनाविषयीं प्रत्येकास कुतूहल असतें. जीवनाचा आपण गंभीरपणें विचार करतों. तारुण्य, प्रेम, आशा, निराशा, प्रयत्न, आकांक्षा या गोष्टी मानवसाधारण आहेत. वेगवेगळ्या परिस्थितीचा वेगवेगळा वेष

धारण केलेला असला तरी, इथून तिथून मानवी मन एकच आहे; त्यामुळें कोणाचेंहि चरित्र वाचलें तरी त्यांत मानवी मनाचें चरित्र असल्यामुळें आपणांस त्याविषयीं आपुलकी वाटते, समाधान वाटतें, आपली सहानुभूति विस्तारते, आणि चरित्र असेल त्याप्रमाणें वेगवेगळ्या वृत्ति उदित होतात. निर्भेळ कलादृष्टीनें अगदीं सामान्य व्यक्तीचें चरित्र लिहिलें असलें तरी, तें कादंबरीपेक्षां आकर्षक व्हावयास पाहिजे. कारण त्यांत खरीच वास्तवता असते आणि केव्हां केव्हां तर कल्पितापेक्षां वास्तवघटनाच अधिक विचित्र असतात. एकूण वाङ्मयांत चरित्रशाखेला मोठें महत्त्व आहे. आणि मराठी वाङ्मयांतील चरित्रशाखा पल्लवित होऊन पानोपानीं फुलांनीं अगदीं डवरलेली नसली तरी ती वठलेली, सुकलेली नाहीं. एवढेंच नव्हे तर तरारूं, फोफावूं लागलेली आहे; आणि 'हेंही नसे थोडकें.'*

---

* हा निबंध लिहितांना 'अर्वाचीन मराठी साहित्य' यांतील प्रा. बनहट्टी यांचा 'चरित्र-वाङ्मय' हा प्रबंध आणि Harold Nicolson यांचा 'The Development of English Biography' हा ग्रंथ यांचा उपयोग केला आहे.

# आदर्श पुस्तकालयें

लेखकः—त्रिं. दि. वाकनीस

आजच्या आपल्या नाशिक शहरांतील सार्वजनिक वाचनालयाच्या शंभराव्या वाढदिवसाच्या प्रसंगीं आपण मला बोलावून माझें जें सन्मानपूर्वक स्वागत केलेंत त्यानें मला व्यक्तिशः अपूर्व धन्यता वाटत आहे व त्याचबरोबर स्वतःच्या पात्रतेविषयींच्या शंकेनें थोडी धाकधुक वाटत आहे. तथापि, बडोदें संस्थानांतील पुस्तकालयांच्या संचालनाचा अनुभव गेलीं ७ वर्षें ज्या पूज्यस्मृतीच्या पुण्यश्लोक नृपतीनें मला मिळविण्याची सुसंधि दिली, त्या कै. सयाजीराव महाराजसाहेबांच्या स्फूर्तिदायक स्मरणानें मला धाकधुकीपेक्षां धीर, उत्साह आनंद व अभिमानच जास्त वाटत आहे. माझ्या व्याख्यानाच्या विषयाबद्दल आस्था असणाऱ्या व बडोद्याच्या श्रीमंत सरकारांप्रमाणेंच पुस्तकालयांची प्रगति घडवून आणण्याची प्रखर इच्छा बाळगणाऱ्या आपल्यासारख्या श्रोत्यांच्या समागमानें तर माझा उत्साह व आनंद दुणावतच आहे. आजचा सुयोग घडवून आणणाऱ्यांचा मी अत्यंत आभारी आहे.

तथापि, या उपकारक मंडळींत ज्या एका व्यक्तीचा मी समावेश करूं शकत नाहीं तिचा स्पष्ट उल्लेख, गैरसमज उरूं नये म्हणून, करतों आहे. बडोद्याच्या एका निवृत्त ग्रंथपालांनीं 'विविधवृत्तां'त एक स्वयंस्फूर्तीनें लेख लिहिला आहे. परमार्थापेक्षां त्यांत परिहासच जास्त आहे असें मला वाटतें. त्या लेखांत त्यांनीं असें लिहिलें आहे, कीं वाचनालयांच्यां शतसांवत्सरिक उत्सवाचे अध्यक्ष कोणी ग्रंथपालच असले पाहिजेत. वीर सावरकर किंवा दे. भ. केळकर यांच्यासारखे मिरासदार अध्यक्ष काय म्हणून यावेत ? कृपा करून आपली मिरासदारी ते सोडतील काय? मला वाटतें 'ब्रँडीच्या बाटलीं'त आम्हांस चान्स द्या म्हणून जी मागणी चगारामानें श्रीकृष्णाजवळ केली त्यापैकींच ही सूचना आहे. अवास्तव विनयानें मी मला स्वतःला किंवा माझ्या सहकारी मित्रांना गौणत्व देऊं इच्छीत नाहीं. पण वस्तुस्थिति अशी आहे कीं

पुस्तकालयांचें कार्य समाजाची बौद्धिक, नैतिक व सांस्कृतिक उंची वाढविणें हें आहे. तें कार्य ज्या लोकोत्तर पुढाऱ्यांनीं प्रत्यक्षपणें कायावाचामनें-करून केलें आहे त्यांना आजच्यासारख्या समारंभाचें अध्यक्षत्व साहजिकपणें जातें. ग्रंथपालांचे पुस्तकालयद्वारा केलेलें काम किती झालें तरी अप्रत्यक्षच समजलें पाहिजे. रूपकांत बोलावयाचें म्हणजे ग्रंथपाल हे पाण्याचे नळ आहेत. धरणाचें पाणी ते घरोघर पोंचवितात हें खरें; पण धरणच नसलें तर पोकळ नळांची प्रतिष्ठा ती कितपत ?

ह्यापेक्षां मोठ्या प्रस्तावानें मी आपणांस आज शिणवूं इच्छीत नाहीं. कारण आपण सांगितलेंत त्यापेक्षां जास्त काम मीं स्वतःवर ओढवून घेतलें आहे. निदानपक्षीं असें म्हणावयास मला व्याकरणाचा पाठिंबा मिळत आहे. आपण मला "आदर्श पुस्तकालय" या विषयावर बोलावयास सांगितलेंत. मीं एकवचनाचें अनेकवचन करून "आदर्श पुस्तकालयें" या विषयावर बोलण्याचें योजिलें आहे. सकृद्दर्शनीं आपणांस असें भासल्याविना राहणार नाहीं, कीं आदर्शत्व व अनेकत्व या दोन कल्पनांत विसंवादच नव्हे, तर विरोधहि आहे. एका जातीची एकच आदर्श वस्तु होऊं शकेल. सर्व चांगल्या गुणांचा तींत समावेश केला म्हणजे अन्यत्र आदर्शपणा राहीलच कसा ? या न्यायानें आदर्श पुस्तकालय म्हणजे ज्या पुस्तकालयांतून सर्व वैगुण्यें काढून टाकलीं आहेत, वाचकांना व व्यवस्थापकांना जें पुस्तकालय अडचणी भासूंच देत नाहीं व सर्व सुखसोई प्राप्त करून देतें तें पुस्तकालय, व तें आजच्या व्याख्यानाचा विषय. तेव्हां उगीच एकाचें अनेकवचन करून तर्कदुष्टता पदरीं घेण्याचा खटाटोप करण्याची आवश्यकता काय ? आपण असा प्रश्न विचारलात म्हणजे मला धूर्त आंधळ्या भिकाऱ्याच्या गोष्टीची आठवण होते. शंकरानें त्यास प्रसन्न होउन एक वर मागण्यास परवानगी दिली. त्यानें वर मागितला कीं, 'नातवांच्या डोक्यावर मला राजवैभव पाहूं दे.' म्हणजे एका वरांत त्यानें संतति, संपत्ति, दृष्टि इत्यादि अनेक वर मागून घेतले. त्याचप्रमाणें आपण सांगितलेलें हें आदर्श पुस्तकालय हें अनेक प्रकारच्या पुस्तकालयांचें मिळून झालें असल्यामुळें भोळ्या शंकराप्रमाणें मला आज एकाचें अनेकवचन करावें लागलें आहे.

पण या झालेल्या प्रकारानें मला वाईट वाटत आहे असें बिलकुल नाहीं; किंवा आपल्यालाहि आपला आदर्श विभागून गेला या गोष्टीनें विषाद मानण्याचें कारण त्यानें मिळतें आहे असेंहि मला वाटत नाहीं. कारण आदर्शाच्या केंद्रीकरणापेक्षां त्याचें विभक्तीकरण हेंच मृत्युलोकीं सुखासमाधानाला कारणीभूत होतें, असें प्रत्ययास येतें. सर्व सौंदर्य एकवटलेलें पाहण्याच्या इच्छेनें परमेश्वर तिलोत्तमा निर्माण करतो, पण मर्त्यलोकीं पुरुषागणिक स्त्रीसौंदर्याचे आदर्श विभक्त व भिन्न राहतात, म्हणूनच समाजस्वास्थ्य व स्थैर्य टिकूं शकतें !

या भरंवशानें आजच्या विषयाकडे आपण पाहूं लागलों तर आपणांस असें आढळतें कीं, आदर्श पुस्तकालयांच्या परंपरेंत सामान्यतः राष्ट्रीय पुस्तकालयें, विश्वविद्यालयीन व विद्वन्मान्य पुस्तकालयें, व्यापारी व औद्योगिक पुस्तकालयें, शहर सार्वजनिक व ग्राम सार्वजनिक पुस्तकालयें, फिरतीं व भाड्याचीं पुस्तकालयें या संस्थांचा समावेश होतो. आजच्या समारंभाच्या संदर्भानें या परंपरेंतील शहर सार्वजनिक पुस्तकालय या संस्थेचा आपणांस विशेष विचार केला पाहिजे हें उघड आहे. तथापि तसा विचार करण्यापूर्वी शहर पुस्तकालयाशीं संलग्न असलेल्या इतर घटक संस्थांच्या ध्येयावर व धोरणावर आपणांस निदान एक धावती नजर टाकली पाहिजे. त्यामुळें आपल्या संस्थेची पार्श्वभूमि समजावयास आपणांस मदत होईल.

राष्ट्रीय पुस्तकालय म्हणून राष्ट्रभाषेंतील सर्व ग्रंथ संग्रहित करून ठेवणारें पुस्तकालय हें सरकारीच असतें असें नव्हे. ब्रिटिश म्यूझियम हें सरकारी नाहीं; एका बोर्ड ऑफ ट्रस्टनें तें चालविलें आहे. जर्मनींतील डोइश बुशेराय हें लाइपूझिक येथील राष्ट्रीय पुस्तकालय पुस्तक-प्रकाशन संस्थांनीं खाजगी रीतीनें सहकार्य करून चालविलेलें राष्ट्रीय पुस्तकालय आहे. वॉशिंग्टन येथील Library of Congress हें मुख्यतः तेथील विधिमंडळाचें पुस्तकालय आहे. Bibliotheque Nationale हें सर्वस्वीं सरकारी आहे.

सर्वसंग्राहक अशा या राष्ट्रीय पुस्तकालयांत पुस्तकें Copyright कायद्यानें येतात व जतन केलीं जातात. कायदा अशा पुस्तकालयांत पुस्तकें धाडण्याबद्दल जशी प्रकाशकावर सक्ती करतो तशीच सक्ती तो पुस्तकालयांच्या

चालकांवर पुस्तकें जतन करून ठेवण्याबद्दल करतो. यामुळें ज्या ज्या देशांत राष्ट्रीय पुस्तकालयें आहेत तेथें तेथें त्या पुस्तकालयांची सूचि म्हणजे त्या भाषेंतल्या सर्व पुस्तकांची सूचि ठरते. म्हणून अशा पुस्तकालयांतून त्या भाषेंतल्या कोणत्याहि पुस्तकाची माहिती केव्हांहि मिळूं शकते. ही माहिती उपलब्ध करून देण्यासाठीं प्रत्येक पुस्तकालयांत एक माहिती पुरविणारा विभाग ठेवलेला असतो. Auskunfts Bureau or Information Bureau.

ह्या पुस्तकालयांत पुस्तकें नुसतीं संग्रहित केलीं जातात इतकेंच नव्हे, तर तीं जास्तींत जास्त लोकांच्या उपयोगांत यावींत अशी व्यवस्था असते. सामान्यतः या पुस्तकालयांत बसून वाचण्याची व्यवस्था असते. पुस्तकें पुस्तकालयाबाहेर घेऊन जातां येत नाहींत. बाहेर गेल्यावर पुस्तक निश्चित परत येईल ही शाश्वती नसल्यानेंच हा प्रतिबंध ठेवण्यांत येतो. ब्रिटिश म्यूझियममध्यें हा प्रतिबंध इतक्या कडक रीतीनें पाळला जातो कीं, तेथील पुस्तक बाइंडिंगसाठींहि बाहेर जाऊं देत नाहींत. इतर ठिकाणीं इतकी बंदी नाहीं, तरी पुस्तकांच्या शाश्वतीसाठीं राष्ट्रीय पुस्तकालयांतून पुस्तकें व्यक्तींना न देतां संस्थांना देतात व त्या संस्थांमार्फत व्यक्तींस पोंचतीं होतात. अशा रीतीनें राष्ट्रीय पुस्तकालय हें संस्थांतर्गत उसनवारी करणारें एक मोठें पुस्तकालय ठरतें (Head of an Interlending Union). ब्रिटिश म्यूझियम उसनवारी करीत नसल्यानें तें कार्य इंग्लंडांत करण्यास National Cenral Library नांवाची अवघ्या ७-८ वर्षांपूर्वीं नवीन संस्था काढण्यांत आली आहे.

विश्वविद्यालयीन किंवा विद्वान् लोकांच्या सभेचीं जीं पुस्तकालयें तीं महत्त्वाच्या दृष्टीनें राष्ट्रीय पुस्तकालयांची बरोबरी करतात. राष्ट्रभाषेंतील सर्व पुस्तकें एकत्र करण्याचें राष्ट्रीय पुस्तकालयांचें ध्येय, तर या विद्वान् लोकांच्या पुस्तकालयाचें ध्येय. एखाद्या विषयावरील सर्व भाषेंतील पुस्तकादि साहित्य एकत्र करणें. संग्राहकता तीच, फक्त संग्रहाचा दृष्टिकोन बदललेला. अशा पुस्तकालयाविषयीं कॅंब्रिज युनिव्हर्सिटीचे पुस्तकालयाचे अनावरणप्रसंगीं माजी बादशहा पंचम जॉर्ज यांनीं काढलेले उद्गार खरोखर मननीय आहेत. ते म्हणतातः—

" A library such as this is both a power-house and a testing station of educational activities. It inspires and helps the work of specialists in every field of research and it provides from generation to generation standards of truth and sound learning by which the fresh products of science and scholarship are tried. It is a work-shop of new knowledge and a storehouse of seasoned wisdom."

व्यापारी व औद्योगिक पुस्तकालयें हीं खाजगी मालकीचीं असून त्यांचा सामान्य जनतेशीं संबंध येत नाहीं. शहर व ग्राम सार्वजनिक पुस्तकालयें हीं सामान्य जनतेच्या उपयोगाकरतां असतात. तीं म्युनिसिपालिट्या व लोकल बोर्डें ह्यांनीं चालवलेलीं असून मोफत असतात. याचें विवेचन पुढें होणारच आहे.

फिरतीं पुस्तकालयें हीं शहर व ग्राम सार्वजनिक पुस्तकालयांचीं पुस्तिरूप पुस्तकालयें होत. जेथें पुस्तकालयें नाहींत तेथें व जेथें स्थानिक पुस्तकालयांतील पुस्तकें अपुरीं पडतात तेथें हीं पुस्तकालयांची गरज भागवतात. शहर पुस्तकालयें एक मैल दूरपर्यंतच्या नागरिकांची सेवा करूं शकतात. त्यापलीकडे शाखा-पुस्तकालयें उघडून त्या शाखांत फिरत्या पुस्तकालयांच्या मदतीनें पुस्तकें पुरवावीं लागतात. तसेंच १०,००० पेक्षां कमी वस्ती असलेल्या गांवांत स्वतंत्र पुस्तकालय चालूं शकत नाहीं. तेथें फिरत्या पुस्तकालयांनीं ग्रंथवाचन पुरवतां येतें.

भाड्याचीं किंवा वर्गणी-पुस्तकालयें हीं पुनः खाजगी मालकीचीं असतात प्रत्येक पुस्तकाला वाचन-भाडें ठेवणारीं भाड्याचीं पुस्तकालयें व मासिक किंवा वार्षिक वर्गणी घेऊन प्रत्येक वेळेस एक दोन पुस्तकें वर्गणीदारांस देणारीं हीं वर्गणी-पुस्तकालयें.

अशा तऱ्हेनें आपापल्या परीनें जनतेची वाचनभूक शमविणारी ही पुस्तकालयांची सांखळी आहे. प्रत्येक संस्थेचें स्वतंत्र कार्यक्षेत्र आहे व स्वतंत्र साधनसामुग्री आहे. पण त्यांच्या संकलित कार्यानेंच आदर्श सेवा घडत आहे.

आज आपणांस सार्वजानिक पुस्तकालयें हा भागच प्रस्तुत असल्यानें त्याचा जास्त विस्तारानें विचार केला पाहिजे.

सार्वजनिक पुस्तकालय या संस्थेस फार मोठा इतिहास नाहीं. जास्तींत जास्त १०० वर्षांची पूर्वपीठिका त्यास आहे, असें म्हणतां येईल. प्राचीन पुस्तकालयें हीं सर्व जनतेच्या उपयोगासाठीं निर्माण झालीं नव्हतीं. वेद-कालीं ग्रंथच नव्हते; मग ग्रंथालयें तरी कशी असणार? इ. सनापूर्वी ८८ सालीं सीलोनमध्यें बौद्ध धर्मग्रंथ लिहून काढण्यास सुरुवात झाली. त्यानंतर इ. सनाच्या पांचव्या व सातव्या शतकांत हिंदुस्थानांत पुस्तकालयें असल्याचा उल्लेख चिनी प्रवाशांच्या वर्णनांत आढळतो. हीं पुस्तकालयें— ज्याला आपण विश्वविद्यालयीन पुस्तकालयें म्हणूं— अशीं होतीं. तक्षशिला, नालंद, बनारस, पाटलिपुत्र, विक्रमशिला वगैरे ठिकाणीं हीं वसलीं होतीं. त्यानंतर ११ व्या शतकांतील चालुक्य परगण्यांतील राय नारायण राजाचा मुख्य प्रधान व सेनापति मधुसूदन यानें दक्षिणेंत वाडीजवळ २५२ विद्यार्थ्यांची सोय होईल असें नगई येथील देवालयांत पुस्तकालय स्थापिल्याचा उल्लेख एका कानडी शिलालेखांत आढळतो. त्यानंतर जे पुस्तकालयांचे उल्लेख आढळतात ते राजांच्या खाजगी पुस्तकालयांचे आहेत. १२ व्या शतकांतील भोजराजा, खिलजी घराण्यांतील अमीर खुश्रु यांस ग्रंथपाल म्हणून नेमणारा जलाउद्दीन बादशहा, तघलख घराण्यांतील नगरकोट येथें संस्कृत पुस्तकालय स्थापणारा फिरोजशहा, अहमदनगरला पुस्तकालय स्थापणारा बहामनी राजा, मोंगलांपैकीं बाबर व अकबर या बादशहांचें पुस्तकालयांच्या इतिहासांत नांव येतें. तथापि सार्वजनिक पुस्तकालयाची कल्पना इंग्रजी अमदानींतीलच म्हणावी लागते. सार्वजनिक पुस्तकालयांत सर्वांच्या समानतेची जी भूमिका गृहीत धरली आहे ती लोकशाहीच्या तत्त्वाबरोबर आपल्याकडे येणें अपरिहार्य होतें. पाश्चात्य देशांतूनहि सार्वजनिक पुस्तकालयांचा उदय हा गेल्या १०० वर्षांतलाच आहे. इंग्लंडमध्यें पहिला Public Library Act सन १८५० च्या सुमारास झाला. गतवर्षी अहमदनगरास सार्वजनिक वाचयालयाचा १०० वा वाढ-दिवस साजरा झाला व यंदा नाशकास आपण आपल्या वाचनालयाचा साजरा करीत आहोंत. सामान्य जनतेच्या उपयोगीं तें सार्वजनिक अशा अर्थानें आपल्या वाचनालयास सार्वजानिक असें सार्थतेनें म्हणतां येईल; पण सर्वांना

फुकट वाचन मिळवून देणारे जें पुस्तकालय तें सार्वजनिक पुस्तकालय असा जो रूढ अर्थ आहे त्या अर्थानें आपल्या नाशिक सार्वजनिक वाचनालयाचें वर्गीकरण वर्गणी-पुस्तकालय अथवा Subscription Library असेंच करावें लागेल; व मग बडोद्यास ३० वर्षांपूर्वी स्थापन झालेल्या मध्यवर्ती पुस्तकालयासच हिंदुस्थानांतलें पहिलें सार्वजनिक पुस्तकालय म्हणावें लागेल.

एवंच, सार्वजनिक पुस्तकालय या संस्थेस फार इतिहास नाहीं असें आपण पाहूं शकतों. पण इतिहास नसला म्हणून भविष्य नाहीं असें मात्र समजण्याचें कारण नाहीं. लोकशाही स्थापन व्हावयास शिक्षित जनतेची जरूरी आहे व जनता शिक्षित व्हावी हा हेतु Literacy Campaign म्हणजे साक्षरता-प्रचार व त्याला पूरक असलेली Adult Education Movement म्हणजे प्रौढशिक्षणाची चळवळ सर्व लोकनेते देशभर पसरविण्याची खटपट करीत आहेत. ह्या चळवळीचें प्रमुख साधन पुस्तकालयें आहे व तीं शहर, ग्राम, सार्वजनिक व फिरतीं या स्वरूपांतच जास्तींत जास्त मदद्रूप होणार आहेत. तेव्हां अशा प्रसंगीं आजच्यासारख्या समारंभाचा उपयोग करून घेऊन आपण शहर सार्वजनिक पुस्तकालयाच्या कार्याविषयीं चर्चेचा उपन्यास करीत आहांत हें देशकालपरिस्थितीच्या दृष्टीनें अत्यंत अनुरूप आहे.

सार्वजनिक पुस्तकालयाचें ध्येय काय असावें हें मागें दोनदां सांगितलें; पण ध्येयाचा पुनरुच्चार केल्यानें कांहीं बिघडत नसल्यानें मी तिसऱ्यांदां म्हणतों कीं, सार्वजनिक पुस्तकालयाचें अंतिम ध्येय समाजाची सांस्कृतिक कक्षा उन्नत करणें हें आहे. हें अंतिम ध्येय साध्य करतांना सार्वजनिक पुस्तकालयाचीं साधनें कशीं वापरावींत ह्या महत्त्वाच्या मुद्द्याकडे आपणांस आतां वळलें पाहिजे.

सर्व पुस्तकालयांचीं साधनें मदनाच्या बाणाइतकीं म्हणजे पांच असतात. ( १ ) पुस्तकें, ( २ ) पुस्तकालयें, ( ३ ) ग्रंथपाल, ( ४ ) वाचक व ( ५ ) पैसे हीं होत. हाताच्या बोटांप्रमाणें आपापल्यापरी प्रत्येक महत्त्वाचें आहे. फक्त विवेचनाच्या सौकर्यासाठीं एकेकाचा विचार केला पाहिजे.

प्रथम ह्या सर्व साधनांना गतिमान करणाऱ्या पैसा या साधनाचा विचार करूं.

हिंदुस्थानांतील सार्वजनिक पुस्तकालयांच्या जमाखर्चाच्या तक्त्यांकडे पाहिलें तर आपणांस काय दिसतें? जमेच्या बाजूस वर्गणीची रक्कम, देणगी, व्याज किंवा भाडें व म्युनिसिपॅलिटीची मदत. या सर्वांची बेरीज १,००० ते २,००० रुपयेपर्यंत असावयाची. एक लाख वस्तीच्या शहरांत अशीं वर्गणी पुस्तकालयें २–३ आहेत असें धरून चाललें तरी, एकंदर पुस्तकालया-वर केलेला खर्च ६,००० रुपयांच्यावर जात नाहीं. म्हणजे माणशीं प्रतिवर्षी एक आण्यापेक्षां कमी खर्च होत आहे. खेडेगांवांतून पुस्तकालयेंच नसल्यानें तेथें अर्थातच कांहीं खर्च होत नाहीं.

बडोदे संस्थानांतील दोन-तीन शहरें व खेडेगांवचे आंकडे असे येतील:—

| | | | |
|---|---|---|---|
| बडोदे शहर | वस्ती १ लाख | पुस्तकालयाचा वार्षिक खर्च | रु. ५०,००० |
| पेटलाद | १९,००० | ” | १,५०० |
| डभोई | १५,००० | ” | १,७०० |
| विलोदरा | २,८०० | ” | १९० |
| वेमार | १,००० | ” | १९० |

म्हणजे बडोदे शहरांत माणशीं ८ आणे, पेटलाद व डभोईस अनुक्रमें रु. ०-१-३ व रु. ०-१-९ व खेडेगांवांतून रु. ०-१-१ व रु. ०-३-०.

इंग्लंडमध्यें सरसकट माणशीं २ शिलिंग म्हणजे रु. १-८-० खर्च होतो व शहरांतून कित्येक वेळां त्याहून बराच जास्त होत असतो. तरी ग्रंथपालांना वाटतें कीं, यापेक्षां जास्त सेवा, जास्त खर्च केल्यास पुस्तकालयें करूं शकतील.

इंग्लंडमधील राहणी-खर्च येथील खर्चापेक्षां चौपटीनें जास्त आहे असें धरलें तरी इंग्लंडांत पुस्तकालयांवर केलेल्या खर्चाचे आंकडे हिंदुस्थानांत केलेल्या खर्चाच्या आंकड्यांपेक्षां बरेच मोठे आहेत. याचें एक मुख्य कारण असें आहे कीं इंग्लंडांत पुस्तकालयांवर खर्चण्याचा पैसा म्युनिसिपॅलिट्या घरपट्टी किंवा ड्रेनेजपट्टीप्रमाणें सक्तीनें सर्व नागरिकांपासून जमा करतात. तेथें वर्गणी देणाऱ्यांच्या मर्जीवर कांहीं अवलंबून राहत नाहीं. मुलकी खात्यांतलें जसें Subsoil चें धोरण असतें त्याप्रमाणें हें पुस्तकालयां-च्या पट्टीचें धोरण असतें. पुस्तकालय तुमच्या उपयोगासाठीं उघडें आहे.

मर्जी असल्यास उपयोग करा, नसल्यास करूं नका, पण त उघडें आहे; तुम्हांस सोय करून दिली आहे. त्याबद्दल पट्टीचे पैसे भरून टाका, अशी म्युनिसिपॅलिटीची नागरिकांस हाकाटी असते. आपल्याकडे म्युनिसिपॅलिटी व लायब्ररी यांचें कित्येक शहरीं जणूं वैर असतें. म्युनिसिपॅलिट्या पुस्तकालयांना मदत करण्याचें साफ नाकारतात. स्वतः पुस्तकालयें चालविण्याची गोष्टच बाजूला ठेवतात. बडोदे संस्थानांतहि हाच प्रकार चालू आहे. नुसत्या वर्गण्या, देणग्या किंवा व्याज उभें करून पुस्तकालयांचें उत्पन्न वाढण्याची आशा करणें व्यर्थ आहे.

दुसरें साधन पुस्तकांचें. पुस्तकांशिवाय पुस्तकालय चालवूं पाहणें म्हणजे पिठाशिवाय भाकरी करावयास बसण्यासारखें आहे. पुस्तकालयांत पुस्तकें हवींत, पण कोणतीं पुस्तकें संग्रहावींत हा महत्त्वाचा प्रश्न आहे. कारण मनुष्याच्या चेहऱ्यावरून जशी त्याच्या स्वभावाची चांचणीपरीक्षा होते तशी ग्रंथसंग्रहावरून पुस्तकालयाची प्राथमिक कसोटी होते. यामुळें कोणत्याहि पुस्तकालयांत पुस्तक-पसंतीच्या कामास मूलग्राही महत्त्व असतें. सार्वजनिक पुस्तकालयांतला ग्रंथसंग्रह करतांना काय अवधानें बाळगलीं पाहिजेत तें आपण पाहूं. काय करतां कामा नये हें पाहिल्यानें काय करावयास पाहिजे त्याचा बोध होईलसें वाटतें.

सार्वजनिक पुस्तकालयांत पुस्तकांची दाटी होतां कामा नये. निवड करायची दगदग टाळण्यासाठीं कोणी म्हणेल कीं, सर्वच पुस्तकें घ्या म्हणजे झालें; तर तें सार्वजनिक पुस्तकालयांस हानिकारक ठरतें. जागा व पैसे यांचा अपव्यय होतो हें तर खरेंच; पण त्याहूनहि जास्त मोठा तोटा हा होतो कीं, वाचक, हें वाचूं कीं तें वाचूं अशा विचारानें भांबावून जाऊन वाचन-प्रवण होण्याऐवजीं विन्मुखच होतो. एखाद्या विषयावरील सर्व पुस्तकें ठेवण्याचें काम विद्यालयीन किंवा विद्वन्मान्य पुस्तकालयाचें; एखाद्या भाषेंतील सर्व पुस्तकें ठेवण्याचें काम राष्ट्रीय पुस्तकालयाचें; त्या दोहोंहून भिन्न असा निवडक ग्रंथांचा समुच्चय ठेवण्याचें काम सार्वजनिक पुस्तकालयांचें. फ्रेंच लोकांची एक म्हण लक्षांत ठेवण्यासारखी आहे. 'अति कमी इतकेंच अति जास्त वाईट आहे' अशी ती म्हण आहे. आतां हिंदुस्थानांत

इंग्रजी पुस्तकांबद्दलच हा प्रश्न उद्‌भवेल; कारण एखाद्या विषयावर देशी भाषेंत मुबलक पुस्तकें झालीं आहेत अशा इष्टापत्तीची वार्ता अजून ऐकिवांत नाहीं. तथापि आज जो इंग्रजी पुस्तकांबद्दल तोच पुढें मागें देशी भाषांनाहि प्रश्न लागू होईल. म्हणून सामान्यपणें असें धोरण ठरवावयास हरकत नाहीं कीं, सार्वजनिक पुस्तकालयांसाठीं एखाद्या विषयावर पुस्तकांची निवड करण्याची वेळ आली तर या पुस्तकांचे चार वर्ग पाडावेत:—(१) प्राथमिक, (२) मध्यम, (३) गहन व (४) कोशरूप. वर्ग १ व ४ ह्यांस तात्काल स्वीकारावें व वर्ग २ व ३ ह्यांना मागणीच्या प्रमाणांत आंत येऊं द्यावें.

सार्वजनिक पुस्तकालयांत भराभर पुस्तकें घेण्याचा मोह जसा आवरला पाहिजे तसा Standard Books म्हणजे प्रमाणभूत ग्रंथ सर्वच्या सर्व असले पाहिजेत ह्या आग्रहापासून ग्रंथाधिकाऱ्यांनीं दूर राहिलें पाहिजे. पुस्तकालयशास्त्र ज्या ज्या देशांत प्रगल्भावस्थेंत पोंहोंचलें आहे तेथें तेथें अशा प्रमाणग्रंथांच्या याद्या सारख्या प्रसिद्ध होत असतात. अमेरिकेंत एच्. डब्ल्यू. विल्सन कंपनीच्या Standard Catalogue for Public Libraries ह्या पुस्तकाच्या सुरवंटाच्या विणीसारख्या आवृत्ति निघत असतात. अशा याद्यांचें अंध अनुकरण केल्यास पुस्तकांच्या निवडींत जिवंतपणा राहत नाहीं. एखाद्या श्रीमंत माणसानें शोभेसाठीं सुंदर सोनेरी अक्षरें असलेल्या चामड्याच्या पाठीची एकफर्मी पुस्तकें कांचेच्या कपाटांत ठेवून जो बोजडपणा यावयाचा तोच बोजडपणा प्रमाणग्रंथांच्या याद्यांवरून बनविलेल्या सार्वजनिक पुस्तकालयांत येईल.

तिसऱ्याहि एका कारणानें तें जडत्व येण्यासारखें आहे; व तें कारण म्हणजे ग्रंथकार, प्रकाशक व पुस्तकविक्रेते ह्यांच्या निवड करणाऱ्या मंडळीवरील भिडीचें होय. ग्रंथपालाचा स्नेही किंवा पुस्तकपसंदगी-समितीच्या सदस्याचा स्नेही जर एखाद्या गचाळ पुस्तकाबद्दल भीड घालूं लागला, तर ती भीड मोडणें हें पुस्तकालयाच्या कार्यक्षमतेच्या दृष्टीनें अतिशय जरूरीचें आहे.

ग्रंथसंग्रह अनाकर्षक होण्याचें आणखी एक प्रबल कारण असें होतें कीं, ग्रंथाची निवड करणारा अधिकारीवर्ग पुष्कळ दिवस तोच तो कायम राहिला

तर त्यांतील व्यक्तीच्या आवडी-नावडी संग्रहांत स्पष्टपणें उमटूं लागतात. वास्तविक सार्वजनिक पुस्तकालयांत सर्व विषयांना मुक्तद्वार असावयास पाहिजे. म्हणून निवड करणारा अधिकारीवर्ग वारंवार बदलून घ्यावयास हवा.

ग्रंथसंग्रहास मलीनता आणणारें ह्या सर्वापेक्षां बलवत्तर कारण म्हणजे बांधणी. देशी भाषांतील पुस्तकांची बांधणी किती कमजोर असते ! त्यामुळें चारपांच वेळां वाचकांकडे जाऊन आलेलीं पुस्तकें चाळिशी उलटून गेलेल्या म्हाताऱ्या-प्रमाणें कशीं दिसतात हें नव्यानें सांगावयास नको. सार्वजनिक वाचनालय जुन्या बाजारांतल्या पुस्तकांच्या दुकानासारखें दिसावयास लागलें कीं त्याची आकर्षकता कमी होते. म्हणून एक तर जुनीं पुस्तकें भराभर कमी करावयास हवींत; अथवा ठेवावयाचीं असतील तर त्यांना सुचक स्वरूपांत ठेविलीं पाहिजेत. सार्वजनिक पुस्तकालयांत जुनीं पुस्तकें काढून टाकण्यांत बिलकुल संकोच करण्याचें कारण नाहीं. कारण संग्रह करण्याचें त्या संस्थेचें काम नव्हे. तें काम राष्ट्रीय पुस्तकालयें करीत राहतात. सार्वजनिक पुस्तकालयांत जितकीं जास्त पुस्तकें जास्त वाचकांकडे जातील तितकी त्याची कार्यक्षमता अधिक समजली जाते. आधुनिक पेढी जशी ज्या प्रमाणांत ती पैशांची जास्त देवघेव करील तशी अधिक कार्यक्षम समजली जाईल, तसें सार्वजनिक पुस्तकालय संग्रहाच्या संख्येपेक्षां दिल्या-घेतल्या पुस्तकांच्या संख्येनें कमी-अधिक कार्यक्षम मानलें जाईल. अर्थात् जुनें पुस्तक जिवंत जिव्हाळ्याचें असेल तर नव्या आवृत्तींत अवतार घेईलच व पुस्तकालयांत आपली जागा टिकवून ठेवील. सार्वजनिक पुस्तकालयांत एकाच बाबतींत संग्रह अवश्य व जरूरीचा आहे. ती बाबत म्हणजे स्थानिक संग्रह होय. पुस्तकालयाच्या गांवांत प्रसिद्ध झालेलीं सर्व पुस्तकें, स्थानिक ग्रंथकारांचीं सर्व पुस्तकें, तेथील वर्तमानपत्रें, मासिकें व जमल्यास महत्त्वाचीं हस्तलिखितें सार्वजनिक पुस्तकालयानें अवश्य संग्रह करून ठेविलीं पाहिजेत; कारण त्यांच्या संग्रहानें पुस्तकालयाविषयीं स्थानिक लोकांमध्यें आपुलकीचा भाव निर्माण होतो. पण या स्थानिक संग्रहाशिवाय इतर कोणताहि संग्रह करण्याच्या भानगडींत सार्वजनिक पुस्तकालयानें पडतां कामा नये.

या सर्व अकरणरूपी आदेशानंतर एक करणरूपी आदेश ध्यानांत ठेवण्यासारखा आहे तो मि. वेलार्ड यानें आपल्या Book-Selection या

अतिसुंदर विवरणात्मक ग्रंथांत दिला आहे. तो म्हणतो कीं, पुस्तकपसंती आणि पुस्तकाचें वाङ्मयीन मूल्यमापन या दोन अगदीं भिन्न वस्तु आहेत. पहिली वाचकसापेक्ष आहे, दुसरी नाहीं. तेव्हां पुस्तक पसंत करतांना त्याचा पुस्तकालयाचा वाचकांशीं मनांत मेळ घालूनच निर्णय करावा.

पुस्तकसंग्रहावरून पुस्तकालयाच्या इमारतीकडे वळूं या. सार्वजनिक पुस्तकालयांत पुढें दर्शविलेल्या विभागांचा समावेश होतो: (१) देवघेवीचा खंड, (२) नियतकालिक-खंड, (३) अध्ययन-खंड, (४) संग्रह-खंड, (५) बांधणी-विभाग, (६) व्यवस्थापक-खंड, (७) व्याख्यान-विभाग, (८) प्रदर्शन-विभाग, (९) बालविभाग व (१०) महिलाविभाग वगैरे.

सार्वजनिक पुस्तकालयाची जागा शहराच्या किंवा गांवच्या लोकवस्तीच्या मध्यभागीं असावी, कीं त्यामुळें सर्वांस त्याचा सारखा सुलभतेनें उपयोग करतां येईल व लहान मुलें व स्त्रिया यांनाहि तेथें केव्हांहि जाणें बिनधोक राहील. मध्यवस्तींत असूनहि रस्त्याच्या रहदारीहून पुस्तकालयाची इमारत दूर असावी. म्हणजे धूळ व गोंगाट ह्यांपासून वाचकांचें संरक्षण होईल. इंग्लंडमध्यें पुष्कळशा शहरांतून Town Hall मध्येंच शहर पुस्तकालयें वसलीं आहेत. न्यूयॉर्कचें सार्वजनिक पुस्तकालय ५ वा ॲव्हेन्यू व ४२ वा रस्ता यांचे संगमावर म्हणजे न्यूयॉर्क शहराच्या अगदीं मध्यावर वसलेलें आहे. पुस्तकालयाचा बाह्य देखावा नाटकगृहासारखा भपकेबाज नसला तरी आकर्षक असावयास कांहींच हरकत नाहीं. पाश्चात्य देशांत पुष्कळशा पुस्तकालयांचे दर्शनी भाग ग्रीक स्तंभ व पायऱ्यांनीं सुशोभित केलेले असतात. त्यासंबंधानें एका चोखंदळ वाचकानें अशी टीका केली होती, “या तुमच्या पायऱ्या शोभिवंत खऱ्या; पण आम्हां वाचकांचे पाय त्या काय म्हणून दर वेळेस दुखविणार? तालमीच्या आखाड्यांना योग्य अशा या पायऱ्या आमच्या डोक्याची तपासणी करण्याऐवजीं पायाची तपासणी करून आम्हांस पुस्तकालयांत येऊं देतात हा कोठला विपरीत न्याय ?”

देवघेवीचा खंड संग्रह-खंडाला जोडलेला असावा, म्हणजे पुस्तकें नेण्या-आणण्याला वाचकांना फार हिंडावें लागणार नाहीं व देवघेवीच्या खंडांतले

व्यवस्था ठेवणारे अधिकारी संग्रहखंडांतील वाचकावर सामान्य नजर ठेवूं शकतील. देवघेवखंडांतून संग्रहखंडांत जाण्याचें जेथें दार असेल तेथें पुस्तकालयाच्या सर्व Catalogues च्या पेट्या ठेवाव्यात. संग्रह-खंड मुक्तद्वार पद्धतीचा असावा, कीं जेणेंकरून वाचकांस हवें-नको तें पुस्तक स्वतःचें स्वतःला पाहून घेतां येईल, अधिकारीवर्गाचा वेळ वांचेल, व वाचकाला इतस्ततः हिंडून आपोआप इतर पुस्तकांची माहिती होईल. पुस्तकें अव्यवस्थित होतील हें खरें; पण वाचकांस मिळणाऱ्या शिक्षणाच्या दृष्टीनें अधिकाऱ्यांनीं व्यवस्था ठेवण्याचे पुनःपुन्हा श्रम करावयास पाहिजेत. मुक्तद्वार किंवा नादारपद्धतीनें पुस्तकांच्या आयुष्यावरहि हितकारक परिणाम होतो. पुस्तकांना नादार फळ्यावर ठेविल्यानें हवा, उजेड मिळून तीं ताजीं राहतात असा आमचा बडोद्याचा अनुभव आहे.

नियतकालिकांची जागा तळमजल्यावरच दरवाजाशीं असावी. कारण तेथील वाचकांची सारखी जा ये सुरू असते. इतर खंडांतील वाचकांना त्यांचा उपद्रव होण्याचा संभव असतो. पाश्चात्य देशांत या नियतकालिकखंडाचें महत्त्व कमी कमी होत आहे. कारण वर्तमानपत्रें वाचावयास सार्वजनिक पैसा खर्च करणें बरोबर नाहीं असें पुष्कळांचें मत होत चाललें आहे. भारदस्त साप्ताहिकें, मासिकें, द्वैमासिकें वगैरे तेथून काढून अध्ययनखंडांत ठेवण्याची पद्धत पुष्कळच पुस्तकालयांतून अमलांत आलेली आहे. प्रो. फडक्यांनीं रत्नागिरीस वर्तमानपत्रांवर केलेल्या टीकेप्रमाणें खरोखरीच का त्यांचा बौद्धिक दर्जा इतका कमी झाला आहे, कीं त्यांचें पुस्तकालयांतून उच्चाटन करण्यापर्यंत कांहीं लोकांची मजल जावी?

अध्ययन-खंड हा संग्रहखंडाच्या दुसऱ्या टोकाला जोडलेला असावा. एका टोकास देवघेवीचा खंड असतो व त्यांत निवान्तपणें बसून वाचण्याची सोय असावी. वाचायला घरींच बसलों आहे असें वाचकास वाटावें, इतकी तेथें पुस्तकालयाच्या चालकांची कमी रहदारी असावी. एका इंग्रजी बाईनें असें म्हटलें होतें कीं, 'ज्ञान मिळवीत असतां मजकडे कोणी पाहिलें कीं मला इतका राग येतो कीं, जणूं काय त्यानें मी अंग पुसून स्नानगृहाच्या बाहेर येण्या-पूर्वींच स्नानगृहाचें दार उघडलें आहे!' इतक्या थराची निवान्त जागा जरी

देतां आली नाहीं, तरी जा-ये जवळजवळ नसलेली व बसावयास चांगल्या बैठकीनें समृद्ध असलेली अशीच जागा अध्ययनखंडास निवडली पाहिजे. फिलॅडेल्फिया येथील सार्वजनिक पुस्तकालयांत असल्या निवान्त खोल्यांची सोय एकाद्या क्लबमधील सोईनाहि लाजवील अशी आहे.

व्याख्यानें व प्रदर्शनें हीं नित्याचीं नसलीं तरी, सार्वजनिक पुस्तकालयाचीं नैमित्तिक कार्यें खास आहेत व त्यासाठीं जागा ठेवणें जरूरीचें आहे. त्याचप्रमाणें लहान मुलें व स्त्रिया यांना स्वतंत्र विभाग असला म्हणजे तीं तेथें निःसंकोचपणें येऊन पुस्तकालयाचा लाभ घेऊं शकतात. बडोद्यांतील मध्यवर्ती पुस्तकालयांतील बालविभाग हिंदुस्थानांत अजोड आहे. कारण असें आहे कीं, बडोदे संस्थानाशिवाय इतरत्र सक्तीच्या व मोफत प्राथमिक शिक्षणाचा फैलाव कोठेंच नाहीं. प्राथमिक शाळांतून २-४ वर्षें सक्तीनें दिलेलें शिक्षण टिकवून ठेवावयास वाचन चालू ठेवणें अगदीं अवश्य होतें. बडोदे सरकार तर असें स्पष्ट म्हणतें कीं, प्राथमिक शिक्षणावर केलेला खर्च बुडवावयाचा नसेल, तर वाचनालयें चालू ठेविलींच पाहिजेत. जेथें स्वतंत्र बाल-पुस्तकालयें काढण्यासारखी सवड नसेल तेथें शहर सार्वजनिक पुस्तकालयानें एक बाल-विभाग अवश्य ठेवला पाहिजे.

संग्रहखंड कसा असावा हें सांगण्याऐवजीं आमच्या मध्यवर्ती पुस्तकालयाच्या संग्रहखंडाचें वर्णन करतों म्हणजे कार्यभाग होईल. कारण जगांतल्या पहिल्या पांचदहा पुस्तकालयांतच असे संग्रहखंड आहेत.

आमचा हा खंड सन १९३२ सालीं सुमारें एक लाख रुपये खर्च करून बांधण्यांत आला. त्यांत सुमारें एक लक्ष वीस हजार पुस्तकें ठेवण्याची सोय आहे. त्याची बांधणी पूर्व-पश्चिम आहे. लांबी ६५ फूट व रुंदी ३४ फूट आहे. खंडाच्या दोन मजल्यांपैकीं तळमजला १५ फूट व वरचा १८ फूट उंचीचा आहे. प्रत्येक मजल्याला प्रत्येकीं ७ फूट उंचीचे दोन पोटमजले आहेत. तळमजल्याची जमीन दगडी असून बाकीच्या तिन्ही पोटमजल्यांची कांचेची आहे. संग्रहखंडाच्या बाहेर आलेल्या लोखंडी जिन्यानें वाचकांना वाटेल त्या पोटमजल्यांत प्रवेश करतां येतो. एकाच बाजूनें दरवाजे असल्यामुळें हे दरवाजे बंद केल्याबरोबर खंडांत शिरकाव

होण्यास दुसरा मार्गच उरत नाहीं. शिवाय त्यास आगीचेंहि भय नाहीं; कारण आंतील पुस्तकांशिवाय दुसरा जळाऊ पदार्थच वापरण्यांत आला नाहीं. पुस्तकें पोलादी घोड्यांवरील खणांत उघडीं ठेवलेलीं असतात. त्या घोड्यांना मंद हिरवट रंग दिला आहे. खंडाच्या मधोमध ४ फूट रुंदीचा मार्ग मोकळा ठेवलेला असून, त्याच्या दोन्ही बाजूंस पुस्तकें ठेवण्यासाठीं घोडे ओळीनें मांडण्यांत आलेले आहेत. दोन घोड्यांमधील अंतर ४ फूट आहे. अशा लोखंडी घोड्यांच्या १० रांगा असून, प्रत्येक रांगेंत ८ घोडे आहेत. प्रत्येक घोड्यास दोन्ही बाजूला ३ फूट लांब व ९ ते १२ इंच रुंद असे खण आहेत. खणांची उंची पुस्तकांच्या उंचीप्रमाणें कमीजास्त करतां येते. पूर्व व पश्चिम दिशांच्या भिंतींना लावून ठेवलेल्या घोड्यांना मात्र एकाच बाजूस खण आहेत. दक्षिणोत्तर भिंतींना प्रत्येकीं ३ फूट ३ इंच रुंदीच्या १० खिडक्या आहेत. जमिनीपासून २ फुटांवर सुरुवात होऊन १० फुटांपर्यंत त्यांची उंची गेलेली आहे. पश्चिमेकडील भिंतीच्या मध्यभागीं देखील अशीच एक उंच खिडकी आहे. पूर्वेकडील भिंतींत प्रत्येक पोटमजल्यास ३ याप्रमाणें एकंदर १२ दरवाजे आहेत. मधील दरवाजांस दोन सरकदारें असून बाजूच्या दरवाजांना एकच सरकदार आहे. हीं दारें २ फूट ११ इंच रुंद व ५ फूट ८ इंच उंचीचीं आहेत. खंडांत कृत्रिम प्रकाशाची नेहमींच जरूर भासत नसली, तरी मधील मोकळ्या भागांत विद्युत्-प्रकाशाची जरूर ती सोय करून ठेविली आहे.

संग्रहस्थानाशिवायच्या इतर विभागांची लांबीरुंदी काय असावी, त्यांत कोणत्या तऱ्हेचें सामान ठेवावें, शहराच्या किंवा गांवच्या लोकवस्तीच्या प्रमाणांत किती वाचकांची कोणकोणत्या खंडांत कशी सोय करावयास पाहिजे याचा विचार करूं म्हटलें तर एखादें पुस्तक होईल. आजच तें काम करून टाकण्याची माझी इच्छा नाहीं. कारण तें आपणांस कंटाळवाणें होईल. आपणांस अत्यंत मनोरंजक रीतीनें ती माहिती मिळवावयाची असेल तर B. M. Headicar कृत A Manual of Library Organization हें पुस्तक वाचल्यानें मिळेल अशी एक tip म्हणजे गुप्त खूण सांगून ठेवतों.

सार्वजनिक पुस्तकालयाचे ग्रंथपाल सुशिक्षित असले पाहिजेत व त्यांना ग्रंथांची आवड असली पाहिजे हें सांगावयाससुद्धां नको; पण सुशिक्षितपणा ह्या शब्दाची थोडी फोड करावयास हवी. विश्वविद्यालयाच्या दोन तीन

वाङ्मय अधिक चटकदार, चुरचुरीत आणि चविष्ट केलें; आणि बहुजन-समाजाला वर्तमानपत्रें वाचण्याची चटक लाविली. राजकारण हा कांहीं केवळ गंभीर चर्चेचाच विषय नाहीं; त्यालाहि एक विनोदाची बाजू असते हें प्रथम अच्युतरावांच्या 'संदेश'नें लोकांना सांगितलें. राजकारणाबरोबर इतर विषयांची चर्चा करण्याची पद्धत अच्युतरावांनीं सुरू केली. 'वत्सला वहिनी'च्या पत्रांनीं मराठी निबंध-वाङ्मयांत एका नवीन प्रकाराची भर घातली आहे असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं. अच्युतरावांची कल्पकता खरोखर अपूर्व होती. त्यामुळें त्यांच्या निबंधांत जितकें वैचित्र्य आढळतें तितकें इतर कोणाच्याहि निबंधांत आढळणार नाहीं. 'जिजा, तूं का रडतीस', 'नाटक झालें जन्माचें', 'हे तात्या आणि हे तात्या', 'द्रौपदी वस्त्रहरण', 'पुणेरी जोडे', 'खुडबुड्या जोशी', 'बंगालचा गुलाब', 'बायकोचे दागिने', 'शेम शेम पुराण', 'प्राणनाथ, काय आज्ञा आहे?', 'हजामती कां करतां', 'माधवाश्रमांत शिवाजी' इत्यादि लेख अच्युतरावांच्या कल्पकतेचे कागदी पुरावेच होत.

एकदां माधवाश्रमांत शिवाजी अचानक रीतीनें प्रकट झाला. त्यामुळें "प्रथमतः घाटी लोक फार घाबरले. कुणाला वाटलें कीं, हा आतां पुन्हा आपल्याला लढाईवर घेऊन जाणार! आपण कसे सुखानें भांडीं घाशीत व गिरण्या फिरवीत बसलेलों आहों! आतां ह्या भांडीं घासण्याच्या सुखाला व गिरण्यांतल्या सुखकर काबाड-कष्टांना आम्ही मुकणार! आतां आमच्या बायकांच्या मजुऱ्या व 'खानावळी' बंद होणार!" कांहीं मराठे म्हणाले कीं, "आम्ही नुकतेच शिवस्मारकाची लढाई खेळत आलेलें आहोंत— पण हा शिवाजी म्हणणार कीं, ही लढाई हवी कशाला?... आतां हा शिवाजी आमच्यांतलीं सगळीं भांडणें बंद करणार व आम्हांला आपल्या पाठीमागें ओढणार! आतां आम्हीं भांडावें कशासाठीं?... शिवाजी आल्यामुळें इतिहासकारांचीं तोंडें अगदीं गोरींमोरीं झालीं. त्यांना भय वाटलें कीं आतां हा मारवाडी विद्यालयांत लेक्चर देणार व घडलेलें सर्व सांगत सुटणार! ह्या इतिहासकारांना खरा खरा इतिहास नको होता. त्यांना स्वतःचे सिद्धान्त जगापुढें आणावयाचे होते... शिवाजी माधवाश्रमांत आला हें समजल्याबरोबर बँकांवर रश झाला. वॉरलोनचे भाव एकदम उतरले. त्यांतहि कांहीं लोकांनीं अशी बातमी उठविली कीं, सरकारचें कर्ज नाकबूल करण्याचा ठराव शिवाजी प्रथम

हातांत घेणार आहे. त्यामुळें तर जो तो येईल त्या भावानें वॉरबाँड विकीत सुटला. माधवाश्रमांत शिवाजी उतरला, त्याच सुमारास इकडे जमनादास मेहता यांच्या पोटांत कळ उठली... त्यांच्या मुद्रेवरून हें स्पष्ट दिसत होतें कीं, आपल्याला कौन्सिलांत कोण जाऊं देणार, ह्याची त्यांना चिंता पडलेली होती. 'तुरुगांचे दारांत' नाटक पाहत असतां मला जी डुलकी आली त्या अवधींत हें सगळें स्वप्न मला पडलें होतें. मी जागा होऊन पाहतों तों पडदा पडला व जाग्रण न होतां मी घरीं निजायला गेलों."

वरील उताऱ्यावरून अच्युतरावांच्या विशिष्ट लेखनपद्धतीविषयीं चांगली अटकळ बांधितां येईल. अच्युतरावांची भाषाशैली वर्तमानपत्री वळणाची आहे. चटकदारपणा हा त्यांचा मुख्य गुण. सैल वाक्यरचना, पुनरुक्ति आणि क्वचित् थिल्लर विनोद हे दोष वगळल्यास त्यांचे निबंध कल्पकता, ओघ, सहजसुंदरता, आणि ढंगदारपणा इत्यादि गुणांमुळें पुनः पुन्हा वाचावेसे वाटतात.

शिवरामपंत परांजपे आणि अच्युतराव कोल्हटकर यांचें निबंधवाङ्मयांतील स्थान उच्च आणि वैशिष्ट्यपूर्ण आहे यांत शंकाच नाहीं. परंतु मराठी वाङ्मयांत निबंधकार म्हणून अग्रपूजेचा मान साहित्याचार्य रा. नरसिंह चिंतामण केळकर यांसच दिला पाहिजे. आदर्श निबंधकाराच्या ठिकाणीं आवश्यक असलेले सर्व गुण केळकर यांच्या ठिकाणीं अहमहमिकेनें वास करीत असलेले दिसतात. दीर्घ व्यासंग, विस्तृत वाचन, विचारांतील प्रगल्भता आणि प्रगमनशीलता व त्यामुळें प्राप्त झालेला अद्ययावत्पणा, अभिजात रसिकता, मार्मिक आणि सूक्ष्म विनोद, मनाचा समतोलपणा, राजकारणाशीं प्रत्यक्ष परिचय, परदेशचा प्रवास, नवीन गोष्टी जाणून घेण्याची लालसा आणि लेखनाची अनिवार हौस यांमुळें तात्यासाहेबांचें निबंध-वाङ्मय जितकें विपुल तितकेंच वैदग्ध्यपूर्ण झालें आहे. सतारीची एक तार छेडिली असतां तिच्या इतर तारा सहसंवेदनेनें कंपित होऊन सुराला सूर देतात, त्याचप्रमाणें एखाद्या कल्पनेनें केळकरांच्या बुद्धीची एक तार छेडिली गेली कीं, मग त्यांच्या कल्पक आणि विशाल बुद्धींतून उपमा-दृष्टांताचा केवळ पाऊस पडूं लागतो. केळकरांच्याइतकें वाचन इतरांनीं केलें नसेल असें नाहीं; परंतु आपण केलेल्या वाचनाचा हुकमी आणि योग्य ठिकाणीं उपयोग करून घेण्यांत केळकरांइतका वाकबगार लेखक

क्वचितच आढळेल. उमाजी नाइकाचें नांव घेतांच रॉबिनहूड प्रभृति सर्व पाश्चात्य दरोडेखोरांची मालिका त्यांच्या मनश्चक्षूंपुढें उभी राहते. माझिनी व ग्यारिबाल्डी या गुरुशिष्यांचें वर्णन करतांना रामदास व शिवाजी या जोडीची त्यांस आठवण होते. ते इकडील शंकराचार्यांवर लिहूं लागले कीं, युरोपांतील पोपमहाराजांना आमंत्रण गेलेंच म्हणून समजावें. 'भविष्यकथन' असें शीर्षक असलेला केळकरांचा लेख पाहिला म्हणजे, जगाच्या इतिहासांतर्लीं भूतकालांत वर्तविण्यांत आलेलीं सर्व भविष्यें आतां आपणास वाचावयास मिळतील असें भविष्य वाचकानें खुशाल वर्तवावें; तें खोटें ठरण्याचा बिलकुल संभव नाहीं. दिल्ली-दरबारावर लेख लिहितांना हास्तिनापुरांतील पुरुवंशीय राजांपासून तों तहत् पंचम जॉर्ज बादशहापर्यंत विस्तीर्ण काळाचा ऐतिहासिक चित्रपट काढून वाचकांस सादर करणें हें फक्त केळकरांच्या विद्वत्तेस व कल्पकतेसच शक्य आहे. केळकरांच्या बुद्धीचा हा विशेष लक्षांत घेतला म्हणजे बडोदें येथें भरलेल्या दहाव्या साहित्यसंमेलनप्रसंगीं अध्यक्ष या नात्यानें भाषण करतांना त्यांनीं वाङ्मयाची व्याख्या 'खरी सविकल्प समाधि उत्पन्न करूं शकते तें वाङ्मय' अशी कां केली त्याचा उलगडा होतो.

"ग्रंथसंग्रहालयाच्या निंदकांना दुसरेहि कित्येक आक्षेप सकारण घेतां येण्यासारखे असतात. पुस्तकी ज्ञान म्हणजे खरें ज्ञान नव्हे व व्यवहारचातुर्य तर नव्हेच नव्हे. एरवीं पढतमूर्ख हें नांव देऊन ज्या वर्गाचें वर्णन समर्थांनीं दासबोधांत केलें आहे, तो वर्ग कोठून आला? "नांदे चित्तीं शांति ऐसी विद्या काशाला" या मराठी सुभाषितावरून, ग्रंथपरिशीलनाचा सुपरिणाम हटकून होतोच असें नाहीं असें लोकमत पूर्वापार दिसतें. विद्या नसतांना ज्यांच्या अंगीं पिशाचवृत्ति असते ते विद्या शिकतील व त्यांच्या अंगीं विनय न येईल तर ते ब्रह्मसमंधाप्रमाणें जाज्वल्य व भयंकर होतील! तसेंच खऱ्या बहुश्रुतपणानें मनास जी शीतलता यावी ती नुसत्या पढिकपणानें येतेंच असें नाहीं; व खऱ्या विद्वत्तेच्या अभावीं विद्वत्तेचा अहंकार मात्र उत्पन्न होतो. भाराभर पुस्तकें डोळ्यांसमोर असलीं म्हणजे हें वाचूं का तें वाचूं असें होऊन बुद्धि फाटते; अनिश्चितपणा वाढतो आणि वाचनाच्या अभावीं स्वयंभू बुद्धिमत्तेला एकाग्रतेची जोड मिळून जें काम मनुष्याच्या हातून एरवीं झालें असतें तेंहि कित्येक वेळां पढिक मनुष्याच्या हातून होत नाहीं.

फाजील ग्रंथाभ्यासानें मनाला दुबळेपणा येतो याचें समर्पक उदाहरण प्राचीन ग्रीक लोकांनीं दाखवून दिलें आहे. विद्वत्ता आणि पारतंत्र्य यांचें विलक्षण साहचर्य ग्रीक लोकांइतकें दुसऱ्या कोणत्याहि राष्ट्रांत आढळणें कठीण. पुस्तकें वाचून वाचून त्यांनीं आपलें स्वातंत्र्य गमाविलें आणि जोंपर्यंत पुस्तकें वाचीत राहतील तोंपर्यंत ते असेच पारतंत्र्य भोगतील असें पुष्कळांनीं भाकीतहि केलें होतें ! ”

वरील उताऱ्यावरून केळकरांच्या निबंधलेखनपद्धतीची थोडीबहुत कल्पना येईल. या ठिकाणीं लक्षांत एवढेंच ठेवावयाचें कीं, वरील उताऱ्यांत वाचनापासून होणाऱ्या नुकसानाचें वर्णन केलें आहे; परंतु विस्तृत वाचनाचे सुपरिणाम सांगावयाचे असल्यास, खुद्द केळकर यांच्या निबंधवाङ्मयाकडेच अंगुलिनिर्देश करावयास हरकत नाहीं. ना. गो. चापेकर यांच्या निबंधांत स्वतंत्र-विचारसरणी आढळून येते. वा. म. जोशी यांचे प्रबंधांत तत्त्वजिज्ञासा आणि चिकित्सकपणा यांमुळें एक विशिष्ट प्रकारचें विचारसौंदर्य प्रतीत होतें. त्यांच्या ‘नवपुष्पकरंडक’ या पुस्तकांतील निबंधांचें स्वरूप मात्र त्यांच्या इतर प्रबंधांहून अगदीं वेगळें आहे. त्यांत विनोद आणि विचार यांचें सुंदर मिश्रण पाहावयास मिळतें. पांगारकरांचे निबंध प्रायः धार्मिक स्वरूपाचे आहेत. प्रो. कर्वे यांच्या समाज-स्वास्थांतील निबंधांचाहि या ठिकाणीं उल्लेख करावयास हरकत नाहीं.

अजूनपर्यंत आपण मराठींतील निबंधवाङ्मयाचा धावता आढावा घेतला त्यांत कोणी लघुनिबंध लिहिलेले आढळून येत नाहींत. परंतु अलीकडे लघुकथे-प्रमाणें लघुनिबंध लिहिण्याचा प्रघात विशेष पडला असून, त्याचें कांहीं विशिष्ट तंत्रहि अस्तित्वांत आलें आहे. प्रबंधांत संशोधन किंवा तत्त्वजिज्ञासा प्रमुख धरली, तर निबंधांत कोणत्याहि विषयावरील विचार मनोरंजक पद्धतीनें मांडलेले असावे अशी अपेक्षा करण्यांत येते. तथापि प्रबंध काय किंवा निबंध काय दोघांतील हेतु एकच असतो आणि तो म्हणजे ज्ञानसंवर्धन किंवा लोक-शिक्षण; परंतु लघुनिबंधांत आनंद किंवा मनोरंजन याना प्राधान्य देण्यांत आलेलें असतें. लघुनिबंधांतहि तत्त्वजिज्ञासा केलेली आढळते; परंतु ती करण्याच्या चटकदार पद्धतीवरच त्याची यशस्विता अवलंबून असते. अगदीं साधे विषय किंवा व्यवहारांतील साधे प्रसंग हे लघुनिबंधकाराला आपले

विशिष्ट विचार प्रदर्शित करावयाला पुरेसे होतात. जीविताकडे पाहण्याचा विशिष्ट दृष्टिकोन असल्यास त्याच्या लघुनिबंधांना त्याच्या खेळकरपणांतहि एक प्रकारचा भारदस्तपणा येतो. लघुनिबंधांत लेखकाच्या व्यक्तित्वाचा ठसा ठसठशीतपणें उमटलेला दिसला पाहिजे.

प्रो. फडके यांच्या 'नव्या गुजगोष्टी' या लघुनिबंध-संग्रहांतले नुसते मथळे वाचिले तरी लघुनिबंधांचें स्वरूप तात्काळ लक्षांत येतें. 'पोरखेळ', 'अंधारी रात्र', 'जागेपणचीं स्वप्नें', 'आरसे-महाल', 'घरकुलांतलीं दुःखें', 'पहिला पांढरा केस', 'वाट चुकल्याचा आनंद', 'ताजा कलम', 'पहांटे उठण्याचा वेडेपणा' हे मथळे पाहतांच इतक्या साध्या विषयासंबंधानें लेखकाला म्हणायचें आहे तरी काय, अशी जिज्ञासा उत्पन्न होते आणि ते प्रत्यक्ष वाचून पाहिले म्हणजे इतक्या साध्या गोष्टींतहि लेखकाला एवढा मोठा आशय आढळावा याचें नवल वाटून मनाला आल्हाद होतो.

प्रो. फडके यांच्या लघुनिबंधाचा प्रमुख विशेष म्हणजे त्यांत व्यक्त होणारा त्यांचा मानसशास्त्रीय दृष्टिकोन आणि जीवन जिवन्तपणें जगण्याची त्यांची अनिवार हौस. 'आंबट द्राक्षें' या लघुनिबंधांत प्रो. फडके लिहितात– 'आपला तो बाळ्या, अन् लोकांचं तें कार्टं' ही म्हण कांहींशी ग्राम्य असली तरी, मनुष्याच्या अंतःकरणांतला हास्यास्पद अहंकार दर्शविण्याच्या दृष्टीनें मोठी मार्मिक नव्हे काय? पण माझ्यासारख्या मानसशास्त्राच्या अभ्यासकाला गमतीची वाटणारी गोष्ट अशी कीं, या अहंकाराला असंतोषाचा एक विचित्र पदर सदा चिकटलेला असतो. एकीकडे मनुष्य अहंकार दाखवीत असतो खरा; पण दुसरीकडे असंतोष माणसाच्या मनाला सारखा खात असतो. जीविताच्या बाजारांत इतरांचे सौदे चांगले जमले अन् आपला मात्र आपल्या योग्यतेप्रमाणें जमला नाहीं असं प्रत्येक माणसाला वाटत असतं...इसापनीतींत 'कोल्हा आणि द्राक्षें' नांवाची जी एक गोष्ट आहे ती मला जेव्हां जेव्हां आठवते, तेव्हां ती थोडीशी चुकलेली आहे असं मला वाटतं. त्या वेड्या कोल्ह्याला वाटत होतं कीं, आपल्या अवाक्याबाहेरचीं तीं द्राक्षं फार गोड असलीं पाहिजेत आणि या भ्रमामुळें हातांतली गोड द्राक्षं खात असतांना त्या कोल्ह्याचा चेहरा मात्र आंबट झाला होता." असा त्या गोष्टीचा शेवट

करावयास पाहिजे. ही इसापनीतींतील गोष्टीला दिलेली कलाटणी किती कलात्मक आहे बरें!

'जागेपणचीं स्वप्नें' या लघुनिबंधांत आपण वर्तमानपत्रांतल्या जाहिराती नेहमीं काळजीपूर्वक कां वाचतों हें सांगतांना प्रो. फडके म्हणतात— " मला राहावयाला मुंबईला जावयाचं नाहीं, कांहीं नाहीं; पण तिथं भाड्यानं द्यायच्या बंगल्यांच्या आणि फ्लॅटस्च्या ज्या जाहिराती टाइम्समध्यें येतात त्या मीं फार आवडीनं वाचतों! चार सहा खोल्यांचा ब्लॉक भाड्यानं द्यायचा असेल तर मीं मनाशी म्हणतों, 'शीः! एवढीशी जागा कशी पुरणार?' जसा कांहीं मी तो ब्लॉक घ्यायला निघालों आहें! हीं पाहा 'कंबाला हिल' वरच्या एका प्रशस्त बंगल्याची जाहिरात आहे! बंगला मोठा आहे, समुद्र इतका जवळ आहे बंगल्यापासून, कीं वाटलं तर दिवसांतून दहा वेळां जाऊन समुद्रांत बुडी मारून यावं...! मला तो बंगला घ्यायचा आहे म्हणतां कीं काय? छे छे! पण त्या बंगल्याची ती जाहिरात मला आवडते खरी. मी ती तीन चारदां तरी पुनः पुन्हा वाचणार. ती वाचून मला आनंद कां होतो, सांगतां येत नाहीं. पण होतो खरा."

असल्या जाहिराती वाचण्यांत आनंद कां होतो तें आपणाला सांगतां येत नाहीं असें प्रो. फडके म्हणतात. त्यावर अर्थातच विश्वास ठेवावयाचा नाहीं. आनंद कां होतों हें त्यांना माहीत आहे. किंबहुना निबंधाच्या शेवटीं त्यांची मानसशास्त्रीय उपपत्तीसुद्धां त्यांनीं लावून दाखविली आहे. यालाच 'कला' म्हणतात. जीवनांतील आनंद लुटण्याविषयींची लालसा हें एक प्रो. फडक्यांचें वैशिष्ट्य आहे असें मीं वर जें म्हटलें आहे त्याचा पुरावा त्यांच्या या 'जागेपणीच्या स्वप्नां'त आढळतो. वर्गांत एखादा सिद्धान्त निरनिराळीं उदाहरणें देऊन विद्यार्थ्यांना नीट समजावून द्यावा, तसा प्रो. फडके यांचे कित्येक लघुनिबंध वाचतांना भास होतो. कदाचित् त्यांनीं पत्करलेल्या पेशाचाहि हा परिणाम असेल.

वि. स. खांडेकर यांनींहि मास्तरकीचा धंदा अनेक वर्षें केला आहे; परंतु ही समजावून देण्याची पंतोजी-पद्धति त्यांच्या लघुनिबंधांत बिलकुल आढळून येत नाहीं. तर आपल्या उत्कट आनंदाचे वाचकांना ते सहसंविभागी बनवितात.

बागेंतील हरतऱ्हेच्या फुलांच्या दरवळलेल्या संमिश्र सुगंधानें मन जसें प्रसन्न होतें, तशा प्रकारचा आनंद खांडेकरांचे लघुनिबंध वाचतांना होतो. उपमा-उत्प्रेक्षांचा पाऊस पडूं लागला म्हणजे बेसावध वाचकांचें मन क्षणभर गोंधळून गेलें तरी, तो गोंधळ सोन्या-चांदीच्या दुकानांत एकदम हजारों प्रकारचे दागिने दृष्टीस पडतांच होणाऱ्या गोंधळाप्रमाणें अंतःकरणांत आनंदाच्यां ऊर्मिच उत्पन्न करतो. एखाद्या घटनेभोंवतीं खांडेकर जेव्हां कल्पनांचा पिंगा घालतात, तेव्हां तर सर्केशींतल्या खेळाडूंच्या मन थरारून सोडणाऱ्या कोलांट उड्यांचीच आठवण होते. काव्यात्मकता, कल्पकता, अलंकारप्रियता, विनोदप्रियता यांमुळें खांडेकरांचे लघुनिबंध वाचतांना रांगोळ्या काढल्या आहेत, उदबत्त्यांचा सुवास दरवळत आहे, चांदीचीं भांडीं आणि ताटें ठेविलीं आहेत, अशा थाटांत स्नेहीमंडळींच्या पंक्तीला बसून पंचपक्वान्नांचें जेवण जेवीत असल्याचा आनंद होतो.

"अलंकारिक भाषेला सरस्वतीच्या दरबारांत फाशीची शिक्षा मिळावी म्हणून या विरुद्ध पक्षाच्या वकिलानें तिच्यावर अनेक आरोप केले. ती रसाचा गळा दाबते, स्वाभाविकपणाचा खून करते, बुद्धीला भटकेपणाची सवय लावते इत्यादि इत्यादि. तिला फाशीं द्यावें; निदान जन्मभर अंधारकोठडींत डांबून ठेवावें अशी न्यायदेवतेला विनंति करतांना तर, त्यांचें लेखन अत्यंत वक्तृत्वपूर्ण झालें होतें. अलंकारिक भाषा ही थंडीनें गोठलेली नदी आहे, तिच्या आंतील पाण्याचा तहानलेल्या प्राण्यांना काडीइतकाहि उपयोग नाहीं! बर्फानें आच्छादिलेला तिचा पृष्ठभाग मोठा सुंदर दिसतो; पण त्याच्यावर फिरणाराचें जीवित सुरक्षित असतें काय? छे, त्याची शंकादेखील नको! कोणत्या वेळेला त्याला जलसमाधि मिळेल याचा नेम नाहीं." त्यांच्या या विस्तृत उपमेचा अर्थ लावण्याच्या नादीं मी लागलों नाहीं. कारण बर्फानें गोठलेल्या पांढऱ्या शुभ्र नदीचें दुसऱ्याच क्षणीं सोनेरी हरिणांत रूपांतर झालेलें दिसलें. अलंकारिक भाषा हा कांचन-मृग आहे, प्रतिभारूपी सीतेला या सोनेरी हरिणाचा मोह पडतो. विचाररूपी राम त्या हरिणाची शिकार करण्याकरितां आश्रम सोडून गेला कीं रावण सीताहरण करतो."

अलंकारिक भाषेचें खांडेकरांनीं केलेलें हें अलंकारिक वर्णन त्यांच्या लेखनपद्धतीचा एक नमुना म्हणून सादर केलें आहे.

माडखोलकरांच्या स्फुट लिखाणांत निबंधापेक्षां परीक्षणें, व्यक्तिचित्रें आणि चर्चात्मक लेख यांचाच भरणा अधिक आहे. परंतु 'स्वैर-विचारां'तील 'उर्वशी', 'नयन-चुंबन', 'अंगराग आणि अनुराग', 'अभिजात', 'प्रतिभा', 'भाववाणी', 'ध्येयवादी' यांसारखे लेख हे निबंधवाङ्मयांत गुरुशुक्रादि नक्षत्रांप्रमाणें आपल्या तेजानें सदैव चमकत राहतील इतकें त्यांचें तेज दिव्य आहे.

" 'उर्वशी' हा शब्द उच्चारतांच किती रम्य कल्पना आपल्या मनांत उभ्या राहतात ! आणि कल्पकतेच्याहि कमनीयतेला लाजवील असेंच खरो-खरी त्या सुरसुन्दरीचें लोकोत्तर चरित्र आहे. आर्ष युगापासून तों आधुनिक युगापर्यंत चंचल काळाच्या बदलत्या छटांवर जर कोणत्या प्रमदेच्या अकरुण सौन्दर्याची अनिर्वचनीय सुषमा पसरली असेल तर ती फक्त उर्वशीच्या; व हिमप्रलयाच्या पूर्वीचें सोमपानाचें उच्छृंखल युग आपल्या संचारानें मंडित करणाऱ्या या सभेंतील नृत्यांगनेच्या विलोल रूपविभ्रमांनीं कविकुलगुरु कालिदासापासून तों कविसम्राट् रवींद्रापर्यंत अनेक मेधावींच्या प्रतिभेला आजवर मोहित केलेलें आहे. वस्तुतः उर्वशी ही कांहीं लक्ष्मीप्रमाणें सागरोर्मी-तून आविर्भूत झालेली नाहीं किंवा पार्वतीप्रमाणें हिमराशींतून प्रकट झालेली नाहीं. जगांतील साऱ्या सुंदर वस्तूंपासून उसनवारी करूनहि विधात्यानें तिला तिलोत्तमेप्रमाणें मोठ्या सायासानें निर्माण केलेली नाहीं. तर इंद्रानें तपोभंग करण्यासाठीं पाठविलेल्या अप्सरांचा तांडा पाहून वैतागलेल्या नारायणा-सारख्या पुराणमुनीनें, एक प्रकारच्या ईर्ष्येच्या भरांत तिला आपल्या तपस्येच्या प्रभावानें उत्पन्न केली."

उर्वशीसंबंधींच्या या वर्णनांत माडखोलकरांच्या लेखनशैलींतील सर्व प्रमुख गुणांचें दर्शन घडतें. मराठी वाङ्मयांत माडखोलकर हे शब्दसृष्टीचे ईश्वर आहेत. भावनांच्या अत्यंत सूक्ष्म छटा शब्दांच्या साहाय्यानें व्यक्त करण्याचें माडखोलकर यांचें सामर्थ्य केवळ अनन्यसाधारण आहे. सरस उपमा, घोसदार वाक्यरचना, ओजस्वी विचारसरणी, काव्यात्मक ध्येयवादित्व आणि चोखंदळ सौंदर्यदृष्टि इत्यादि गुणांमुळें माडखोलकरांचे निबंध अभिजात वाङ्मयाच्या सदरांत सतत गणिले जातील.

अनंत काणेकर यांचे लघुनिबंध अगदीं वेगळया स्वरूपाचे आहेत. आकाशांतून तारा तुटून खालीं पडतांना त्याचें सौंदर्य आणि तेज दृष्टिगोचर होतें न होतें तोंच तो नाहींसा होतो, त्याचप्रमाणें एखाद्या विषयासंबंधानें एखादीच अगदीं नवीन कल्पना मांडून काणेकर निबंध पुरा करितात. त्यामुळें त्यांच्या बहुतेक निबंधांना लघुतम निबंधांचें स्वरूप आलें आहे. केव्हां केव्हां तर या निबंधांना स्फुट विचारांचें स्वरूप आलें आहे. अलंकारिक भाषा, काव्यमय कल्पना, इत्यादि गोष्टींचा पसारा त्यांत बिलकुल आढळणार नाहीं. एखादा प्रसंग वर्णन करून, एकच नवीन कल्पना ठसठशीतपणें मांडणें हेंच त्यांचें ध्येय असतें. परंतु ही नवीन कल्पनाच कित्येकदां मनाला चटका लावून जाते.

निबंधकारांची आणि लघुनिबंधकारांची यादी आणखीहि वाढवितां येण्यासारखी आहे. त्र्यं. शं. शेजवलकर, वि. ल. बर्वे, वि. पां. दांडेकर, गं. भा. निरंतर, शशाङ्क ( वा. मा. दाभाडे ), ना. मा. सन्त, श्री. के. क्षीरसागर इत्यादि लेखकांचे निबंध आणि लघुनिबंध उपेक्षणीय नाहींत याची मला जाणीव आहे; व यांतील कांहींच्या निबंधांचा परामर्श न घेतल्यामुळें त्यांना अन्याय झाला आहे हें देखील मी कबूल करितों. परंतु माझ्या प्रस्तुत लेखाला स्थलकालाच्या मर्यादा पडलेल्या आहेत ही गोष्ट लक्षांत घेऊन ते मला उदार अंतःकरणानें क्षमा करतील अशी आशा प्रदर्शित करून मी हा लेख संपवितों.

---

# स्वातंत्र्यवीर सावरकरांचें भाषण



[ नासिक येथे सार्वजनिक वाचनालयाच्या शतसांवत्सरिक महोत्सवाकरिता अध्यक्ष म्हणून स्वातंत्र्यवीर सावरकर मुद्दाम नासिक येथे आले होते त्या प्रसंगीं ता. १९-१-४१ रोजीं सकाळीं स्वातंत्र्य-कवि गोविंद यांच्या पुतळ्याचें अनावरण व 'प्रदक्षिणा' ग्रंथाचें प्रकाशन त्यांचे हस्तें झालें. त्या वेळचें त्यांचें भाषण अत्यंत ओजस्वी व उद्बोधक झालें. ]

## कवि गोविंदांना स्वातंत्र्यकवि गोविंद म्हणा

आपण सर्वजण कवि गोविंद यांना स्वातंत्र्यशाहीर म्हणतां पण आमच्या मतें, कवि गोविंद यांचें काव्य लक्षांत घेतां, स्वातंत्र्यशाहीर अशी पदवी त्यांना लावणें बरोबर नाही. शाहीर या शब्दांत रस नाही. प्राचीन काळांत मोठमोठ्या राजांच्या पदरीं भाट किंवा चारण असत. पृथ्वीराजाच्या पदरीं असलेला चंद्रभाट आपणास ऐकून माहीत असेल. पृथ्वीराजाच्या पराक्रमावर व तत्कालीन परिस्थितीवर यथातथ्य प्रकाश पाडणारें, एक लक्ष श्लोकांचें काव्य चंद्रभाटाने रचलें आहे. अलीकडे आपण भाट हा शब्द अवास्तव स्तुति करणारा अशा अर्थीं वापरतों; पण तो त्याचा खरा अर्थ नाही. जुना अर्थ लक्षांत घेतला तर, आमच्या मतें आपण कवि गोविंद यांना स्वातंत्र्य-भाट किंवा स्वातंत्र्यकवि असें म्हणणें हेंच सयुक्तिक होईल. कवि गोविंद यांचें शिक्षण फार झालेलें नव्हतें. त्यांना संस्कृत येत नव्हतें. पण त्यांच्या काव्यांतील उत्कृष्ट मराठी शब्दांचें वैपुल्य पाहिलें म्हणजे त्याबाबत त्यांची तुलना कविवर्य मोरोपंत यांच्याशींच करावयास पाहिजे. देशाला स्वातंत्र्य-प्राप्ति कशी होईल ही एकच तळमळ स्वातंत्र्यकवि गोविंद यांना जन्मभर लागली होती. चार-पांच भूपाळ्या केल्या, दोन-तीन पदें केलीं किंवा दहा-पांच संवाद लिहिले की झाला कवि!! पण स्वातंत्र्यकवि गोविंद हे या दर्जाचे कवि नव्हते. त्यांचें काव्य फार उच्च दर्जाचें आहे. 'मुरली' या त्यांच्या

काव्यांतील सौंदर्य आपण पाहाल तर मी काय म्हणतों तें आपणास कळेल. एखादा कुशल रत्नपारखी जसा निवडक रत्नें उचलतो तसें स्वातंत्र्य-कवि गोविंद हे आपल्या काव्यांत उच्च दर्जाचे नि निवडक शब्द गुंफीत. त्यांच्या काव्यांतील प्रत्येक शब्द मौलिक आहे. त्यांच्या काव्याचें संशोधन करण्याची वेळ आता आली आहे. आणि म्हणूनच तरुण पिढीला त्यांच्या काव्याचें महत्त्व अधिकाधिक वाटूं लागलें आहे. स्वातंत्र्य-कवि गोविंद यांचें काव्य तरुण पिढीने अवश्य अभ्यासावें. कवि गोविंद यांच्यासंबंधी कांही आठवणी मीं सांगाव्या असें मला सुचविण्यांत आलें; पण निरनिराळ्या व नवनव्या कामांमुळे आणि वेगवेगळया चळवळींच्या प्रवाहामुळे माझी स्मरण-शक्ति थोडी बुजली आहे. वेगवेगळे प्रवाह वरचेवर वाहत असल्यामुळे खालचा प्रवाह दिसेनासा होतो. महापुराखाली अनेक गावें व शहरें बुडून जावीं तशी माझी स्मृति चालू नव्या प्रवाहाखाली थोडी बुडून गेली आहे.

## विषण्णता नाहीशी करा : स्फूर्ति मिळवा

आजचा हा समारंभ सुखदुःखमिश्रित आहे. आपलें राज्य जाऊन शंभर वर्षें होऊन गेलीं याबद्दल दुःख; आणि आपलें वाचनालय शंभर वर्षें जगून आज त्याचा शतसांवत्सरिक उत्सव करण्याची संधी लाभली याबद्दल आनंद. मी आज पेशव्यांच्या वाड्यांत बसलों आहे. याच ठिकाणीं त्या कालांत किती तरी महत्त्वाचीं खलबतें झालीं असतील. केव्हा कोणत्या स्वारीवर निघावयाचें याचा विचार याच ठिकाणीं पेशव्यांनी केला असेल. पण आता या वाड्यांत काय राहिलें आहे ? तें पूर्वीचें छत गेलें; त्याखाली बसून होणारीं तीं पूर्वीचीं खलबतेंहि गेलीं ! स्वाऱ्यांचे विचार विलीन झाले. आक्रमणाची शक्ति नाहीशी झाली. आज या वाड्यांत चिमण्या चिवचिवत आहेत ! पण ज्यांनी काळाला कलाटणी दिली, जनतेला जुनें वैभव काव्य-रूपाने सांगितलें अशा एका मोठ्या कवीची स्मृति आज आपण येथे जागवीत आहों. वाडा बांधावा धन्यांनी पण त्यांत राहावे चोर, अशी या वाड्याची स्थिति झाली आहे! ही स्थिति पालटविण्याची खटपट अनेक तरुणांनी केली. त्यांपैकी कित्येकांना याच वाड्यांत ३०–३५ वर्षांपूर्वी अनेक प्रकारचे छळ आणि हाल सोसावे लागले. कांहीजणांना जन्मठेप

काळ्यापाण्याची कठोर शिक्षा भोगावी लागली; कांहीजणाना हुतात्मे व्हावें लागलें. पण आज त्यांपैकी जे जिवंत राहिले तेच लोक याच वाड्यांत उजळ माथ्याने येतात इतकेंच नव्हे, तर स्वातंत्र्यकवीचा पुतळा उघडतात. अभिनव-भारतसंस्थेचे कांही लोक आज मला या समारंभांत आलेले दिसत आहेत. तेंच सरकार, तेच पोलीस, म्हणजे तीच राज्यसंस्था, असूनहि आज या पेशव्यांच्या वाड्यांत आपण राजरोसपणें एकत्र झालों. ज्यांनी स्वातंत्र्यासाठी अक्षरशः आपले प्राण खर्ची घातले त्यांचे आत्मे आज या सभागृहांत अदृश्य स्वरूपांत वावरत असतील. त्यांचे नातेवाईक, आप्त, इष्ट-मित्र हे तर आज माझ्यासमोर बसले आहेत. आज पेशवे परत येऊं शकले नाहीत, त्यांचें गेलेलें राज्य आपणाला परत मिळवितां आलें नाही हें खरें; पण आज आपण स्वातंत्र्यकवि गोविंद यांचें स्मारक करून स्वातंत्र्याची स्फूर्ति प्रज्वलित केली व तेवढ्यापुरता तरी आपण आज हा वाडा थोडा शुद्ध केला. आशेला विषण्णतेचें खत मिळालें की आशा सफल होते. आज आपणांस जी विषण्णता वाटत आहे, त्यांतूनच मिळेल तेवढा उत्साह आपण घ्या. असा एक काळ येईल की त्या काळांत आपण स्वराज्यांत असूं आणि पुनरपि याच पेशवे वाड्यांत खलबतें करण्याकरिता एकत्र येऊं.

आजच्या प्रसंगीं मीं साहित्यावर बोलावें अशी अनेकांची इच्छा मला दिसली. पण मुंबई येथे तीन वर्षांपूर्वी भरलेल्या साहित्यसंमेलनाच्या अध्यक्षस्थानावरून मीं जें भाषण केलें तेंच आतापर्यंत शेवटचें ठरलें होतें; कारण त्यानंतर आतापर्यंत मीं साहित्याची पोथी गुंडाळून ठेवली होती. मुंबई-च्या साहित्यसंमेलनप्रसंगीं मीं माझ्या अध्यक्षीय भाषणांत 'लेखण्या मोडा नि बंदुका घ्या' असें सांगितलें, तें ऐकून अनेकांना मोठें चमत्कारिक वाटलें. इतकेंच नव्हे, तर अजून त्यावर महाराष्ट्रांत वादविवाद सुरू आहे. एखाद्याने लग्नसमारंभासाठी यावें आणि त्याने नवऱ्यामुलाला संन्यास केव्हा घेणार असा प्रश्न विचारावा म्हणजे जसें त्याला चमत्कारिक वाटेल, तसेंच साहित्य संमेलनासाठी आलेल्या सरस्वतिभक्तांना, मीं अध्यक्षपदावरून 'लेखण्या टाका आणि बंदुका घ्या', असें सांगितल्यावर जरा चमत्कारिक वाटलें. 'लेखण्या टाका व बंदुका घ्या' हें सूत्र मीं उगीच सांगितलें नाहीं. साहित्या-च्या संरक्षणाकरिताच मीं तें सांगितलें. दहावीस पुस्तकें एकत्र केलीं

की झालें वाचनालय. पण तेवढ्याने भागत नाही. त्या पुस्तकांची योग्य ती व्यवस्था ठेवण्याकरिता एक मंदिर हवें आणि त्याचें रक्षण करण्याकरिता बाहेर पहारेकरीहि हवा. साहित्यमंदिर तयार करणें आणि त्याचें रक्षण करणें याबद्दल जर मीं कांही युक्ति सुचविली किंवा मार्ग सांगितला तर त्यांत विषयांतर तें काय झालें ? ज्या देशांत किंवा ज्या राष्ट्रांत उत्तमोत्तम सैनिक नसतील, ज्या राष्ट्राजवळ पराक्रमी सैनिकबल भरपूर नसेल, तें राष्ट्र तर जातेंच पण त्याचबरोबर त्या राष्ट्राची भाषा, त्या राष्ट्राचें वाङ्मय त्या राष्ट्राची संस्कृति हीहि नामशेष होते. मुसलमान राज्यकर्ते कडवे आणि इंग्रज राज्यकर्ते लुच्चे. मुसलमानांनी आमच्या देशावर आक्रमण करून जो भाग घेतला त्या भागांतील आपलें वाङ्मय, आपले ग्रंथ त्यांनी जाळून टाकले व आपली संस्कृति नाहीशी केली. आज इंग्रज राज्यकर्तेहि तीच गोष्ट, आपणास कळणार नाही इतक्या बेताने, करीत आहेत. ही स्थिति पालटावी, आपणाला आपल्या वाङ्मयाचें, आपल्या भाषेचें व आपल्या संस्कृतीचें संरक्षण करतां यावें यासाठी मी म्हणतों की लेखण्या टाका नि बंदुका घ्या. तक्षशिला, नालंद या विद्यापीठांचें महत्त्व पूर्वी इतकें मोठें समजलें जात असे की, जितकें सध्यां ऑक्सफर्ड-केंब्रिज विद्यापीठांना महत्त्व आहे. त्या काळच्या ज्ञात जगांतील विद्यार्थि विद्याभ्यासासाठीं तक्षशिला विद्यापीठांत येऊन राहत. त्या काळचे जपानी विद्वान् तक्षशिलेच्या दिशेकडे पाहत प्राण सोडीत. अशा या जगन्मान्य तक्षशिला विद्यापीठाचें पुढे काय झालें ? आज त्याचे अवशेष देखील उरले नाहीत. कां असें व्हावें ? या विद्यापीठांतील विद्येचें पीठ कां झालें ? याला कारण एकच व तें म्हणजे त्या विद्यापीठांतील क्षात्रवृत्ति नाहीशी झाली, क्षात्रतेज लयास गेलें हेंच होय. विद्यापीठाचें रक्षण करण्याची ताकद आपणामध्ये राहिली नाही. मुसलमानी राज्य झाल्याबरोबर त्यांनी मोठमोठीं विद्यापीठें जाळून टाकलीं ! तक्षशिला विद्यापीठांतील ग्रंथालय सहा महिने जळत होतें ! इतकी तेथील ग्रंथसंपत्ति मोठी होती. आपल्या जुन्या वाङ्मयाची, जुन्या पुस्तकांची अशी राख कां झाली ? कारण एकच. आपल्यामध्ये त्यांचें रक्षण करण्याची शक्ति उरली नाही म्हणून. सापाच्या दृष्टीने पाहिलें तर मनुष्यप्राण्याला दंश करणें हें पाप ठरणार नाही. पण मला जर तो चावूं लागला तर त्याला ठेचणें यांत मीं तरी पाप कां

समजावें? ज्या विद्वान् पंडितांनी तक्षशिलेसारख्या महान् विद्यापीठांत राजांच्या आश्रयाने विद्याभ्यास चालविला होता, त्यांची सरसहा कत्तल करण्यांत आली! याचेंहि कारण त्यांच्या हातांत बंदुका नव्हत्या, आत्मरक्षणाचें व विद्यापीठाच्या रक्षणाचें सामर्थ्य त्यांच्याजवळ नव्हतें हेंच होय. म्हणून मी म्हणतों की साहित्य आणि शस्त्र यांचा संबंध अगदी निकटचा आहे.

या माझ्या विधनाबद्दल चमत्कार वाटण्याचें मुळींच कारण नाही. आजहि आपली स्थिति तशीच आहे. ज्या सार्वजनिक वाचनालयांत अनेक दुर्मिळ जुने ग्रंथ आपण ठेवतां त्याच वाचंनालयांत आपणाला माझीं किंवा स्वातंत्र्य-कवि गोविंद यांचीं जप्त पुस्तकें, शिवरामपंत परांजपे यांचे काळमधील लेख आपणाला ठेवतां येत नाहीत. याचेंहि कारण हेंच की, असे ग्रंथ ठेवले तरी त्यांचें संरक्षण करण्याचें सामर्थ्य आपल्या अंगीं कोठे आहे? आज आपल्या हातीं बंदुका असत्या, आपल्या बाहूंत बळ असतें, तर जीं पुस्तकें जप्त आहेत तीं आपणाला बंधमुक्त करतां आलीं नसतीं काय? आपल्या लेखणींत इतकेंहि सामर्थ्य नसेल तर तिची किंमत एक मोडका बोरू इतकीच करावी लागेल. आपण जसे पारतंत्र्यांत खितपत पडलों आहों तसेंच आपलें साहित्यहि पारतंत्र्यांत जखडलें गेलें आहे. ही पारतंत्र्याची शृंखला तोडावयाची असेल तर, साहित्याबरोबर संग्रामशक्ति निर्माण करा. कारण आज ती लुप्त झाली आहे. लढाईवर जाऊन विजयी होऊन परत आलेला एखादा साहित्यिक आनंदाने शीळ घालूं लागला, एखादी मौजेची कविता त्याने लिहिली, तर तें क्षम्य होईल; पण लढाई सुरू असतांना जर तो प्रेमकाव्य रचीत बसला तर आपण त्याला काय म्हणाल? आपणावर आलेलें व येणारें संकट कोणतें आहे याचा विचार अगोदर करा, त्याचें निवारण कसें करतां येईल याचा प्रथम विचार करा नि मग कविता लिहीत बसा. कवितांचा आकडा कमी भरला तरी चालेल; पण अगोदर सैनिकशिक्षण घ्या. जो सैनिक नाही तो जातिवंत कविच होऊं शकत नाही. घरांत धान्याचा दाणा नाही, पोरेंबाळें भुकेनें तडफडून मरत आहेत अशा स्थितींत काव्य काय निर्माण होणार आणि तें पोटाची भूक कशी भागवणार! देश पारतंत्र्यांत असतांना कसल्या कविता करता? म्हणून मी म्हणतों कीं कांही काळ लेखण्या

मोडून टाका आणि हातात बंदुका घ्या. जिवंत साहित्य निर्माण व्हावें म्हणून आपण आपल्या हातीं बंदुका घ्या.

स्वातंत्र्यकवि गोविंदांनी 'घे हातीं तरवार, देवा ! घे हातीं तरवार ' असें आपल्या काव्यांत म्हटलें. कवि गोविंदांच्या मनांत 'घे हातीं, तरवार हिंदु ! घे हातीं तरवार' असेंच लिहावयाचें होते पण परिस्थिति आड आली. कवि गोविंदांना आम्ही स्वातंत्र्यकवि कां म्हणतों ? त्यांनी झेंडूच्या फुलांवर, विहार करणाऱ्या पक्ष्यांवर, बागेंत खेळणाऱ्या मुलांवर कविता केल्या म्हणून नव्हे. याचा अर्थ फुलांवर नि मुलांवर मुळीच कविता करूं नयेत असा नाही. झेंडूच्या फुलांवर कविता लिहा पण त्याअगोदर समय कोणता आहे, संकट कोणतें आहे, भोवतालची परिस्थिति काय आहे याकडे पाहा, त्याचा अगोदर विचार करा. घराला आग लागली की, जवळपासचें पाणी आणूनच ती विझवावयास पाहिजे. त्या वेळीं चंद्रावर पाणी किती आहे आणि तें खाली कसें आणतां येईल याचा विचार करीत बसण्यांत काय अर्थ ! स्वातंत्र्यकवि गोविंद हे नुसते कवि नव्हते. तर ते स्वातंत्र्यकवि होते, स्वातंत्र्याचे उपासक होते. आणि म्हणूनच त्यांच्या शब्दांत तेज होतें. मीं सिंहगडचा पोवाडा रचला; पुढे तो जप्त झाला; पण त्या काळांत ज्या माझ्या थोड्या मित्रमंडळींनी तो म्हटला त्या वेळीं त्यांत खरा रस निर्माण होत होता. कारण त्यांच्या अंतःकरणांत स्वातंत्र्याची तळमळ होती. आज तो पोवाडा अनेक लोक गुणगुणतात; पण ती तळमळ आज नष्ट झाल्याने त्याच शब्दांचा तो अर्थ माल लोपल्यासारखा वाटतो. आपल्या आत्म्याचा खरा विकास व्हावयाचा असेल, श्रेष्ठ नि जिवंत साहित्य निर्माण करावयाचें असेल, तर अगोदर क्षात्रतेज निर्माण करा. नॉर्मन लोक इंग्लिश शब्दाचा अर्थ गुलाम असा करीत. पण आज ती स्थिति राहिली नाही. याचें कारण त्यांनी आपल्यामध्ये निर्माण केलेलें क्षात्रतेज. आपली संस्कृत विद्या लुप्त होत चालली आणि सातासमुद्रांपलीकडील इंग्रजी विद्येला मान मिळूं लागला. आपले अनेक प्रभावी कवि मागे पडले पण सातासमुद्रांपलीकडील शेक्सपियर, ग्रे, मिल्टन यांना आपल्या देशांत मान मिळूं लागला, याचें कारण इंग्रजांची वाढलेली सत्ता हेंच होय. नुसत्या नांवाने राष्ट्र वर येत नसतें. राष्ट्र ऊर्जितावस्थेला येण्यास पराक्रम लागत असतो. पराक्रमाने नांवाला महत्त्व येतें. आपण आपल्या पराक्रमाने हिंदु शब्द शिरोधार्य

करून ठेवा. आजच्या समारंभाला आर्यसमाजी मंडळी आली आहेत. त्यांना मला असें सांगावयाचें आहे की त्यांनी येत्या शिरगणतींत आपली जात हिंदु म्हणूनच लावावी.

मीं आपणाला सांगितलेंच की, माझ्या जुन्या आठवणी बुजल्या आहेत. पण ज्या कांही या प्रसंगीं मला आठवतात, त्या चारदोन सांगतों. स्वातंत्र्यकवि गोविंद यांचें शिक्षण बेताचेंच झालें होतें. त्यांना संस्कृतहि येत नव्हतें. त्यांना वृत्त म्हणजे काय हेंहि माहीत नव्हतें. मला देखील लहानपणीं गणवृत्त समजत नसे; पण पुढे मीं त्याचा वृत्तदर्पणावरून व इतरांच्या काव्यावरून अभ्यास केला. कवि गोविंद हे येथून जवळच असलेल्या भागवतांच्या वाड्यांत राहत होते. त्यांनी माझ्याकडून शब्दकोश नेला होता व त्यांतून ते नेमका शब्द उचलून काव्यांत घालीत. इतक्या अल्प सामुग्रीवर त्यांनी काव्य लिहिण्यास प्रारंभ केला व पुढे ते स्वातंत्र्यकवि झाले. या माझ्या सांगण्यांत मी सोनाराला महत्त्व देत नाहीं. हिऱ्याला अधिक महत्त्व देतों. प्रथम कवि गोविंद यांचा संबंध मित्रमेळयाशीं आला. पुढे त्यांतूनच अभिनवभारत ही संस्था निर्माण झाली. तिच्या शाखा शहरोशहरीं निघाल्या. आज महाराष्ट्रांत जीं प्रमुख माणसें आपणांस दिसत आहेत तीं माणसें त्या वेळीं आमच्या अभिनव भारत संस्थेंत होतीं. आमचे सहकारी मित्र आबासाहेब खरे यांना ज्या वेळीं मीं या संस्थेची माहिती दिली त्या वेळीं त्यांना ती मोठी चमत्कारिक वाटली व 'ना विष्णुः पृथ्वीपतिः' असें वचन त्यांनीं मला ऐकविलें. नृप याचा प्रजेचें पालन करणारा असा अर्थ आहे–प्रजा भक्षणारा असा नाही. पृथ्वीपति म्हणजे पृथ्वीचें रक्षण करणारा; नाश करणारा नव्हे. ज्या वेळीं अभिनवभारत संस्थेच्या ध्येयाची कल्पना मीं कै. बाबाराव खरे यांना सांगितली त्या वेळीं त्यांना ती मुळीच पटली नाही. 'ना विष्णुः पृथ्वीपतिः' हें वचन त्यांनी मला उत्तर म्हणून सांगितलें; पण मीं 'न अविष्णुः पृथ्वीपतिः' ही कल्पना त्यांना विशद करून सांगितली आणि या वचनाने त्यांचें इतकें समाधान झालें की 'ना विष्णुः पृथ्वीपतिः' म्हणणारे बाबाराव खरे कट्टे स्वातंत्र्यवादी झाले, नव्हे त्यांना स्वातंत्र्यसंपादनाचें वेड लागलें! स्वातंत्र्य, स्वातंत्र्य-लक्ष्मी हा शब्द प्रथम आम्हीं नाशिक येथेच उच्चारला; आणि मग तो बंगाल्यांत

गेला. बाबाराव खरे हेहि त्या वेळीं मजबरोबर स्वातंत्र्याचा जयजयकार करण्यांत होते. आपणाला मीं सांगितलेंच की, अभिनवभारत संस्था प्रथम येथेच स्थापन झाली. तिच्या संस्थापनेच्या वेळीं ज्यांनी शपथा घेतल्या त्यांपैकी शेकडा ९० जणांनी त्या आजवर पाळल्या आहेत. या शपथेकरिताच श्री. कर्वे, कान्हेरे, चाफेकर, फडके या वीरांनी आत्मबलिदान करून ते हुतात्मे झाले. लाला हरदयाळ, डिंगरा प्रभृतींनी परदेशांत कार्य केलें. आत्मक्लेश, हा विजय नाही. आत्महत्या हा पापी विजय आहे. तो जय नसून पराजय आहे. जो शत्रूची हानि अधिक करतो व स्वतःची हानि कमी होऊं देतो तोच खरा सेनानी. नाशिक हें क्षेत्र आहे. येथे अनेक पुण्यस्थानें आहेत, पण आजच्या प्रसंगाने मी आपणास सांगतों की, ज्या भागवतांच्या वाड्यांत स्वातंत्र्यकवि गोविंद हे राहत होते त्या खोलींत तुम्ही त्यांचें मंदिर बांधा. अशा रीतीने आपण नाशिक क्षेत्रांत यात्रेचें एक नवें ठिकाण निर्माण करा.

मी इंग्लंडमध्ये असतांना ऑक्सफर्ड विद्यापीठांत सुप्रसिद्ध विद्वान प्रो. जयस्वाल हे होते. त्यांना व इतर हिंदी विद्यार्थ्यांना मी कवि गोविंद यांचें काव्य वाचून दाखवीत असें. तें काव्य ऐकून जयस्वाल यांनी कवि गोविंदांना 'स्वातंत्र्य-कवि-कोकिल' अशी बहुमानाची पदवी दिली. त्यानंतर इकडे परत आल्यावर मी अंदमानांत गेलों. त्या काळांत स्वातंत्र्य शब्द उच्चारणेंहि महाकठीण होतें. पण मी अंदमानांतून परत येऊन पाहतों तों रस्तोरस्तीं, बोळाबोळांतून, लहानथोर सर्वजण स्वातंत्र्याचा जयजयकार करीत असलेले दिसले. स्वातंत्र्य-देवी, स्वातंत्र्यलक्ष्मी हा शब्द प्रथम आम्हीं उच्चारला. लो. टिळक जेव्हा प्रथम नाशकास आले त्या वेळीं आम्ही सर्व मुलें स्वातंत्र्यलक्ष्मीचा जयजयकार करीत चाललों होतों. लोकमान्यांना त्याचें मोठें आश्चर्य वाटलें. लो. टिळकांनी जवळच्या मनुष्यास असें विचारलें की, हा शब्द हीं मुलें ओरडतात कशीं ? त्या गृहस्थांनी त्यावर असें उत्तर दिलें की हा शब्द या मंडळींनी पचवला आहे. यावर लोकमान्य म्हणाले मग खुशाल चालूं दे. पण या बाबतींत लोकमान्यांचें मत आम्ही मुलें फार घाई करतों असें होतें, व त्यांच्या दृष्टीने तें योग्य होतें. कारण ते जबाबदार पुढारी होते व मी एक उच्छृंखल सैनिक होतों. स्वातंत्र्यदेवीच्या

उपासनेला सर्वजण लागले. जे उंच होते त्यांनी पूजेकरिता फळें काढलीं जे त्याहून लहान होते त्यांनी फुलें काढलीं. मी लोकमान्यांचा अत्यंत नम्र सेवक आहें. मी त्यांचा एक निःश्वास आहें.

सर्व लहानथोर स्वातंत्र्य-लक्ष्मीचीं उपासक बनलीं खरीं, पण कित्येकांना स्वातंत्र्य आणि स्वराज्य या शब्दांतला फरक कळला नाही. पूजेला पाणी हवें पण तें घेतांना खरें जळ कोणतें आणि मृगजळ कोणतें हें त्यांना समजेना. सर्व लोक खरें जळ सोडून मृगजळाच्या पाठीमागे पाण्यासाठी धावत आहेत. स्वराज्याच्या चळवळींतूनच हिंदु-संघटनाची चळवळ सुरू झाली आहे हें लक्षांत ठेवा. केळीला नवा कोंब फुटतो. तो उंच असतो. एखाद्याने विचारलें की, या कोंबाचा केळीच्या बुंध्याशीं काय संबंध? कोंब वर टोकाला आणि बुंधा तर जमिनींत. पण त्या बुंध्यांतूनच नवा कोंब फुटत असल्यामुळे कोंब आणि बुंधा यांचा निकट संबंध आहे.

'अभिनवभारत संस्था' ही स्वातंत्र्य-संस्था याच नाशिक क्षेत्रांत स्थापन झाली आणि तिचाच कोंब म्हणजे हल्ली महाराष्ट्रांत भगव्या झेंड्याखाली एकत्र येऊन चाललेली हिंदुसंघटनेची चळवळ होय. अनेकजण असा आक्षेप घेतात की, १९०८ सालचे सावरकर आणि आजचे सावरकर हे एक नाहीत. हा आक्षेप खरोखरी पाहतां अगदी बरोबर नाही. १९०८ सालीं जे सावरकर ज्या पवित्र्यांत आपणापुढे उभे होते त्याच पवित्र्यांत ते आज १९४१ सालींहि आपणापुढे आहेत. त्यांत त्यांनी बदल केलेला नाही. ज्यांना कांही थोडा बदल झाल्यासारखा वाटतो तो त्यांच्या दृष्टींत आहे. ही त्यांची दृष्टि पूर्ववत् साफ व्हावी एवढ्याचकरिता मी आपणांस केळी आणि तिचा कोंब यांचा दृष्टान्त दिला. असो, स्वराज्य आणि हिंदुसंघटन यांच्यामध्ये अत्यंत निकटचा संबंध आहे. आम्हांला स्वराज्य असेंच हवें आहे की ज्यांत भारतीयांचें स्वत्व सुरक्षित राहलि.

स्वराज्यप्राप्तीच्या चळवळींत ज्यांनी आत्माहुति दिली म्हणून मीं सांगितलें ते हातांत गीता घेऊन फासावर चढले. हातीं कुराण घेऊन फाशी गेले नाहीत. हुतात्मे मदनलाल डिंग्रा यांनी तर परमेश्वराची अशी प्रार्थना केली की, 'पुनर्जन्म जर खरा असेल तर हे परमेश्वरा! मला तूं पुनः हिंदु धर्मात

जन्मास घाल.' सर्वच लोक राष्ट्रीय व्हावेत. मी मनुष्यमात्र ओळखतों पण हें तत्त्व जोंपर्यंत सर्वांना मान्य होत नाही, हिंदुस्थानची मर्यादा हिमालय ठरवली जाते तोंपर्यंत ज्या देशांत जे बहुसंख्य त्यांची त्या देशांत सत्ता असेंच म्हटलें पाहिजे. योग्यतेप्रमाणे ज्याला त्याला जागा द्या. पण हा मुसलमान म्हणून याला अधिक जागा, अधिक हक्क, अधिक सवलती द्या असें म्हणणें म्हणजे हें स्वराज्य नसून चोरांचें राज्य झालें असेंच म्हणावयास पाहिजे. बहुसंख्य असणें हें जसें पाप नाही तसेंच अल्पसंख्य असणें हें पुण्य नाही. स्वातंत्र्यकवि गोविंद यांच्या काव्याकडे आपण या दृष्टीने पाहा आणि त्या काव्याचा अभ्यास करून आपण 'स्वराज्य' म्हणजे काय हें समजून घ्या."

## महोत्सवाचें भाषण

सायंकाळीं महोत्सवाच्या मुख्य भाषणाचे वेळी **वीर सावरकर म्हणाले,** "ज्या वाचनालयांत मी लहानपणीं वर्गणी न देतां चोरून वाचावयास येत असे त्याच वाचनालयाच्या महोत्सवाचा अध्यक्ष म्हणून आज मी येथे आलों आहे. ज्या कवीने वाचनालयांतील ग्रंथ वाचून त्याप्रमाणे आचरण केलें आणि आपल्या काव्याच्या द्वारें जनतेला स्वराज्य म्हणजे काय हें शिकविलें त्या थोर स्वातंत्र्यकवीचा—कवि गोविंदांचा—स्मृतिदिन आज साजरा झाला व त्यांचा पुतळा अनावृत करण्यांत आला; त्याच कवीच्या स्फूर्तीने आज मला नाशकास आणलें. सार्वजनिक वाचनालयाशीं माझा व्यक्तिशः संबंध पुष्कळच आहे.

मला पहिल्यापासून इतिहासवाचनाची फार हौस आहे, मित्र मेळ्यांत मला दर आठवड्यास व्याख्यान द्यावें लागे. दर वेळीं मुलांना कांही तरी इतिहासाचें नवें ज्ञान द्यावें असें मला वाटे व त्याकरिता मी इतिहासाचीं बरींच पुस्तकें वाचीत असें. त्या वेळीं बडोद्यास राष्ट्रकथामाला निघत होती. त्या मालेचीं पुस्तकें वाचून मीं प्राचीन ग्रीक देशाच्या, तुर्कस्थानच्या इतिहासाचा अभ्यास केला. दाभोळकरांच्या ग्रंथावरून मला हर्बर्ट स्पेन्सरची प्रथम ओळख झाली. हें सर्व वाचन मीं याच वाचनालयांत केलें आहे. म्हणूनच सार्वजनिक वाचनालयच माझा गुरु होय. आज वाचनालयाचा शतसांवत्सरिक उत्सव आहे तेव्हां आज मी वाचनालयांत मुलांनी काय वाचावें यासंबंधी चार शब्द सांगणार आहें.

मुलांनी वाचनालयांत जाऊन मिळतील तितके ग्रंथ वाचावे. पण त्याचबरोबर हें लक्षांत ठेवावें की, कोणत्याहि ग्रंथांत जगांतील सर्व प्रश्नांचा सर्व बाजूंनी विचार केलेला नसतो. याचें कारण असें की, जे ग्रंथ आज आपण पाहतों ते देशाच्या तत्कालिन परिस्थितींत लिहिले गेलेले असतात. विद्यार्थ्यांने सगळें वाचावें पण त्यांतील सिद्धान्त निर्भेळ सत्य आहेत असें समजूं नये. कारण, ते मर्यादित असतात. म्हणून त्याच विषयाची दुसरी बाजू मांडणारीं पुस्तकेंहि आपण वाचा आणि मग दोनहि बाजूंचा विचार करून त्यांतील सिद्धान्त आपल्या बौद्धिक निकषावर घासून मग आपण आपलीं मतें बनवा. आपण मार्क्सचें तत्त्वज्ञान वाचा; पण तेवढ्यावरच न थांबतां दुसरी बाजू काय आहे हेंहि समजून घ्या. मी हिंदुसंघटनेचा अभिमानी आहे म्हणून तुम्हीहि हिंदुसंघटनाभिमानी व्हा असें मी सांगणार नाहीं. हिंदुसंघटनेसंबंधी आपण उलटसुलट बाजू काय आहेत त्या अगोदर पाहा आणि त्यावर विचार करून जर तुम्हांला हिंदुसंघटना पटली तर त्या कार्याला लागा. हाताला येईल तें पुस्तक घ्यावें, वाचावें आणि त्या विषयासंबंधी एकदम मत बनवावें हें बरोबर नाही. संततिनियमनावरचीं पुस्तकें वाचलीं तरी चालतील; पण त्याचबरोबर 'अष्टवीरा भव' हा आशीर्वाद कां देतात याचाहि विचार करा; आणि मग वरीलपैकी कोणतें बरोबर हें आपण आपल्या आपल्या मनाने ठरवा. कोणत्याहि तऱ्हेच्या वाचनाला बंदी नसावी. पण जें आत्मसात् करतां येत नाही, पचवतां येत नाहीं तें वाचूं नये. त्याचप्रमाणे वाचनालयांत सर्व विषयांवरचीं पुस्तकें ठेवावीत. अमुक एक विषय वाईट म्हणून त्यासंबंधीचीं पुस्तकें ठेवावयाचीं नाहीत ही पद्धत बरोबर नाही. दुसरी एक सूचना अशी की, वाचनालयाला जोडूनच वादविवेचनमाला असावी. तरच वाचनालय पूर्ण झालें असें म्हणतां येईल.

## पुरातन सूत्र तोडूं नका

आज आपण ज्या संस्थेचा उत्सव करीत आहों तिला शंभर वर्षें झालीं याबद्दल आपल्याला आनंद होणें स्वाभाविक आहे. जुन्या संस्था टिकवा-वयाच्या ही शिकवण आपल्याला नव्याने मिळालेली नाही; ती पूर्वापार

आपल्याकडे चालत आलेली आहे. इंग्लंडमध्ये जुन्या संस्था आहेत व त्यांचें त्यांनी सातत्यहि चांगलें टिकविलें आहे. मी इंग्लंडमध्ये असतांना इंडिया हौसमध्ये अभ्यासाकरितां जात असें. तेथे ईस्ट इंडिया कंपनी स्थापन झाल्यापासूनचे सर्व कागदपत्र नि हिशेब मला पाहावयास मिळाले. संस्थांचें चिरस्थायित्व हिंदुस्थानांतहि दिसून येतें. जुनीं खाल्डियन, रोमन, ग्रीस हीं साम्राज्यें गेलीं! त्या काळचीं देवालयें नामशेष झालीं! पण हिंदुस्थानावर अनेक वेळा परचक्रें आलीं असूनहि, आद्य शंकराचार्यांच्या मठाची परंपरा आजहि चालू आहे; त्यांत मुळीच फरक पडलेला नाही. पेशवाईत नाना फडणिसांनी घालून दिलेले नियम आजहि त्या त्या देवाचे पुजारी मानीत आहेत. त्यांनी जितकीं निरांजनें देवापुढे लावावीं असें सांगितलें तितकींच तीं आज लावलीं जात आहेत. त्यांनी जेवढा पगार पुजाऱ्यांना ठरवून दिला तितकाच त्या पुजाऱ्यांच्या वंशजांना आजहि मिळत आहे. गोसाव्यांच्या परंपरेंतहि आपणांस तेंच सातत्य दिसून येईल. ख्रिस्तपूर्व दोन हजार वर्षांपासून चालत आलेली परंपरा आजहि तशीच चालू आहे. हिब्रू भाषा गेली! त्या काळच्या देवदेवता गेल्या!! बॅबिलोनची संस्कृति गेली! मोलाकची पूजा नाहीशी झाली! पण आपला वेद पाहा. आजहि तो पूर्वीच्याच स्वरूपांत कायम आहे. वेदपठण करतांना जसे उच्चार पूर्वी केले जात तसेच ते आजहि करण्यांत येतात. तीच गोष्ट संस्कृतीची. त्यांतहि मुळीच बदल झाला नाही. पूर्वीच्या काळीं वेद म्हणणाऱ्यांच्या जिभा आणि माना कापल्या गेल्या; पण शत्रूंना त्या गळ्यांतून निघणारे वेदांचे स्वर कापतां आले नाहीत. ते जसे होते तसेच कायम— अमर— राहिले. आपणाला आपलें मूळ सूत्र कायम ठेवून वाढ करावयाची आहे. कांही वेळा आपल्या अंगाचा कांही भाग कापून टाकावा लागतो; पण तसें करण्यांतील हेतु शरीरस्वास्थ्य वाढविण्याचा असतो, शरीराचा नाश करण्याचा नसतो. 'तत्त्वमसि' हें तत्त्व दृष्टिआड होऊं देतां कामा नये. वेदकालांत, उपनिषद्कालांत, रामायण, महाभारत या कालांत, इतकेंच काय पण छत्रपति श्रीशिवाजी महाराजांच्या, लो. टिळकांच्या काळांत जसा तूं होतास तसाच तूं यापुढच्या काळांतहि राहा. हें सातत्य तूं टिकवलें पाहिजेस.

## खोट्या इतिहासाने दिखाऊ ऐक्य होईल

आता एक नवाच पंथ सुरू झाला आहे. हिंदु राष्ट्रांत ऐक्य व्हावें म्हणून. नव्या पद्धतीने इतिहास लिहिण्यांत येत आहेत व नव्या पद्धतीने ते शाळेंत शिकवले जात आहेत! इतिहास शिकवण्याचे दोन पंथ सांगितले जातात. सर्व जुना इतिहास विसरा हा एक पंथ; आणि जर तुम्हांला जुना इतिहास ठेवावयाचा असेल, तर ज्या गोष्टींमुळे भांडणें लागतील अशा गोष्टी त्यांत घालूं नका असें सांगणें हा दुसरा पंथ. औरंगजेबाने संभाजीला पकडलें आणि मग तो मेला असें इतिहासांत लिहावें. औरंगजेबाने संभाजीला हाल-हाल करून मारलें असें लिहूं नये असें कांहींचें म्हणणें! कारण त्यामुळे लहान मुलांच्या मनांत द्वेष निर्माण होईल. पण जसें घडलें तसेंच जर इतिहासांत लिहावयाचें नाही, तर कादंबऱ्या आणि इतिहास यांत फरक तो काय राहिला? भाजी-आमटींत मीठ अधिक घालणें हें जसें चूक तसेंच तें मुळीच न घालणें हेंहि चूकच. बंगालमधील विद्यार्थ्यांना जो इतिहास शिकवतात त्यांत खलिपांच्या गोष्टींवरच अधिक भर दिला जातो. त्यांचे इतिहास मुलांकडून अभ्यासविले जातात. विक्रमादित्याचा इतिहास त्यांना शिकवीत नाहीत. पैगंबरांचें सबंध चरित्र शिकविलें जातें! मीं वीस वर्षांपूर्वी भाषाशुद्धीची चळवळ सुरू केली त्या वेळीं लोकांना त्याचें महत्त्व वाटलें नाही. पण जेव्हा हिंदीवर संकटें येऊं लागलीं तेव्हा त्यांना या चळवळीचें महत्त्व पटलें. मला जगाचा इतिहास हवा आहे; पण तो खराखुरा इतिहास हवा आहे. प्रथम मीं जेव्हा कुराणाचा अभ्यास केला तेव्हा तो मीं इंग्रजीमधून केला. त्यांत मला हल्लीं मुसलमान लोक जीं तत्त्वें म्हणून सांगतात तीं कुराणांत मुळीच सापडलीं नाहीत, म्हणून मी रत्नागिरीस असतांना एका मौलवीजवळ मूळ कुराण पढलों, पण त्या वेळींहि मला आज मुसलमान जें सांगतात त्याला कुराणांत आधार मिळाला नाही. कुराणाचा मीं अभ्यास केला आहे म्हणूनच मीं मुसलमानांच्या सांगण्यावर टीका करतों.

संस्कृतींचा समन्वय करून ऐक्य करा असें कांही सांगतात, पण हा समन्वय म्हणजे वाघ-शेळीच्या ऐक्यासारखा होईल. एक दुसऱ्याच्या पोटांत गेला म्हणजे ऐक्य झालें असें कसें म्हणतां येईल? कारण खाली शिल्लक एकटाच

राहतो. तरुण विद्यार्थ्यांना जर आपल्या मराठ्यांचा इतिहास खराखुरा कळला नाही, तर त्यांना शत्रु कोण आणि मित्र कोण हें कसें कळणार? मागे शत्रूने आम्हांला किती बुडविलें व आम्हीं शत्रूला किती बुडविलें याचा हिशेब जर कळला नाही तर पुढचा व्यवहार एकोप्याने कसा होईल? मुसलमानांनी हिंदूंचीं देवळें फोडलीं हें खोटें आहे असें इतिहासांत लिहिलें जातें; पण त्याच्यावर हिंदु मनुष्य कसा विश्वास ठेवील? कारण मुसलमानांनी अर्धवट पाडलेलीं अनेक हिंदु देवळें आजहि त्याची साक्ष देत आहेत ! हा जो जिवंत इतिहास आहे तो कसा विसरतां येईल ? शाळेंत हिंदु-मुसलमान विद्यार्थ्यांत एकोपा ठेवण्याचा प्रयत्न केला जातो; पण बाहेर जर एखाद्या हिंदु विद्यार्थ्याचें तो हिंदु म्हणून डोकें फोडलें गेलें तर शाळेंतलें दिखाऊ ऐक्य कसें कायम टिकेल? इंग्लंडमध्ये वॉर ऑफ रोझेस झालीच नाही किंवा चर्चिल-चेंबर्लेन हे झालेच नाहीत असें कोणी सांगितलें तर तें कसें खरें मानावें ? जसा इतिहास घडला असेल तसाच तो द्यावयास पाहिजे; आणि मग तात्पर्य म्हणून इतिहास-लेखकाने पूर्वी अमुक गोष्ट झाली असली किंवा अमुक मार्गाने एखादी गोष्ट केली असली तरी त्याच मार्गाने आता जाण्याचें कारण नाही असें लिहावें. संभाजीला औरंगजेबाने हालहाल करून ठार मारलें, हा सत्य इतिहास अगोदर लिहा आणि मग तात्पर्य सांगतांना 'पूर्वी जरी असें झालें असलें, तरी आता तसें करण्याचें कारण नाही' असें लिहा; त्याला कोणी हरकत घेणार नाही. महाराष्ट्रीय मुलांना आणि शीख मुलांना शाळेंत खरा इतिहास शिकविला जात नाही. नुसत्या सनावळ्या पाठ करवून घेणें म्हणजे कांही इतिहास शिकवणें नव्हे. आमच्या लहानपणीं ऐतिहासिक नाटकें होत होतीं, तशाच ऐतिहासिक कादंबऱ्याहि प्रसिद्ध होत होत्या. पण आता मात्र वरील दोनहि मार्ग बंद झाले आहेत. ऐतिहासिक चित्रपट निघतात पण त्यालाहि अनेक बंधनें घातलेलीं आहेत. हिंदु विद्यार्थ्यांना खरा इतिहास शिकवला जावा यासाठी मोठी चळवळ करावी लागेल. आज आपणास मीं फक्त साधारण कल्पना करून दिली आहे. खऱ्या इतिहासाचीं साधनें हळूहळू लुप्त होत चाललीं असल्यामुळे आपल्या पूर्वजांचे पराक्रम आपणास वाचावयास मिळत नाहीत. अशा स्थितींत विद्यार्थ्यांना खऱ्या इतिहासाची नुसती पुसट कल्पनाहि येत नाही. हा

दोष त्यांचा नसून परिस्थितीचा आहे. आजच्या प्रसंगाने मी विद्यार्थ्यांना एकच गोष्ट सांगतों. आपणाला आपल्या इतिहासाचें खरें मर्म समजून घ्यावयाचें असेल तर आपण इतिहासाची क्रमिक पुस्तकेंच वाचून न थांबतां जुन्या बखरी वाचा. पानपतचा रणसंग्राम कसा झाला याची यथातथ्य कल्पना तुम्हांला बखरींवरूनच येईल. म्हणून तुम्ही जुन्या बखरीच वाचल्या पाहिजेत.